सत्कार्योत्तेजक सभा—धुळें

[ श्री रामदास आणि रामदासी मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला ]

श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग सत्ताविसावा

सर तिसरा ] **श्रीभक्तमंजरीमाला** [ मणि पांचवा

## खंड दुसरा

कलयुग होतां चि प्राप्त । गोपाळ जाहले सर्व संत ।
तयांच्या कथा अनुक्रमें सत्य । स्फुरत तितुक्या सांगेन ॥

हें पुस्तक वि. ग. जावडेकर यांनीं धुळें येथें आत्माराम
छापखान्यांत गल्ली नं. २–१२ मध्यें छापिलें व
शंकर श्रीकृष्ण देव यांनीं ९–१८ मध्यें प्रसिद्ध केलें.





१८५३ वैशाख शुद्ध १३

# श्री भक्तमंजरीमाला

## खंड दुसरा



## अनुक्रमणिका





श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग सत्ताविसावा

# भक्तमंजरीमाला

## खंड दुसरा

### अध्याय २८

### —शिवरामस्वामी—

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्ध रामा । पांडुरंगा परब्रम्हा । भक्तकाजकल्पद्रुमा । वर्णीता महिमा न कळे तुझा ॥ १ ॥ सहस्त्रमुखाचा जो कां शेष । तोहि शिणला निशेष । सनकादिक जाहाले पिसे । मुरडलि मानसे योग्याचें ॥ २ ॥ सिद्धाचा जो मुगुट मणि । महावैष्णव कपीलमुनि । तोहि स्तब्ध राहिला ध्यानी । विस्मित जननि सरस्वति ॥ ३ ॥ प्रत्यक्ष वेद मुर्तिमंत । नेति नेति ऐसे वदत । तेथें हेंदरे मानव प्राकृत । केवि स्तवनातें अनुसरें ॥ ४ ॥ परि भक्तिप्रिय सर्वोत्तम । दीनदयाळ मेघःश्याम । निजदासां होउनि सुगम । पुर्वी कांम सकाळिका ॥ ५ ॥ साधुपरतें लोकत्रई । आणिक गोमटें दुजे नाहि । भक्तांकीत विठाबाई । जाहालि पई युगायुगीं ॥ ६ ॥ अठाविसयुगें पंढरिसि । तिष्टत आहे ऋषीकेसि । संतकथा ऐकावयासि । आवडि देवाशि बहुत ॥ ७ ॥ वैवश्वतमनुते । अठाविसावे युग हें

निश्चीत । सप्तशति जो का ग्रंथ । निर्णय तेथें केला हा ॥ ८ ॥ अन्यग्रंथी हेचि युक्ति । म्हणुनि नामदेवें केलि आरति । असो भक्तिप्रीय श्रीपती । तिष्ठे मूर्ति अनंतयुगे ॥ ९ ॥ नासिकाग्री ठेउनि द्रिष्टी । उभा राहिला जगजेठि । श्रवण कराया प्रेमळ गोष्टि । भीमातटीं नांदतसे ॥ १० ॥ निज भृत्यहृदई प्रघटोन । वदवीतसे संतगुण । भक्तजीवन रमारमण । समचरण विटेवरी ॥ ११ ॥ यालागी श्रोते तुह्मी सर्व । निश्चळचित्तें अवधान द्यावें । हरीप्रीयकथा ऐकता भाव । वासुदेव कृपा करी ॥ १२ ॥ शिवरामस्वामी माहावैष्णव । सखा ज्याचा देवाधीदेव । आत्मस्थिति अंगी वैभव । नुरे भव स्मरतां तया ॥ १३॥ पाहाता तयाचे जन्मांतर । अवतरले पूर्ण अश्विनिकुमार । देववैद्य ते साचार । जगदोद्धार करावया ॥१४॥ जीव अज्ञान विषयसंगी । जाहाले बहुत क्षयरोगी । दुरितव्याधी जडलि अंगी । कलयुगी तळमळति ॥ १५ ॥ ज्ञानरसायण देउनि तया । आरोग्य प्राणि करावया । जन्म घेणें भूठाया । अमराचिया वैद्यासी ॥ १६ ॥ ते चरित्र अतिसुंदर । श्रवणे पठणे कामना पुरे । धन्य ते कल्याणनगर । जाहला अवतार तेथे पै ॥ १७ ॥ ऋग्वेदीब्राम्हण पुण्यश्लोक । नारायणनामें अतिभाविक । भार्या तयाचि पवित्रदेख । अंगी वार्धिक्य उभयता ॥ १८ ॥ पुत्रहीन असता जाण । यतीसेवा केली पूर्ण । कायावाचाजीवें प्राण । आराधन केलें बहु ॥ १९ ॥ संतुष्ट होऊन सन्यासी । प्रसन्न झाले उभयतासी । सांगा ह्मणतां ईछितमनासि । सत्पुत्र तयासि मागितला ॥ २० ॥ योगेश्वराची कृपा होतां । गर्भसंभव जाहाला तत्वता । ते लीला वर्णू जाता । तन्मयता वाचेसि पै ॥ २१ ॥ लक्ष्मीबाई ते जननी । प्राप्त जाहली तये उन्मनी । मुद्रा लागली अलक्ष नैनी । उघडली खाणी स्वसुखाचि ॥ २२ ॥ नाहीं भान देहाचे । नामनाम गर्जे वाचे । गर्भी अश्विनीकुमार साचे । काय तयाचे भाग्य वानू ॥ २३ ॥ दिवसेदिवस अधिक चडती । विदेहस्थितीने घेरीली सती । घाबरा जाला तेणें

पती । उपाय जगती करितसे ॥ २४ ॥ ज्योतिषी पक्षव्यारी संत । मेळवीले तयाने बहुत । नाना देवता उपाशीत । भमले चित्त द्विजाचें ॥ २५ ॥ तव अकस्मात येऊन सिद्ध । नारायणभटजीस सुचविले प्रसिद्ध । उदरी पातले अत्मविद । न धरी अशुद्ध संशय तो ॥ २६ ॥ विसरोनि मुळिची आत्मद्रिष्टि । कासया भ्रमसी उगाचि पोटी । ऐसी बोलोनी गुह्य गोष्टी । तेथेचि निकटि गुप्त जाहाले ॥२७॥ मग जवळि येऊन भ्रतारें । न्याहाळुनि पाहिलि ती सुंदरा । तव ती व्यापिलि प्रेमभरें । लक्षणे साचार योग्याची ॥ २८ ॥ ब्रम्हस्थिती देखून डोळा । नारायणभटजीस आनंद जाहला । रात्रौ तशांत द्रष्टांत जाहला । वैष्णव आला उदरासि ॥ २९ ॥ अश्विनिकुमार जेको समर्थ । गर्भी संभव तयाचा सत्य । ऐसे स्वयें पंढरीनाथे । तया द्विज्याते सांगितले ॥ ३० ॥ डोहोळे होउनि भगवूपर । नउ महिने आहले खरे । गुणनिधान प्रसवीलि पुत्र । जन्मांतर धन्य तयाचे ॥३१॥ नाम ठेविले शिवराम । हरिहरात्मक ऐक्य परम । यथाविधि जातककर्म । अनुपम्य उत्छाह तो ॥ ३२ ॥ अन्नदान करुनी बहुत । तोषवीले अभ्यागत । वृधाप्यकाळीं जाहाला सुत । वर्तले जनात आश्चीर्य ॥३३॥ दिवसेदिवस बाळलिला । करिता संतोष मायेला । अभ्यास न करिता विद्येला । पात्र जाला योगी तो ॥ ३४ ॥ येकवेळ ऐकता क्षणीं । श्रुतिस्मृति गर्जे वाणी । व्रतबंध केला पित्यानी । त्वरा करोनी अत्यादरे ॥ ३५ ॥ अवतार पूर्ण देवाचा । आश्विनिकुमारवैद्याचा । तेथे अभ्यास करणें कैचा । स्वभाव वैद्याचा सकळ अंगी ॥३६॥ कोणे येके दिनीं प्रीति करुन । शिवरामस्वामिसी मातेने । जवळि घेतले असे जाण । मुखचुंबन करितसे ॥ ३७ ॥ तो इतुकियात देवघरात बोले पिता । अग्नी सत्वर आणीजे आतां । दीप लावणे वेगी ततवता । अर्चन देवता कर्णे मज ॥ ३८ ॥ शिवराम वदति अगे माउलि । वैश्वान्नर आहे सर्वत्र स्थळी । कासया जासि दुरिले अळि । करकमळीं घेउनी शुभा ॥ ३९ ॥ ऐसे वदुनी ततक्षणि । मातेसि दाविली अपूर्व करणी । म्हणे पाहा आपुले

नैनी । आहे अग्नी जठरी माझ्या ॥ ४० ॥ मुख पसरोनि तात्काळि । भडभडा काढिला वन्ही ज्वाळी । वाति तेथे प्रज्वाळली । लाउनी दिधली दीपककळिका ॥ ४१ ॥ डोळा देखुनि अद्भुत । माता जाहाली भयाभीत । मुर्छा येउनि भुमीते । निचेष्टित पडली ते ॥ ४२ ॥ आश्चीर्य देखूनि जनक जननी । ह्मणति अवतार जाहला जनी । धन्य अमुचि सुकृतखाणि । विस्मय मनीं करिती ते ॥ ४३ ॥ मागुति पावोनि मोहाते । मायाजाळीं गुंतले चित्त । करावे ह्मणती लग्नाते । नातरि सुत जाइल हातीचा ॥ ४४ ॥ उभयतानी करुनी विचार । नवरी पाहिली अत्यादरे । सोहळा केला उत्तमप्रकारे । आले सुर ते काळीं ॥ ४५ ॥ तो विवाहविधि सांगता । ग्रंथ नाटोपे सर्वथा । बृहस्पति जेथें पाहातां । आले तत्वता विवाहासी ॥ ४६ ॥ मुर्तीमंत देवत्रई । वेश पालटोनि आले तेहि । मिरवे जेथे लक्ष्मीबाई । सावित्रीमाई आणि उमा ॥ ४७ ॥ असो ऐसेविचारेकरुन । शीवरामस्वामीचे जाहाले लग्न । ग्रहस्ताश्रमी वर्तति पूर्ण । भाग्य धन्य त्या द्विज्याचें ॥ ४८ ॥ सत्पुत्र आणि पतीव्रताभार्या । संतसंगति आरोग्यकाया । बहुत सुकृत गाठि जया । लाभे तया आत्मस्थिति ॥ ४९ ॥ अप्रवासी निरोपाधी । जिंकिली जेणें तृष्ण व्याधी । प्रेमसुखा रंगलि बुध्दि । धन्य त्रिशुध्धी तो येक ॥ ५० ॥ नित्यानित्यविचार । गुरुशेवे जो तत्पर । तोचि म्हणावा मानवीनर । नातरि खरे पशु ते ॥ ५१ ॥ नाहि जया सत्संगति । नावडे कदा हरीभक्ती । श्वानशुकर त्यांत गणति । मानव निश्चीति नवे तो ॥ ५२ ॥ यालागी जया स्वहित करणें । तेणे धरावे संतचरण । नाहितरी जाहालि हाण । सावध होणे सर्वत्री ॥ ५३ ॥ भरवसा नसे देहाचा । वेगी ग्रंथ अत्म वाचा । शोध करुनि देवाचा । संसार सुखाचा करणे मग ॥ ५४ ॥ असो नारायणभटजी विद्वज्जन । विचारशीळ तो तत्वज्ञ । तेणे मानसीं आणीले पूर्ण । आश्रम घेणे चतुर्थ ॥ ५५ ॥ पुत्रासि अर्पोनि ग्रह संपत्ती । आज्ञा घेतालि स्त्रिचि निगुति । आपण निघुनि

पंढरिप्रति । गेले निश्चिति भटजी ते ॥ ५६ ॥ विधियुक्त संन्यास घेउन । तेथेंचि राहिले निरंतर पूर्ण । योगाभ्यासीं होउन निमग्न । सार्थक जेणें केले पै ॥ ५७ ॥ इकडे कथा कैसी जाहालि । श्रोति पाहिजे परिसीलि । ग्रहस्ताश्रमि शोभति जाहली । गुरुमाउलि शिवराम ॥ ५८ ॥ मातुश्रीचि करुन शेवा । प्रपंचधर्म करिती बरवा । आराधोनि रमाधवा । वैदीकस्वभावा आचरति ॥ ५९ ॥ स्वरुप पाहाता अतीलावण्य । अजानबाहु गौरवर्ण । याज्ञीक विधी करिति जाण । परि मन श्रीभगवंती ॥ ६० ॥ सहजस्थिति यजमान गृही । नैमित्यक आचरले पाहि । दक्षणेचे धान्य तेहि । दिधले ठाइ वरुते तयानि ॥६१॥ पोहोचउनि द्या घरासि ह्मणता । न ऐकाति ते मुढ तत्वता । तेचिक्षणी अनुताप चित्ता । जाहाला संता सिवराम या ॥ ६२ ॥ वैराग्य होउन पूर्ण अंगी । भिक्षा मागते जाहाले जगी । मन मोहिले पांडुरंगी । जाहाले विभागी स्वसुखाचे ॥ ६३ ॥ जे जे पांथस्त आश्रमा येति । तयाचे श्रम सकळ हरति । अन्नोदक देउनि प्रीति । सुखी करिति सर्वातें ॥ ६४ ॥ रात्रंदिवस कीर्तन भजन । रामकृष्ण उच्चारण । परान्न त्याजिले असे जेणें । केला यजमान श्रीहरी ॥ ६५ ॥ मग उणे तया काई । अष्टमा शिध्दि लोळति पाई । मातृसेवा करिति पाहि । धरुनि ह्रुदई भाव अनन्य ॥ ६६ ॥ पुढें काहिकाले त्वरित । माता पावली निजधामातें । मग शिवरामस्वामि सखेदचित्तें । पंढरीते आले पै ॥ ६७ ॥ श्रीहरीचे घेउन दर्शन । विजापुरास गेले जाण । तेथ भेटले साधुपूर्ण । ज्ञानघन रुक्मण्णा ॥ ६८ ॥ पाहुनि वृति उदास । ठेउनि घेतले शिवराम स्वामिस । पुत्राहुनि आदर विशेष । करिति स्नेहास सप्रेमें ॥ ६९ ॥ रुक्मणापंत याचा नेम । कीर्तन करावे नित्यधर्म । काव्योक्ति रचुनि परम । स्तुति निशीम करणे ती ॥ ७० ॥ ऐसा नेम असतां प्रत्यहि । अपूर्व वर्तले ऐकिजे तेहि । पातशाचें बोलावणें पाहि । आले लवलाहि पंतासि ॥७१॥ रुक्मणापंत वैष्णव माणि । लिहिले कवनोक्ति स्वकरे लेखणी । अडिच-

श्लोक होतानि। कोळि दुतानि त्वरा बहु ॥ ७२ ॥ ठेउन तैसेचि हातिचे पत्र। निघोनि गेले कचेरीस पवीत्र। शिवरामस्वामिने केले विचित्र। काव्य स्वतंत्र आपण तें ॥ ७३ ॥ रुक्मणापंताचे जैसे श्लोक। तैसे कवन केलें निके। न्यून्य नसे कांहींच देख। अलोलिक-रचना तें ॥ ७४ ॥ पाच श्लोक करुनि पूर्ण। माध्यानिकासी गेले जाण। इकडे रुक्मणापंत दरबारातून। आले निघून घरासी पै ॥७५॥ पुस्तक सोडुनि पाहातां। आश्चिर्य वाटले रुक्मणापंता। विचारिलि शिष्यासमस्ता। लिहिले ग्रंथा कोणी ह्मणूनी ॥ ७६ ॥ तयेकाळि सकळिकानी। विनंति केली हात जोडुनी। ह्मणती आमुची नव्हे करणी। वरदपाणि श्रीस्वामिचा ॥ ७७ ॥ मग पाचारितां सिवरामाते। हास्यवदने नमन करित। आपुले कृपे केले कृत्य। जाह्माली बुद्धि ते कवनोक्ति ॥ ७८ ॥ रुक्मणापंत परम उलहासे। धन्य म्हणति सिवरामस्वामीस। श्रीगुरु भेटति वेगी तुम्हास। वदति ऐसें संतुष्ट होउनी ॥ ७९ ॥ मग तैसेचि पुढे जाहले जाण। ते सविस्तर करा श्रवण। रुक्मणापंतासि करुनी नमन। निघाले तेथून शिवराम ॥ ८० ॥ तीर्थाटण करिता अकस्मात। पूर्णानंद भेटले समर्थ। दर्शन होतां शिवरामातें। वेधलें चित्त गुरुपाई ॥ ८१ ॥ अनन्यभावें करुनी वंदन। उभे ठाकले कर जोडोन। ह्मणाले मजला करा पावन। आलो शरण दयाळा ॥ ८२ ॥ पाहातां स्वामिनी शीवरांम। मानसिं दाटलें स्नेह परंम। कुर्वाळिले अतिप्रेमें। अनोपम्य आवडति ॥ ८३ ॥ लक्षणचतुष्टय देखुनि मुर्ती। उचंबळली बहुप्रिति। जैसे मछिंद्रगोरक्षाप्रति। उपदेशिति तात्काळ ॥८४॥ की वसिष्ठासि भेटले श्रीरामचंद्र। की स्वोत्तमाजवळि कपींद्र। नातरी बोधीला देवेंद्र। ज्ञानसमुद्र बृहस्पतीनें ॥ ८५ ॥ किंबहुना श्रीरांमदासे। स्वरुपी मेळविला कल्याण शिष्य। तैसि गति सिवरांमस्वामीस। जाहाली असे ततक्षणी ॥८६॥ कृपादृष्टी अवलोकीतां। प्राप्त जाली तुर्यी अवस्ता। ब्रम्हरुप होउनि तन्मयता। बाणली समता परिपूर्ण ॥ ८७ ॥ अंतर्बाह्य भगवन्मूर्ति।

प्रगट जाहलि स्वयंज्योति । तन्मय जेथे श्रृतिस्मृति । काधाछि स्थिती ते जाणा ॥ ८८ ॥ परेसहति वाचा चारि । विरोनि गेल्या स्वरुपांवरी । बोलवया कैचि उरी । चराचरी अत्मत्व ॥ ८९ ॥ मंत्राक्षर पडता श्रवणी । मंत्ररूप तेचिक्षणी । तया सुखा कोण वर्णी । चिन्मयखाणि उघडली ॥ ९० ॥ धन्य स्वामि पूर्णानंद । तोडिले जेणे सकळद्वंद्व । देउनिया निज आत्मपद । तोडिला खेद देहबुध्धीचा ॥ ९१ ॥ जहदा-जहदर्लक्षण । हेहि गळाले जेथे पूर्ण । अपी अप चिद्घन । जाणतिं खूण योगीते ॥ ९२ ॥ असो शिवराम स्वामि श्रीगुरुपदि । निमग्न जाहाले त्रिशुध्धि । अनन्युक्तो ज्ञानाब्धी । यथाविधि अर्चिली ॥ ९३ ॥ प्रेमोदके घालूनी स्नान । दिधले पूर्ण हृदयासन । अर्पिले तोचि कायवसन । भगवे जाण भक्तीचें ॥ ९४ ॥ वासना ते गोमय शुध्ध । ज्ञानाग्नीने जाळीले प्रसिध्ध । विभुति चर्चिता ते पूर्णानंद । संतुष्ट सिद्ध श्रीगुरु ॥ ९५ ॥ सुमने सुमने गुंफुनि माळ । गळा घातलि अतिसुढाळ । बिल्वपत्र त्रिगुण त्रीदळ । अर्पिलि सकळ गुरुपाई ॥ ९६ ॥ अति आवडि त्या श्रीकपोला । स्वानंदपरिमळ बुकालाबिला । तेणें स्वामि अति शोभला । मस्तक ठेविला निच चरणि ॥ ९७ ॥ तुळणेसि येता पिंड ब्रम्हांड । तुळसि वृक्ष तोचि प्रौढ । विज्ञान कोमळ मंजुऱ्या निवड । वाहिल्या सद्दढ प्रितिनें ॥ ९८ ॥ अहंकाराचा धुप जाळिला । सोहंदीप तेथें उजळिला । नववीधप्रकारें त्या सोज्वळा । नैवेद्य दाविला अत्मया ॥ ९९ ॥ गर्व ताठा दवडुनि वेगा । वेदज्ञ वदति सकळ जगा । नम्रपणे तेचि लवंगा । अर्पिल्या शुभांगा प्रीतिनें ॥ १०० ॥ सुकृट फळ ठेऊन पुढे । मंत्रपुष्प तेचि रोकडे । मानस करुनि अति चोखडे । नमिला प्रौढ सद्गुरु जो ॥ १०१ ॥ साष्टांगेसि नमन करितां । अष्टांगयोग आले हाता । अष्टधाप्रकृति निरसिता । जाहली स्थिरत वृत्तिसि ॥ १०२ ॥ पुज्य पुजक नुरे जेथें । ऐसि पुजा घडलि युक्ता । पूर्णानंदस्वामिसमर्थ । अर्चिला सत्य शिवरामें ॥ १०३ ॥ पुढे कथन

होचि गोड । श्रवण करा श्रोते निवाड । जेणे पवि स्वात्मजोड । ढळे द्वाड पातक पै ॥ १०४ ॥ संतकथा पडता कर्णीं । हृदई प्रघटे कोदंड-पाणि । बोळति व्यास हे पुराणीं । नव्हे वाणि पदरीचि ॥ १०५ ॥ सिद्ध स्वामि समर्थ माझा । नेणे विचार आणिक दुजा । जयाचे वंदिता पदरजा । पावलो सहजा आत्मत्वी ॥ १०६ ॥ धन्य धंन्य ते सिद्ध-चरण । राजारांमी रंगले मन । वर्णितसे संतगुण । जेणे पावन लोकत्रई ॥ १०७ ॥ भक्तमंजिरिमाळाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । शिवरांमस्वामिचरित्रातें । अध्याय होत प्रथम हा ॥ १०८ ॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ छ ॥ छ ॥ अनुक्रमअध्याय ॥ अठाविसावा समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय २९

### —शिवरामस्वामी—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसित्धसमर्थ ॥ जय श्रीहरि पंढरिनिवासा । भक्तप्रीय रूक्मीणिविलासा । जगदोत्धारा श्रीसित्धेशा । होई मानसा प्रगट तू ॥ १ ॥ संतचरित्र रमारंगा । आवडतीं तुम्हा शारंगा । प्रेम द्यावे सर्व अंगा । पांडुरंगा जगत्पते ॥ २ ॥ शब्दसुमनाची करुनी माळा । घालू पाहे तुझीया गळा । होउनि साह्य वाच्या बरळा । पुजा गोपाळा घेई बरी ॥ ३ ॥ केवळ अज्ञान मूढमति । नाही जाणिकी काहि वित्पत्ति । परि तुझा ह्मणवी सीतापति । वांछा चित्ति गुण गावया ॥ ४ ॥ समर्थ देवाची निजप्रौढि । कळिकाळ स्वयें हात जोडी । भक्ति यशाची उभविली गुढि । ग्रंथपरवडि रचना ते ॥ ५ ॥ प्रार्थना परिसोनि स्वतसित्ध । प्रत्यक्ष प्रगटले स्वामि सित्ध । जो का अवतार रामदास प्रसित्ध । वर्णविति शुद्ध संतकथा ॥ ६ ॥ ऐकता ते आख्यान । सकळकामना पुरती जाण । हृदयकमळीं रघुनंदन । प्रगटायमान होतसे ॥ ७ ॥ शीवरामस्वामि माहासमर्थ । आत्मव्येत्यामाजी जो पंडित । ऋणि

जयाचा श्रीभगवंत । जवळि तिष्टत सर्वदा ॥८॥ पूर्वाध्यांई जाहाले कथन । पूर्णानंदस्वामीसि गेले शरण । अनुग्रह करीता तयानी पूर्ण । लाधले संपूर्ण आत्मसुखा ॥९॥ सद्गुरुसेवा अरंभीली । तितो नव जाय कदा वर्णिलि । जेवि कल्याणाने तोषविलि । गुरुमाउलि रामदास ॥ १० ॥ की जयत्पाळ राजाने मुकुंदमुनि । आराधिला येकाग्रमनीं । नातरी शिव भवानी । मच्छिंद्रचरणीं गोरक्ष ॥११॥ किंबहुना ज्ञानेश्वरी । आचार्यउपासना वर्णिली बरी । शीवरामस्वामिनी तयापरी । करिती घरी गुरुसेवा ॥ १२ ॥ ग्रहस्ताश्रम करुनि धर्म । पुजीति सदा गुरुपादपद्म । पूर्णानंद परब्रम्ह । संतुष्ट परम जाहाले ते ॥ १३ ॥ जगदोत्धार करावया । अज्ञापिले शीवरामस्वामिया । आपण गेले फिरावया । प्रयाग गया तीर्थासि ॥१४॥ गुरुअज्ञा वंदून । अनुग्रह करिति जना लागून । मेळविती स्वरूपीं पूर्ण । कृपानैनें पाहाताचि ॥ १५ ॥ पंढरिचा अतिप्रेमा । आषाढिकार्तिकि न टळे नेमा । कीर्तन आवडे सर्वोत्तमा । तिष्टे रमासहित कथे ॥ १६ ॥ गोपाळपुरीं गोपाळकाला । शीवराम संतानि अरंभिला । तयेकाळीं जाहालि लीला । देव प्रगटला तात्काळीं ॥ १७ ॥ विदेहस्थिति श्रोत्यासि होऊन । प्रेमे श्रवति सकळलोचन । येकायेकी प्रकाश पूर्ण । दाटला जाण तये स्थळीं ॥ १८ ॥ पताका उतरल्या स्वर्गीहूनि । सुमने वर्षलि सुरवरानि । नारद तटस्त जाहला भजनीं । विमानि गंधर्व अप्सरा ॥१९॥ आसो ऐसे चमत्कार । पंढरीसि होति वारंवार । शीवरामयोगी साधु थोर । वैष्णववीर आगळा तो ॥२०॥ बालोन्मत पिशाच स्थिति । त्रिविध अंगी ज्या शोभति । मनास मानेल तैसे करीति । जगरिति कैची तया ॥२१॥ लोकेषणा सांडुन । स्वईच्छा वर्तति सदा पूर्ण । तुर्य अवस्था ग्रासून । राहाति निमग्न सहस्त्रदळीं ॥ २२ ॥ देहावरि येणे जेंव्हा । स्नानसंध्या करणे तेंव्हा । प्रपंच्याचा कैचा हेवा । रामशिवा ऐक्य जेथें ॥ २३ ॥ ह्मणूनि नाम शिवराम । नुरेचि जेथे कर्म धर्म । बहिर्मुख जगपरम । योगी निःसीम नावडे तया ॥ २४ ॥ शिवरामस्वामिचा नित्यपाठ । अमानित्व आंगी स्पष्ट । प्राणि जैसा जो का भेटे । वर्तणे

निकट तयापरि ॥ २५ ॥ तव अकस्मात श्रीशंकराच्यार्य । कल्याण-नगरात आले पाहे । तयाजवळी पातले लवलाहे । छळक होये तितुके पै ॥ २६ ॥ द्विजवरानि त्या नमन करूनि । विनंति केलि आच्यार्या-लागुनि । धूम्रपान आदिकरूनि । युक्त करणि शिवरामस्वामीचि ॥ २७ ॥ गुरुगोडि वडावयाची पाहुनि संधि । बोलावणे करविले त्रिशुद्धि । आज्ञा वंदुनि तये अवधि । निघाले दयाब्धि योगी ते ॥ २८ ॥ जया आंगीं नाहीं द्वैत । येकात्मता बाणली स्थित । गुड-गोडी घेऊनि हातात । आले निश्चित आच्यार्याजवळि ॥ २९ ॥ छळकमंडळि विप्र तेथे । बैसले होते मार्ग पाहात । विचित्र देखुनि येकमेकातें । खुणावित परस्परे ॥ ३० ॥ शंकराच्यार्यासि म्हणति पाहा । ब्राह्मण भ्रष्ट जाहाला हा । शास्त्रे पढोनि व्यर्थ साहा । सिक्षा यया करणे वेगि ॥ ३१ ॥ नाहीं मर्यादा जेथे आपुलि । सभेत जयाने गुडगोडि आणिलि । असो शिवरामस्वामिने प्रार्थियलि । गुरुमाउलि शंकराच्यार्य ॥ ३२ ॥ ह्मणति स्वामिया तळफ सारु । कींवा आधी नमन करु । हस्यवदने जगद्गुरु । देति रुकारु गुडगोडि वडावया ॥ ३३ ॥ तया-काळीं अग्नि मागता । विनोद करिति छळक तत्वता । ह्मणति अग्नि जठरस्थ असता । कासया इछिता लोकिकाग्नि ॥ ३४ ॥ ज्ञानाग्नि जाळितो कर्मासि । तंबाकु न जळे काय तयासि । ऐकुनि ऐसे शिवरामस्वामिसि । आनंद मानासि जाहाला बहु ॥ ३५ ॥ पूर्णानंदगुरुचे आठउनि चरण । तंबाकु घातलि चिलमित पूर्ण । भडभडा वोढिति गुडगोडि जाण । निघती गगनचुंबित ज्वाळा ॥ ३६ ॥ आचार्यासहित सभा सकळ । देखुनि ऐसे करिति नवल । निंदक अवघे चाकाटले । ह्मणति जाहाले विचित्र हे ॥ ३७ ॥ श्री शंकराच्यार्य ततक्षणि । शिक्षा केली छळकालागुनि । शिवराम स्वामि धन्य ह्मणोनि । वरदपाणि स्पर्शिला शिरी ॥ ३८ ॥ संतोष होउनि जगद्गुरु समर्थ । गौरविले अनंदयुक्त । जे जे कराल ते ते शोभत । ऐसे वदत आच्यार्य ते ॥ ३९ ॥ पश्चाताप होउन दुर्जना । भावीक

लागले तात्काळ चरणा । अनुग्रह घेतले बहुतीं जाणा । जाहाले ज्ञान पात्र ते ॥ ४० ॥ अणीक दुजी गोष्टि ऐका । जेणे पाविजे स्वात्म-सुखा । भवार्णवि प्रत्यक्ष नौका । अवतार नीका जाहला तो ॥ ४१ ॥ हुमणबादेस शिवराममहाराज । फिरत फिरत गेले सहज । तव तेथे वर्तले चोज । ऐका गुज सकळ ते ॥ ४२ ॥ भजन करीता मंडळिसी । निघाले स्वामि भिक्षेसी । शहरांत भेटला मार्गासी । प्रभुत्व जयासि यवन तो ॥ ४३ ॥ तयाने अदर करुन । ठेउन घेतले प्रीतिने । ह्मणे करा येथे कीर्तन । करु श्रवण सकळिक ॥४४॥ गंगाधरपंडीत साक्षात्कारी । आहेत सध्या याचि नगरी । जयास देवि प्रत्यक्ष निर्धारि । भाषण वैखरी कारितसे ॥ ४५ ॥ तेहि येतील कथेसि । भरते येईल आनंदासि । ऐसे सांगतां शीवरामस्वामिसि । चिद्विलासि राहिले तेथे ॥ ४६ ॥ उतमस्थळि मंडप दिधला । लोक मिळाले श्रवणाला । यवनप्रभु तोहि आला । पंडित भला न येचि तो ॥ ४७ ॥ अंगी तयाचे अभीमान । देवता जयासि करि भाषण । अधिकारि तेथिल यवन । अनुग्रहित जाण जयाचा ॥ ४८ ॥ मद्यपान मर्कटासि । विंचु चावला वरि त्यासि । भुतसंच्यार तयात अंगासि । पंडितासि गति तैसि ॥ ४९ ॥ अदाचि विद्येचा गर्व अंगी । साक्षात्कारप्रतिष्ठा जगी । उपदेश ज्याचा राज्यालागीं । किर्तनरंगी नावडे त्या ॥ ५० ॥ बोले द्विज तो भलतेचि वाचे । काय कथेत येऊन साच । नाम गर्जेति देवाचे । साधु कैचे अधिक ते ॥ ५१ ॥ नाहि वित्पात्ति कळा कुसरी । सांगति अध्यात्म गोष्टि चारि । तानतनाना नाहि भारी । कोण रात्रि येतो तेथें ॥ ५२ ॥ नाहित कळा हास्य विनोद । भजन करिति स्वच्छंद । रामकृष्ण हरि गोविंद । काय प्रबंद ऐकुनि ॥ ५३ ॥ ऐशाप्रकारे नानापरि । भाषण करुनि मूढवैखरि । घोरत निजेला आपण मंदिरि । परताले सारी बोलावणी ॥ ५४ ॥ तयेकाळि यवन तेथील । जाऊन तयाने स्वये सुचविले । मग ऐकून शिष्य बोल । आला प्रबळ गर्व धरुनि ॥ ५५ ॥ तव शिवरामस्वामि याणि । नमन करुनि श्रीगुरुचरणि । आरंभीले वग-

त्रुत्व जनीं । अनिर्वचनी ब्रम्हरूप ॥ ५६ ॥ निरास करुनि मायेचा । आत्मा अनुभव स्थापिला साचा । जेथे सौरमु वेदाचा । कोण तयाचा पार वाणी ॥५७॥ श्रवणसमाधि श्रोतियासि । पंडित आला तेवेळेसि । अभिमान बहु त्या द्विजासि । नमस्कार कोणासि न करि तो ॥ ५८ ॥ पंडित पाहुनि सभासदे । अभ्युत्थान दिधले प्रसिद्ध । मधी लोडासि बैसउनि प्रासिद्ध । नमन शुद्ध केले सर्वी ॥ ५९ ॥ परि तो न बोले काहि वाचा । आंगि स्फुंद साक्षात्काराचा । बैसला स्तब्ध तैसाचि साचा । गर्जे देविचा प्रताप बहु ॥ ६० ॥ तव ती न दिसे चौभागी । अदृश्य जाहालि माया जगी । येकात्मता स्थापिली वेगी । धन्य योगी शिवराम ते ॥ ६१ ॥ मग गंगाधरशास्त्री दचकला मनी । लागता जाला स्वामिचरणी । अभीमान त्यजीला ततक्षणी । जोडोनि पाणि उभा ठाकला ॥ ६२ ॥ म्हणे मजला कर पावन । सांप्रदाय आपुला द्यावा पूर्ण । ऐसे वदताचि कृपाघन । बोळले जाण द्विजच्यातकावरि ॥ ६३ ॥ व्हावया तृप्ति काय उसिर । अत्मस्वरुप दाविले त्वरे । देहभाव कैचे उरे । पद्मकर ठेविता शीरि ॥ ६४ ॥ कीर्तन काळि अनुग्रह जाहाला । समाधि लागलि पंडिताला । नये सांगता वाचेला । लिहीता मनाला मनपण नुरे ॥ ६५ ॥ मायामृगजळ गेले सहज । कृपापूर्वेसि उगवता पूर्णद्विज । अद्वैतामृत चकोराद्विज । प्राशिले निज अत्मस्थिति ॥ ६६ ॥ ते स्वसुख अबोलणे । ज्याचा तोचि जाणे खुण । बहिर्मुख काय जाणे । गुरुविणे अंधळा ते ॥ ६७ ॥ जपतपादि वृथा साधनीं । शीणाति उगेचि अज्ञानप्राणी । म्हणूनिया सज्ञानी । आत्म चिंतनीं मन लावावें ॥ ६८ ॥ भरवसा नसे निमिष्याचा । पथ धरावा भक्तिचा । आसो शिवरामे त्या पंडिताचा । उद्धार साचा केला पै ॥ ६९ ॥ यवनादिक सकळजीव । हुमणाबाधेत बोधिले सर्व । ऐशा लिला वर्णिता भावे । न पुरे हाव मनाचे ॥ ७० ॥ आणीक दुसरा चमत्कार । ऐका तुह्मी श्रोते सारे । संतलीला ऐकता सार । जाय असार दुःख दैन्य ॥ ७१ ॥ कल्याण नगराजवळि । बेलबाग अतिचांगलि । पिशाचाने तये स्थाळि ।

वास्ति केलि ब्रह्मराक्षसे ॥ ७२ ॥ शीवराममहाराज सहजस्थिति । रम्य पाहुनि स्थळनिश्चिति । कीर्तन करावे तेथे प्रिति । ऐसे चित्ति वाटले तया ॥ ७३ ॥ शिष्यमंडळिसि सुचउन । निघाले स्वामि करित भजन । टाळचिपळ्या मृदंग जाण । सुस्वर पूर्ण वाजाति पै ॥ ७४ ॥ ध्वज पताका मिरवति । बिल्वबागेत आलि मूर्ति । श्रोते आले श्रवणाप्रति । घोष करिति नामाचा ॥ ७५ ॥ त्रितिय प्रहरामाझारि । कथेसि उभे भवतमारि । अध्यात्मनिरोपण वदे वैखरि । उपमा दुसरि नसे तया ॥ ७६ ॥ श्रवणास्थिति श्रोतयासि । नरनारि तटस्त मानसि । पातले तये समयासि । निश्चयेसि ब्रह्मराक्षस ॥ ७७ ॥ अतिभयंकर विशाळ । करकरा खातसे दंत प्रबळ । उग्र अत्यंत ज्याचे डोळे । झिज्या निवळ सोडिल्या पै ॥ ७८ ॥ अकस्मात उभा ठाकला । शिवरामस्वामिनीं अवलोकिला । ह्मणे कोण रे तूं च्यांडाळा । यया स्थळा वास करिसि ॥ ७९ ॥ तात्काळ त्या साधुदर्शन । जन्मांतराचे जाहाले स्मरण । करिता जाहाला दोषकथन । लोटांगण घालितसे ॥ ८० ॥ शिवरामस्वामिनि गुरुपादुका । कीर्तनि स्थापिल्या होत्या देखा । प्रार्थुनिया तीर्थोदका । शिंचिला नेटका पिशाच तो ॥ ८१ ॥ तात्काळिक समंध तेणे । दुष्टयोनि त्यागिलि जाण । दिव्यदेह प्राप्त होउन । गेला निघोन वैकुंठा ॥ ८२ ॥ अंबऋषिच्या अनुष्टानाचि । जागा पूर्ण बेलबागेचि । तयेस्थानि कीर्तनाचि । लीळा साचि घडलि हे ॥ ८३ ॥ ऐशाकृति अनेक । काय वर्णि मानविरंक । जेथें स्तविति सहस्त्रमुख । आलौकिक साधुस्थिति ॥ ८४ ॥ शिवरामस्वामिचे सहजि भाषण । कर्णि पडता निवती श्रवण । जिकडे करिति आवलोकन । तिकडे पूर्ण आत्मसीद्धि ॥ ८५ ॥ जयाचे बहुत ग्रंथ अभंग । प्रसादिक तयात रंग । होय संतुष्ट पांडुरंग । करि भवभंग भक्ताचा ॥ ८६ ॥ पंचकर्ण जे पाहाति प्राणि । पातक तयाचे जाय जळुनि । मुक्ति लागे तयाचरणि । ज्ञान पाणी वाहे तेथे ॥ ८७ ॥ शीवरामस्वामीचि पाच पदे । पठण करिति जे का शुद्ध । तयासि होउनि आत्मबोध । लाहे पद अक्षै तो ॥ ८८ ॥ शीवराम ऐसे ह्मणता वाचे । दैन्य जाय

जडजीवाचे । ग्रंथ वाचिता जयाचे । कोण तयाचे भाग्य वर्णी ॥ ८९ ॥ जेजे शीवरामसांप्रदाई । भक्ति नांदे तयाहृदई । जवळि राहे जनकजा-बाई । सहीत पाहि जानकि ते ॥ ९० ॥ निगडिकर श्रीरंगनाथ । आणी शीवरामस्वामि यांचा येकपंथ । रामदासादि समर्थ । ऐक्यता सतत सर्वांचि ॥ ९१ ॥ केशवस्वामि निरंजन । अनंदमूर्ति पंडितवामन । जयरामसाधु तुकोबा पूर्ण । निरंतर अभिन्न ईत्यादि ॥ ९२ ॥ परस्परे प्रेमा बहुत । गुह्य गोष्टी सदा बोलत । अठाचहुदिवसा येकांत । करिति निश्चित सर्वदा ॥ ९३ ॥ तयाच्या घेउनि पादुका । जवळि तिष्टत असे निका । कृपामृततुषार लाहाता देखा । लाधलो सुखा सेवेच्या ॥ ९४ ॥ धन्य-धन्य स्वामिचरण । पावलो निजआत्मकल्याण । हृदई होउनि काव्य स्फुरण । होतसे स्तवन यथामति ॥ ९५ ॥ राजारामि प्रसाद होता । बदतसे वाणि संतकथा । असत माया गेलि तत्वता । श्रीसिद्धनाथा नमीतसे ॥ ९६ ॥ भक्तमंजरिमालाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । शिव-रामस्वामिचरित्राते । अध्याय होत दुसरा हा ॥ ९७ ॥ ॥ अध्याय ॥ २ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय येकुणतिसावा ॥ २९ ॥



## अध्याय ३०

### —शिवरामस्वामी—

(पुढें चालू)

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजिअपरंपरा । श्रीगुरुराया परात्परा । अनंत अचळा निर्विकरा । अमरोत्धारा आदि-रूपा ॥१॥ जयजया सित्ध सित्धेश्वरा । सित्धस्वरूपा सित्धवरा । सित्धदाता सित्धपुरा । सिद्धनरेंद्रा सित्धगुरु ॥ २ ॥ जयकमलाक्षा कमलापति । कमलोद्भवताता कमलमूर्ति । कमलविकाशा अत्मगभस्ति । उदयस्फुर्ति हृदय कमळीं ॥ ३ ॥ जयसुरोत्तमा सुरगुरुवर्या । सुरेंद्रस्वामि सुखदा-तया । सुगमभक्ति देउनिया । ठेवीसि पाया सुविच्यारि ॥ ४ ॥

जयपंढरिनिवासा पांडुरंगा । पांडवप्रिया पावन अभंगा । परमात्मया रमारंगा । पाहे निःसंगा कृपादृष्टि ॥ ५ ॥ जयजयाजि जगत्पति । जगविस्तारा जगन्मूर्ति । जळाब्धिवासा जयस्थिति । जघन हाति उभा धरूनि ॥ ६ ॥ भक्तमंजरिप्रियकरमाळा । घालितसे तुझिया गळा । धारण करिता तु घननिळा । जीवनकळा दासाचिये ॥ ७ ॥ वांनरप्रीय रावणारि । लक्ष्मणानुज स्मरता अंतरीं । विज्ञाप्ति परिसता वदवि वैखरि । नरनारि ऐकोत ते ॥ ८ ॥ शिवरामस्वामिचें कथन । अतिउत्तम जें आख्यान । निश्चय धरुनि करिता श्रवण । अघ संपूर्ण जाय लया ॥ ९ ॥ सिंव्हावलोकनइतिहास । कीर्तनीं उद्धारिला ब्रम्हराक्षस । ग्रंथ निर्माण करुनी जगास । तारिले निःशेष बहुप्रिति ॥ १० ॥ अश्विनिकुमार प्रत्यक्षता । अवतार धरिला तेणे तत्वता । अद्भुत तयाचि कृति पाहाता । वाचे वर्णिता सुख होय ॥ ११ ॥ कोणे येके दिनि शिवरामसंत । करावयासि निघाले तीर्थ । शिष्यमंडळिसमवेत । भजन करित अतिहर्षें ॥ १२ ॥ पंढरिसि श्रीपांडुरंगा । भेटले चिद्विलास अभंगा । निरोप मागता संशयभंगा । ब्रम्हलिंगा हासे आले ॥ १३ ॥ भगवान ह्मणति शिवरामा । या पुंडरीकाचा अगाधमहिमा । शिवआदिकरूनि ब्रह्मा । नित्यकर्मा येति येथें ॥ १४ ॥ दत्तात्रय कपिलमुनि । याज्ञवाल्कि शुकज्ञानि । वसिष्ठादि ऋषिश्रेणि । पुंडरीकदर्शनीं सुख तया ॥ १५ ॥ गंगायमुनाभागीरथी । कृष्णावेण्याकुकुत्मति । पुनीत व्हावया येथें येती । धन्य जगति पंढरी हे ॥ १६ ॥ तीर्थें सकळ भुवनत्रईचीं । चंद्रभागेसी येतीं साचीं । जातीं सकळ दुरितें त्यांचीं । सरि यासि नसे कोठे ॥ १७ ॥ तव श्रोतिये केला प्रश्न । तीर्थासि पातक घडले कोठून । तरी ऐका सावधान । सांगे वचन वक्ता तो ॥ १८ ॥ दोषीप्राणि स्नान करिता । मळिन होतीं तीर्थें तत्वता । तें पाप साधुसी पाहाता । जुरे सर्वथा तात्काळि ॥ १९ ॥ यालागी तीर्थें पंढरिसी । येतीं पवित्र व्हावयासि । वैष्णव तेथें मिरासि । करणे संतासि स्नान जेथें ॥ २० ॥ सकळ देशींचीं साधुवृंदे । पंढरीसी येतीं स्वानंदे । तयादर्शनें तीर्थें शुद्ध ।

होति प्रसिद्ध जाणिजे ॥ ॥ २१ ॥ असो भगवान ह्मणति शिवराम-स्वामीते । सकळ तीर्थांसि पंढरी तीर्थ । वैकुंठ सोडुनि आलो येथें । राहिलो संतत पुंडरिकाजवळि ॥ २२ ॥ युगायुगीं अवतार धरीले । दुष्ट दैत्यदानव वधिले । देव सकळ सोडविले । संरक्षिले साधुजना ॥ २३ ॥ परि विश्वोत्धार तैसाचि राहिला । म्हणोनि पातलो या स्थळाला । वरद होउनि पुंडरिकाला । वाढाविला भाक्तियोग ॥ २४ ॥ मोक्षसत्र घालुनि पाहि । तिष्टत राहिलो ययाठाई । ऐसे स्थळ कोठे नाहि । विच्यारुनि ह्वदई ठेविले म्या ॥ २५ ॥ तरि तुम्हि सकळसंत । पंढरिसि असावे निश्चित । ऐसे बोलेत रुक्मिणिकांत । सद्गद चिते पांडुरंग ॥२६॥ शिवराम वदती देवासी । तुम्हिच सांगता हिंडावयासी । भेटुनिया जडजीवासी । उपासनेसी स्थापावया ॥ २७ ॥ तेंव्हा बोले देवराणा । जो का वंद्य शास्त्र पुराणा । ह्मणे चातुर्मास्य या स्थाना । करावे कीर्तना सर्वत्रि ॥ २८ ॥ कीर्तनसुखासाठीं बराडी । पुंडरीकाचे द्वार झाडी । भक्तगृहीं धुतो लुगडीं । आणिक परवडि काय सांगु ॥ २९ ॥ यालागी न जावे अन्यतीर्था । वाळवंटीं करणे कथा । तेणे होय कृतकृत्यता । सार्थकता या पंढरीं ॥ ३० ॥ रामदासादी येतील आतां । कीर्तनरंग माजेल तत्वता । आठवण होईल तुमचि या चित्ता । चैन सर्वथा न पडे मज ॥ ३१ ॥ भक्तभूषण वदता ऐसे । आनंद जाहाला शिवरामस्वामीस । राहाते जाहले पंढरीस । च्यारमास प्रितीनें ॥ ३२ ॥ माहाद्वारीं गरुड-पार । कीर्तन होतसे तृतियप्रहरी । प्रगटायमान श्रीहरि । विटेवरी परिपूर्ण ॥ ३३ ॥ शिवरामस्वामीचें वगतृत्व । ऐकुनी डोलती संत सर्व । ऐका तयांचीं पवित्र नांवें । श्रवणें वैभव सकळ जीवा ॥ ३४ ॥ श्रीरामदास आणि शिष्य कल्याण । आदिकरुनि मंडळी जाण । रंगनाथस्वामी अत्यानिधान । गुरुकृष्णजयराम ते ॥ ३५ ॥ आनंदमूर्ति रामउपासक । गाणपत्य निरंजन देख । सर्वज्ञ वामनपंडित निके । तुकाराम भाविक आत्मनिष्ट ॥ ३६ ॥ केशवस्वामी शिवदिनकेसरी । भवगजाते जो का विदारी । नानाविध

संत निर्धारी । कीर्तनाभितरी येती सारे ॥ ३७ ॥ समारंभ तो वर्णू जाता । वाच्या पावति तन्मयता । जीये कथेत प्रत्यक्षता । उभा सर्वथा पांडुरंग ॥ ३८ ॥ भावाळवृत्धा समाधि । नाहीं देह्याची कवणा शुत्धि । धन्यसाधु शिवराम त्रिशुत्धि । आत्मासीत्वि प्रेमळता ॥ ३९ ॥ सांग करूनि चातुर्मास्य । प्रार्थुनि श्रीरुक्मीणिविलास । आले शिवराम कल्याणास । स्वमठात भजनिरत ॥ ४० ॥ पुढे कांहीं काळेकरून । संच्यारार्थ निघाले जाण । वास्तव्यग्राम ज्या कल्याण । ईछिति कल्याण जनाचे ॥४१॥ शिवराम माहाराज शिष्यासहीत । विचरति मार्गी भजन करित । ध्वज पताका संगे मिरवत । मंडळी बहुत प्रेमळ ती ॥४२॥ समुद्रस्नानास जाता वाटे । ग्राम लागले वास्तिस धाकुटे । तेथे वर्तले अति चोखट । श्रवणे संकट टळे पै ॥ ४३ ॥ येकायेकि रात्रौ तेथे । तस्कर पातले हरणाचिते । लुटोनी सकळ पदार्थ । पळती त्वरित निष्टूर ते ॥ ४४ ॥ नाही ठेविली काही चिंधी । निशेष हरिले तये संधी । निश्चळता होती समाधी । नेणे विधी जाहला तो ॥ ४५ ॥ गेल्यावरी निशाचर । स्वामी आले देह्यावर । सांगते जाहले शिष्य सारे । घडला विच्यार तो सकळ ॥ ४६ ॥ ऐकूनि श्रीदयामूर्ति । हस्यवदने शिष्यास म्हणति । घातिले नाही भोजनाप्रती । दवडिले निश्चिति चोरासि त्या ॥ ४७ ॥ अपरात्रीं उपोशित । आले असतील दूरि चालत । अन्न असता बिराडी बहुत । वाढिले निश्चित नाही तया ॥ ४८ ॥ लाभहाणि नेमिल्या सारिखी । हे तो गोष्टि शास्त्रिची निकी । कासया जाहाला उगाचि दुःखी । असावे सुखी सुविच्यारे ॥ ४९ ॥ ऐकुनि ऐसे मंडळीत । आश्चिर्य वाटले मनात । धन्य स्वामि शिवरामसंत । नाहीं द्वैत ज्यालागी ॥५०॥ इकडे चोराची गति कैसी । जाहाली परिसा सुमानसी । आंधळे जाहाले निश्चयेसी । न दिसे द्रिष्टिसी कवणाचे ॥५१॥ ठाई ठाई अडखळती । धडाधड वाटे सापडति । सरोनि गेली सकळ राती । पावला गभस्ती उदयाते ॥ ५२ ॥ जे जे भेटती पांथस्त जन । तयासी सांगती वर्तमान । पश्चाताप होउनी पूर्ण । आले निवोन

माघारे ॥५३॥ शिवरामस्वामि होते जेथे । तये स्थळी पातले समस्त । जाहाले सविस्तर निवेदित । नमन करित अनन्य ॥ ५४ ॥ म्हणती स्वामिया नेत्र द्यावे । जाहाले अन्याय क्षमा व्हावे । द्रव्य आपुले सकळ घ्यावे । जीवदान करावे स्वामिया ॥ ५५ ॥ करुणा भाकिता दीन वचनी । शिवरामस्वामि कळवळले मनीं । कृपामृत पाहाता नैनीं । तेचि क्षणीं दिसों लागले ॥ ५६ ॥ तस्कर लागले पायासी । वैराग्य जाहाले चोरासी । म्हणती माहाराज अनाथासी । लावा भक्तिसी दयासागरा ॥ ५७ ॥ त्यजुनी आपुली दुष्टबुद्धि । हात जोडिले त्रिशुद्धि । अनन्य होता आत्मसिद्धि । कृपानिधि करिति तया ॥ ५८ ॥ अश्वासोनि तात्काळी । रामनाम ह्मणावया आज्ञा केली । भोजन देउनि तया सकळी । आत्ममेळी मेळविले ॥ ५९ ॥ ऐसे महाराजशिवरामसाधु । तस्करासी त्या केला बोधु । मूर्तिमंत सच्चिदानंदु । क्षमासिंधु अवतरला ॥ ६० ॥ कोणे येके दिनीं निर्गुणपुरासी । जावे ऐसे वाटले मानसी । घेउनी संगे शिष्यासी । ज्ञानरासि निघाले ॥ ६१ ॥ इकडे निगडिसी त्या माहान्नपंडित । नाम जयाचे विश्वनाथ । आले ऐकुनी श्रीरंग कीर्ति ते । अत्मज्ञानार्थ ईछा जया ॥ ६२ ॥ प्रश्न करिती कडोविकडी । बैसले श्रीकृष्णेचे पैलथडी । स्वामि पातले तेचिघडी । सुखपरवडी ज्यावेळे ॥ ६३ ॥ मग हर्ष सांगणे किती । नये वर्णिता वाचेहाती । परस्परे आलिंगन देती । ऐक्यप्रीति उभयता ॥ ६४ ॥ पंडितासि त्या रंगमूर्तिने । करावयासी सुचविले प्रश्न । करूनि तेणे साष्टांगनमन । शिवरामचरण धरियेले ॥ ६५ ॥ हस्य करूनि स्वामि वदति । रंगराया दवडा भ्रांति । प्रगट करूनि आत्मज्योति । पंडिताप्रति उपदेश करा ॥ ६६ ॥ रंगनाथ ह्मणति हेत आमुचा । संशय हरावा तुह्मि या द्विजाचा । अनुग्रह करुनी पूर्ण साचा । अनुभवाचा योग करा ॥ ६७ ॥ ऋणानुबंध मुळिचा पाही । सुचविता ऐसे ठाई । मग नमन करूनि श्रीरंगपाई । बैसले साहि असनावरी ॥ ६८ ॥ शिवरामस्वामि आणि रंगनाथ । येक-

संप्रदाई उभयता निश्चित । तेथे कैचे पाहाता द्वैत । मूर्तिमंत ईश्वर जे ॥ ६९ ॥ अभेद स्वरूप तेचि येक । इतर सोंगे माईक डांभिक । जया नाही स्वात्मविवेक । बहिर्मुख प्राणि जे ॥ ७० ॥ आपण बुडोनी जगा बुडविती । अनुग्रह जाउनी बळेचि देती । सेवटी होतसे फजिती । आत्मप्राप्ति कैचि तया ॥ ७१ ॥ नेणे भक्ति नवविध । गुरुकृपा कैचि शुद्ध । धरुनिया सोंग विविध । हिंडती मंदबुध्धि ते ॥ ७२ ॥ देवार्चनादि मांडुनि पसारा । उपदेश करिती रांडापोरा । भोंदिति भोळी भराया उदरा । केला मातेरा परमार्थाचा ॥ ७३ ॥ असो तया अज्ञानाचे । दोष वर्णिता शीण वाचे । गाउ चरित्र शिवरामस्वामीचे । जेणे मनाचे समाधान ॥ ७४ ॥ विश्वनाथ-शास्त्रज्ञाते । मेळविले स्वरूपी निश्चीत । धन्य महाराज शिवरामसंत । भ्रांति असत दवडिली ती ॥ ७५ ॥ करूनि पूर्ण स्वरूपोन्मुख । देहबुध्धिचा दवडिला कळंक । येकात्मतेचे सामराज्यचोख । दिधले सुख विश्वनाथा ॥ ७६ ॥ निज आत्मता लाहोन । पंडित जाहाला ज्ञानसंपन्न । धन्यधन्य साधुचरण । गेला अभिमान तात्काळी ॥ ७७ ॥ ऐशा पाहाता अनेक लीला । काय वदवेल या पामराला । पूर्ण योगी अवतरला । प्रताप आगळा शिवरामी ॥ ७८ ॥ अश्विनीकुमार वैद्य देवाचे । अवतरण तेणे केले साचे । मृत्यलोकी भवरोगाचे । भय जीवाचे हरावया ॥ ७९ ॥ तव श्रोती केला प्रश्न । पिंडी तयाचे स्थान कोण । तो ईतिहास करिता कथन । मानसी पूर्ण सुख वाचे ॥ ८० ॥ श्रोत्याचा आदर । अंतःकर्णास आनंद थोर । आठउनी हृदई श्रीगुरुवर । करणे उत्तर यथामति ॥ ८१ ॥ नमन करुनी सिध्धपदी । भावे नमिता वैष्णवमांदि । अध्यात्मपद्धति प्रसवे बुध्धी । श्रोते आधीं ते ऐका ॥ ८२ ॥ अंगुष्टापासुनी मस्तकपर्यंत । सकळ देवता विराजित । अश्विनीकुमार निश्चित । स्थान शोभत नासिका तया ॥ ८३ ॥ सोहं स्फुरण जो का समीर । उजवा सूर्य डावा चंद्र । नासापुडी तो निर्धार । अश्विनीकुमार देववैद्य ॥ ८४ ॥ करिता तयाचे अराधन । यथाविधि

वायु धारण । स्वरोदई सांगितले पूर्ण । गुरुखुण पाहिजे तया ॥ ८५ ॥ तेणेकरूनि भवरोगादि । पळती सकळ आधिव्याधि । होउनी तात्काळ ब्रह्मसिध्धि । होय त्रिशुद्धि पावन तो ॥ ८६ ॥ ब्राह्मणाचे मुख्यबीज । प्राणायाम तेचि गुज । ज्यालंद्रादि योगीराज । राहिले सहज तयेस्थिति ॥ ८७ ॥ जेजे जाहाले भक्तजनी । अश्विनिकुमार जाणिला तयानी । तो हा अवतार जाहला धरणी । नामे करुनि शीव-राम ॥ ८८ ॥ दाविले जेणे पिंडब्रह्मांड । ब्रह्मांडात दिसे पिंड । माया अविद्या दवडुनी बंड । दाविली प्रचंड निजआत्मकळा ॥ ८९ ॥ अश्विनीकुमार आवळेजावळे । म्हणूनी द्वयनाम शिवराम भले । द्वैत जेणे विध्वंसिले । प्रेम स्थापिले भक्तीचें ॥ ९० ॥ भक्त म्हणजे नोव्हे विभक्त । येक त्वंपदी जो नांदत । अश्विनीकुमार तो सिद्धांत । असोनी द्वैत अभेद ते ॥ ९१ ॥ मायाब्रह्म क्षर अक्षर । जीवशिव येक निर्धार । इडापिंगला विच्यार । ऐक्य साच्यार सर्वदा ॥ ९२ ॥ हकारि निर्गत सकारि प्रवेश । तोचि पूर्ण योगविलास । अनुभवी जाणती या पदास । वैद्यास भवरोगाचे ॥ ९३ ॥ तत्ववेते योगेश्वर । अखंड अभ्यास करिती थोर । दाविला तिहीं अश्विनीकुमार । ज्ञानसमुद्र परिपूर्ण ते ॥ ९४ ॥ अगाधलीला सिध्धकृपेची । वर्णिती चरित्रे संताचीं । माउली जन्मली साधकाची । ब्रह्मादिकाचि कुळदेवता ॥ ९५ ॥ विष्णूचि नाभि विरंचि जन्मला । तयाचे अराध्य शिव जो भोळा । तयाचा अवतार मारुति भला । रामदास जाला कलीत तो ॥९६॥ पुन्हा अवतरोनि तेणे । ग्रंथ निर्माण करविला जाण । करावया सकळ कल्याण । शिष्य कल्याण तया हाते ॥९७॥ कल्याण नगरात स्वामिशिवराम । तयाचे चरित्र वदविले परम । जेणे पुरती इछितकाम । नुरे कामक्रोधादि ॥ ९८ ॥ धन्य समर्थ सिद्धनाथ । काय वदू तयाची मात । राजारामी विराले चित्त । केले सनाथ तात्काळी ॥ ९९ ॥ शीवरामस्वामींचे जन्मांतर । गुरुकृपे कळले साचार । केला जेणे विश्वोत्धार । लीला फार तयाचि ॥ १०० ॥ संक्षेप विच्यारलीले काही । सविस्तर कथिता न पुरे मही । समाधिस्त

जाहाले पाही । दिवस तोहि एकिजे आता ॥ १०१ ॥ सोळाशे शके शालिवाहन । वरुता येक आणिक जाण । संवत्सरासी नामाभिधान । आनंद जन बोलती पै ॥ १०२ ॥ आनंदाचा जो का कंद । शिवरामस्वामी तो प्रसिद्ध । संवत्सर म्हणून तो शुद्ध । जाहाला सिद्ध समाधिसी ॥ १०३ ॥ माघमास शुक्लतिथी । दशमी ऐसे जियेसी म्हणती । दश-दिशा आत्मस्थिती । शिवरामदीप्ति ते काळी ॥ १०४ ॥ दशइंद्रिया येकवटोन । शिवरामसमर्थे केले प्रयाण । पुण्यतिथी ते पावन । होय श्रवणे सुख जया ॥ १०५ ॥ पुण्यभूमि कल्याणनगर । प्रतिवर्षी उत्साह थोर । यात्रा मिळती आपार । कीर्तन गजर होतसे पै ॥ १०६ ॥ पूर्णा-नंद गुरु ज्याचा । तेथे अपूर्ण विधि कैचा । घोट भरला लिंग देहाचा । प्रताप तयाचा न वर्णवे ॥ १०७ ॥ पुण्यतिथीचे दिवसी । चमत्कार होती समाधिपासी । जे जे ईछा ज्यामानसी । वैकुंठविलासी पूर्ण करी ॥ १०८ ॥ प्रदक्षणा नमस्कार । जे का करिती नारीनर । तयाची ते कामना पुरे । नासती गिरिवर पातकाचे ॥ १०९ ॥ क्षय अपस्मारादि रोग विविध । भूतपिशाच्च ब्राह्मणसमंध । अनेकबाधा जाउनी शुध्द । होय प्रसिध्द समाधिकृपा ॥ ११० ॥ शिवरामस्वामींचे संप्रदाई । जाहाले पुढे होणार पाही । तयाचे निरंतर माथा पाई । ध्याई ह्रदई निजचरण ॥ १११ ॥ यथामति स्फुरेल तितुके । शिवरामचरित्र वर्णिले देख । अध्यायत्रै त्रिगुणात्मक । अर्पिले चोख भगवत्पदी ॥ ११२ ॥ सद्गुरुसिद्ध कृपासमर्थ । राजारामी जडलि प्रीत । मंजरीमाला होतसे ग्रंथ । श्री रघुनाथ करविता तो ॥ ११३ ॥ आता यानंतर कथासार । नव-नाथ साधु थोर । तयाचे वर्णिले असे चरित्र । ऐकता श्रोत्र सुखावती ॥ ११४ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । शिवराम स्वामिचरित्राते । अध्याय समाप्त तिसरा हा ॥ ११५ ॥ ३ ॥ ३० ॥ आध्याय ॥ ३ ॥ अनुक्रमे आध्याय तिसावा ॥ ३० ॥

॥ ( समाप्तः ) ॥



## अध्याय ३१

### —नवनाथ—

॥ श्रीरामसमर्थ ॥ श्रीगणेशायनमः ॥ जय जय सद्गुरु सिद्ध स्वामिया । स्वात्मसुख विलासिया । अज अव्यय अप्रमेया । करुणालया श्रीमूर्ति ॥ १ ॥ सच्चिदानंद पदत्रई । येकात्मता संचलि पाहि । आपी-आप सर्वांठांई । ही नवाई तव निजकृपे ॥२॥ स्वानुभवें स्वरूपस्थिति । निमग्न असतां सदावृत्ति । चेववोनि वाचे हाति । बोलविति संतकथा ॥ ३ ॥ ज्यागृति स्वप्न सुषुप्तित । न स्फुरे कांहीं आणीक द्वैत । रंगोनि गेलि साधुकथे । अंतःकर्ण चित मन बुद्धि ॥ ४ ॥ तरि नवनाथभक्त-मेळि । अवतरले जे भूमंडळिं । ती आजी कथा सांगा समुळी । हृत्कमळीं बैसोनि स्वयें ॥ ५ ॥ जन्मोजन्मी पाळोनि लाड । जिवीचे पुरविले सकळ कोड । कृपाजीवनें फुटला मोड । हृदई सदृढ भूमिकेसि ॥ ६ ॥ भक्त हे चि तुळसिदळ । तेणें पुजावी श्रीपाउलें । यालागी शरीर असे धरिले । दीनदयाळ गुरुमाये ॥ ७ ॥ प्रार्थना परिसोनि सिद्धमि । प्रगट जाहाले अंतर्यामि । तरि नाथचरित्र श्रोते तुम्ही । हृदयपद्मी धरिजे ते ॥ ८ ॥ सोळा सिद्ध नव नाथ । अकरा रुद्र द्वादशादित्य । इत्यादि देवतागण समस्त । वर्णिले ग्रंथांत व्यासानीं ॥ ९ ॥ असो ते शिवांश नवनाथ । तारावया जडजीवातें । अवतार घेतले भूमंडळातें । अनुक्रमे ते श्रवण करा ॥ १० ॥ ते ते नाथ कोण कोण । ग्रंथी वर्णिलीं नामें जाण । ऐकताति जन पावन । म्हणूनि लेखन करणे पै ॥ ११ ॥ भूतनाथ आदिनाथ । आनंदपूर्ण तिसरा समर्थ । सिद्धशांबरि चतुर्थ । सहजानंद पाचवा तो ॥ १२ ॥ साहावा नाथ निसिमानंद । धीरानंद सप्तम प्रसिद्ध । आठवा तो अनादिसिद्ध । नवम शुद्ध गुरुमूर्ति ॥ १३ ॥ ऐसे हे नवविधनाथ । तेचि जाहाले कलींत संत । नामाभिधाने लीला किंचित । इया ग्रंथात अनुवादु ॥ १४ ॥ नक्षत्रे उगवति अपैसि । येकामागे येक जैसि । नवनाथमालिका जन्मलि तैसि । याभूमिसि

कलिमाजीं ॥ १५ ॥ श्रीगुरुभक्ति वाढवून । जगदोध्दार केला जाण । साधुसमर्थ तत्वज्ञ । नामाभिदाने सुंदर तीं ॥ १६ ॥ श्रीज्ञानेश्वराचा शिष्य प्रांजळ । नाम प्रथम तो सत्यामळ । सत्यामळाचा सोज्वळ । बोलिजेल गैबि तो ॥ १७ ॥ गुप्तनाथ तो तृतीय पाहि । अनुसरला गैबीचे पाइ । उद्बोधनाथ चवथा विदेही । प्रबोधिला ह्रदइ गुप्तनाथें ॥ १८ ॥ उद्बोधाचा अनुग्रहीत केशरी । भवगजाते जो विदारी । साहावा शिवदिन सातवा नरहरी । लक्ष्मण निर्धारी आठवा तो ॥ १९ ॥ मल्हारनाथ नव्वा पवित्र । उद्बोधउदरी जन्मला सुपुत्र । परी हे मुळीचे स्वतंत्र । नववीधतंत्रमालिका ॥ २० ॥ अनुक्रमे तयाचि कथा । यथामती वर्णिजे ग्रंथा । सिध्द होउनि सादरता । असावे श्रोता श्रवणासी ॥ २१ ॥ श्रीज्ञानराजभगवान् । विष्णूचा अवतार प्रत्यक्ष जाण । तयाचा अनुग्रह जाहला पूर्ण । ज्ञानसंपन्न सत्यामळा ॥ २२ ॥ वर्णू जाता तयाचि स्थिति । वाचा चारी मौनावती । विजनी वास जाचा निश्चिति । अखंड वृत्ती तन्मय ते ॥ २३ ॥ तेथे गैबिनाथ योगनिष्ठ । अरण्यात पातले सहजी स्पष्ठ । दर्शनमात्रे हरले कष्ठ । सत्यामळ भेट होताची ॥ २४ ॥ तात्काळ अनुग्रह घेउनि । अवधूत वेश धरिला गैबिनि । संच्यार करिते जाले मेदिनि । स्वईछा मनि हिंडति ॥ २५ ॥ तीर्थ क्षेत्र उपवने । पर्वत दऱ्या निबीड स्थाने । तेथे वसति सच्चिदूघन । नाथ पूर्ण गैबी तो ॥ २६ ॥ सिंव्ह शार्दूल भोवते फिरति । मयुरादिक नृत्य करिति । परी निर्भय ज्याचि स्थिति । क्रिडा करिति स्वानंदे ॥ २७ ॥ ऐसियापरि भ्रमण करीत । जडजीवाते उद्धरीत । बालोन्मत्त पिशाचवत । गैबिनाथ फीरति पै ॥ २८ ॥ आता गुप्तनाथ याचे कथन । तेहि लीला अद्भुत पूर्ण । श्रोतिये देउनि अवधान । करा श्रवण परमप्रिति ॥ २९ ॥ राशनग्रामी देशलेखक । ऋग्वेदि ब्राह्मण पुण्यश्लोक । तयाचे उदरि जन्मलि देख । कंन्या सुरेख गंगा नाम्नी ॥ ३० ॥ कुमारवयात अनुताप होता । भविष्य कथिता जाहाला पिता । षोडशवर्षे प्राप्त होता । वीध्वा होईल म्हणूनि ॥ ३१ ॥ ऋणानबंधे करून । पुढे तैसेचि घडले

जाण । मग वैराग्य वरिले पूर्ण । गंगाबाईने ततक्षणि ॥ ३२ ॥ ज्ञानेश्वरिचा पाठ करावा । संत समुच्चय भोवता मिळावा । क्षणक्षणा देहभावा । विसर पडावा अर्थ करिता ॥ ३३ ॥ ऐसियापरि रात्रंदिवस । भजनी रंगुनि गेले मानस । अश्रुधारा येति नेत्रास । भाव अंगास अष्टै ते ॥ ३४ ॥ तेथे उद्धव नामे ब्राह्मण । प्रत्यही येतसे कराया श्रवण । पिता तयाचा भाविक पूर्ण । मल्हार जन म्हणति तया ॥३५॥ यजुर्वेदीशाखा वाजसनि । उपनाम टीपसे वदति जनि । च्यारपुत्र तया लागुनि । त्यात सुलक्षणि उद्धव तो ॥३६॥ जैसे केतकी पुष्पातील । लघुपत्र ते अतिचांगले । तयापरि हे प्रेमळभले । उद्धव निर्मळ समर्थ पै ॥ ३७ ॥ तयानि गंगाबाईजवळ त्या । निरंतर असावे सर्वथा । ज्ञानेश्वरिच्या ऐकुनि अर्था । वैराग्य हाता आले पै ॥ ३८ ॥ भजन करणे येकांति । नामस्मरणि रंगलि वृत्ति । निजध्यास त्या उद्धवचिति । स्वरूपास्थिति भोगावया ॥ ३९ ॥ तव सिंह रासिस गुरु आला । गंगाबाई चालिली श्रीगंगेला । यात्रा समुच्चय बहु मिळाला । भजन सोहळा अनोपम्य ॥४०॥ तयात मल्हार नाईक याचे । चिरंजीव नाम जयाचे पूर्ण उद्धव । जनक जननि वंदुनि भावे । निघाले पर्व जाणुनि ॥ ४१ ॥ राक्षसभुवन क्षेत्रिचा । पंथ धरिला उत्तम साचा । गजर होतसे भजनाचा । घोष वाद्याचा अनेक तो ॥ ४२ ॥ गंगाबाईनि काहीयेक । येकटेचि असावे मागे देख । काजे हृदईचा निजविवेक । अर्थासुख ज्ञानेश्वरिच्या ॥ ४३ ॥ जीव जंतुसि मार्गी पाहात । शनैः शनैः पंथ चालत । अंतरबाह्य आत्मा न्याहाळीत । हिंसा तेथे मग कैचि ॥ ४४ ॥ अहिंसेचे रूप करिता । मनासि होय तादात्म्यता । असो गंगाई गंगेसि जाता । राहे तत्वता मागेचि ॥ ४५ ॥ आदिकरूनि उद्धवबाबा । मंडळी थाट ते पुढे बरवा । अटाहस्ये आळउनि देवा । गाति बरवा धरुनि मनि ॥ ४६ ॥ ऐसिया परि चालता पंथ । वर्तते जाहाले अपूर्व बहुत । येकायेकी प्रगटले समर्थ । गैबीनाथ वाटेसि ॥ ४७ ॥ चमत्कार अद्भुत तेथे जाहाला । ऐकावा तो श्रोतिये भला । स्त्रियेचाचि पुरुष केला । ततो लिला अगाध

पैं ॥ ४८ ॥ वटवृक्षातळवटि । श्रीदत्तात्रयापरि दिधली भेटि । तात्काळिक हित गुजगोष्टि । ऐकता त्रिपुटि मावळलि ॥ ४९ ॥ जेवी कर्पुरवन्हि येकवटिला । अवघाचि जाहाला बंबाळा । ज्ञानचंद्रांश तैसा उदेला । प्रकाश पडला अद्वैत ॥ ५० ॥ की दिपि दीप भेटो जाता । निमाली तेथे द्वंद्ववार्ता । नातरि मिनल्या दोन्ही सरिता । उदक तत्वता कोण निवडि ॥ ५१ ॥ गुरुशिष्य द्वैतभाव । हे तो मुळीच मिथ्या वाव । ऐक्यसुखाचि राणिव । सोहंभाव सर्वांभुति ॥ ५२ ॥ आसो गंगाबाईचा स्वभाव पहिला । पुरुषवेश होता धरिला । मस्तकी रुमाल बांधुनि भला । अंगरखा घातिला अंगी तो ॥ ५३ ॥ गोपीचंदन लाउनि भाळि । तुळसिमाळा कंठि घातलि । तेणे तनु बहु शोभलि । मुद्रावाळि सुंदर त्या ॥ ५४ ॥ हे पाहुनि गैबीनाथ । वाणी वदलि सुनिश्चित । सुखिया जालासि सख्या निश्चित । स्वरूप निवांत भोगी तु ॥ ५५ ॥ ऐसे म्हणताचि त्या अवसरी । पुरुष जाहाला आसता नारी । गंगाबाई दचकलि अंतरि । विस्मय करी मनात ॥ ५६ ॥ अघटीत करणि श्रीगुरुचि । लीला दाविली अद्भुत साचि । असता तनु स्त्रीयेचि । केलि पुरुषाचि तात्काळ ॥ ५७ ॥ गंगाबाईसि गुप्तनाथनाम । ठेविते जाले चित्सुखधाम । आणी तेचिक्षणी पुर्णकाम । गैबीनाथ परम गुप्त जाहाले ॥ ५८ ॥ मग गुप्तनाथ नाम पावलि । गंगाबाई पुरुष जाहालि । तयासि खंति बहुत वाटलि । अदृश्य जाहाली गुरुमाय म्हणूनि ॥ ५९ ॥ खळखळा नेत्रि अश्रु वाहति । लोळण धातिलि भूमिवरति । स्तवन अरंभीले निगुति । गुप्तनाथी ते वेळा ॥ ६० ॥ म्हणे जयजयाजि करुणासिंधु । अनाथ नाथा दीनबंधु । द्वैताद्वैत सारूनि भेदु । अक्षई अनंदु दिधला ॥ ६१ ॥ प्रकृतिपुरुष येकवटला । मायानदीचा घोट भरला । अत्माराम भेटवीला । दीनदयाळा मजमाजी ॥ ६२ ॥ आता नुपेक्षी गुरुआई । नेणे दैवत दुजे काही । तनुमनभाव वेधिला पाई । दर्शन देई स्वामिया ॥ ६३ ॥ उशीर लाविसि जरी जाण । जाउ पाहाति माझे प्राण । तरि दाखवा वेगीचरण । करि रक्षण ब्रिदावळि

॥ ६४ ॥ ऐसी पाहाता निर्वाण भक्ति । कळवळले हृदई श्रीगुरुमूर्ति । पुन्हा दर्शन दिधले प्रिति । अनुभवस्थिति गैबिनाथ ॥ ६५ ॥ मग तो आनंद सांगणें कीति । संतोषले गुप्तनाथ चिति । अनन्यभावे नमन करिति । सांष्टागोक्ति प्रेमभरे ॥ ६६ ॥ यथासांग करुनि पुजन । प्रार्थीयेला श्रीदयाघन । तयेकाळि दिधले वचन । गैबिदयाघनस्वामिनि ॥ ६७ ॥ म्हणति स्मरण करिसि तेंव्हा होईन प्रगट । वियोगाचा न मानि विट । अंतर्बाह्य लखलखाट । स्वरूप दाट मिच पै ॥ ६८ ॥ ऐसे सांगुनि गुप्तनाथासि । अंतर्धान पावले सच्चिद्विलासि । गैबिनाथ प्रगटले पंढरिसि । भेट संतासि दिधलि ते ॥ ६९ ॥ इकडे गुप्तनाथ मार्गाने । निघाले वटवृक्षाखालून । स्वामिनि दिधले जेथे दर्शन । करुनि नमन त्या स्थळा ॥ ७० ॥ तव उद्धव बावासहित । यात्रा पुढे वाट पाहात । म्हणति गंगाबाईसि कीमर्थ । उसिर बहुत लागला आजि ॥ ७१ ॥ ऐसे म्हणतात सकळ मंडळि । तो गुप्तनाथ पातले जवळि । अवलोकिता नेत्रकमळि । चाकाटलि सर्वत्र ॥ ७२ ॥ दैदिप्यमान सतेजपुरुष । पाहाता विस्मय करिति मनास । नमन करुनि पायास । वर्तमानास पुसति पै ॥ ७३ ॥ तव तेथे स्मरण कैचे । विस्मरण जाहाले पूर्वस्थितिचे । नवलमाहात्म गुरुकृपेचे । कोण तयाचे भाग्य वर्णि ॥ ७४ ॥ परि उद्धवबावाचा प्रेमा फार । नमन करूनि पसरिला पदर । तयेकाळि श्रीगुरुवर । सांगति विच्यार गुप्तनाथ ॥७५॥ म्हणति उद्धवद्विजा काय सांगणे । वाचेलागि जेथें मौन । सबाह्य दाटला परिपूर्ण । सच्चिद्घन गैबिनाथु ॥ ७६ ॥ माझे स्त्रियेत्व करूनि गुप्त । नाम ठेविले गुप्तनाथ । वटवृक्षाताळि गुप्त । जाहाले निश्चित माहाराज ते ॥ ७७ ॥ ऐसे ऐकोनि उद्धवबावानि । मिठि घातलि सदृढ चरणी । प्रेमाश्रु श्रवति नैनि । अभिषेक चरणी होतसे पै ॥ ७८ ॥ ह्मणे स्वामिया श्रीगुरुमूर्ति । माझी आता कोण गति । तयेवेळी शांत-विति । उद्धवाप्रति गुप्तनाथ ॥ ७९ ॥ अभयवचने गौरउन । कृपाकरे पुसिले नैन । सांगितले पुढील कारण । कर दर्शन म्हणानि ॥ ८० ॥

मग समागमे उद्धव आनंदेसि । जाते जाहाले गंगेसि । राक्षसभुवन-क्षेत्रासि । मंडळीसि नाथ गेले ॥ ८१ ॥ तव तेथे निजप्रांतातिल । गंगास्नानासि जन मिळाले । गंगाबाईसि वोळखिले । करिति नवल नरनारी ॥ ८२ ॥ धन्य म्हणति साधुलीला । स्त्रीयेचा तो पुरुष जाहाला । आसो गुप्तनाथे सांग केला । तीर्थ विधि भला जनरिति ॥ ८३ ॥ पुढे क्रम कैसा घडला । तो ऐका विवेक सोहळा । उद्धव-बावासि अनुताप जाहाला । उत्पन्न जाहाला विच्यार तो ॥ ८४ ॥ गुप्तनाथासि वारंवार । क्षणक्षणा पसरावा पदर । ह्मणे दाखवा श्रीगुरुवर । गैबिनाथ थोर तुमचा तो ॥ ८५ ॥ चैन न पडे कोठे काहि । प्राण न राहाति माझे देहि । मज मी भेटेन वाटे कई । हेचि ह्रदई चिंतन ते ॥ ८६ ॥ विन्हळ पाहुनि अंतःकर्ण । कळवळले गुप्तनाथ पूर्ण । गैबिनाथाचे केले स्मरण । ह्मणति वचन खरे करा ॥ ८७ ॥ स्मरता भेटि देईन वदला । तरि आजि येथे दावा पाउला । ऐसे बोलताचि ते वेळा । समर्थ पातला गैबिनाथु ॥ ८८ ॥ सईलीशींगी गळा गोदडि । शोभे हस्तकि सुंदर फावडि । अद्वयनिशाण झळके गुडि । मुखी आवडी गुरुस्मरण ॥ ८९ ॥ ऐशापरि ध्यान अद्भुत । प्रगटले नाथ गैबि अवधुत । मूर्तिमंत जैसे दत्त । तैसे दिसत सर्वासि ॥ ९० ॥ मग गुप्तनाथे जोडुनि हात । प्रार्थियेला श्रीसद्गुरुनाथ । उद्धवाचे उद्विग्न चित्त । स्वरूप निवांत भोगावया ॥ ९१ ॥ सुचविता ऐसे गैबिनाथा । आनंद जाहाला बहु तत्वता । ह्मणति उसीर लाविसि कां आता । करि कृतार्था तुचि तया ॥ ९२ ॥ आज्ञापिता गैबिनाथानि । उत्तम ह्मणूनि जोडिले पाणि । उद्धवबावासि तेचिक्षणि । गुप्तनाथे कार्णि उपदेशिले ॥ ९३ ॥ नाम ठेउनि उद्बोध । स्वरूपी मेळविले शुध्ध । ते सुख वर्णिता सिद्ध । निर्द्वंद परिपूर्ण ॥ ९४ ॥ जेथे नेणीव प्रासुनी जाणीव गेलि । चित्कळा तेथे प्रकाशलि । सोहं स्फुर्ति मावळलि । द्रिष्टि उघडली येकसरा ॥ ९५ ॥ जीवशीव कैचे काई । क्षराक्षर पुसिले ठाई । शिष्यत्व विराले श्रीगुरुपाई । जोडिले ह्रदई अद्वयसुख ॥ ९६ ॥

अनुभव आबोलणा । उन्मनी वरितसे लीहिता मना । वळेंचि तुर्येंचे जातसे सदना । करणे स्तवना म्हणोनि ॥ ९७ ॥ असो उद्धव बावासि अनुग्रह जाहाला । उद्बोध नाम ठेविले त्याचि वेळा । मग निघाले स्वदेशाला । राशनग्रामाला गुप्तनाथ ॥ ९८ ॥ उद्बोधनाथासहित । समागमे मंडळि बहुत । नामस्मरणे गजर होत । नृत्य करीत स्वानंदे ॥९९॥ ईकडे गैबिनाथ अरंण्यात । जाते जाहाले सुनिश्चित । स्वईछाच्यारे हींडत । वास करिति वनांतरि ॥ १०० ॥ आता पुढें उद्बोधनाथाचि । लीला ऐका सुंदर साचि । धाव पुरे जेथे मनाचि । सिद्दि ज्ञानाचि तात्काळ ॥ १ ॥ उद्बोधाचे वैराग्य पाहाता । डोलविति आत्मविध माथा । बहुत ज्याचि निस्पृहता । त्यागतत्वता अंतरबाह्य ॥ २ ॥ येकांतस्थान पाहुनि । बैसाति सदा समाधि लाउनि । व्यापियेले तेणे उन्मनी । केंव्हा ध्यानि तुर्य अवस्छा ॥ ३ ॥ प्रपंच राहिला ठाईंचे ठांई । देहि आसता नाथ विदेही । हे तो नावडे पित्यासि काहि । स्नेह नाही बंधुसि ॥ ४ ॥ पत्निसूधा ग्रहातुन । सेवटि घातले बाहिर जाण । उद्बोधनाथे सौख्य मानुन । गेले निघोन कुटुंबसहित ॥ ५ ॥ तीर्थक्षेत्रे अनेक रम्य । पाहाते जाहाले चित्सुखधाम । दर्शनमात्रे तरले अधम । क्षुटिंग परम समंधादि ॥ ६ ॥ नंतर येउनि स्वस्थानासि । वास्तव्य केले राशनासि । स्थळ पाहुनि निर्वैंधमानासि । ग्रहस्ताश्रमासि वर्तति पै ॥ ७ ॥ निर्वाह करणे यदर्थ । दुकान मांडिले उद्बोधनाथ । भोजनाचे सकळ साहित्य । दाळपीठ नेमस्त ईत्यादि ॥ ८ ॥ ग्राहिक येतिल तयासि । सांगति स्वमुखे कैवल्यराशि । आपुले हाति पदार्थासि । न्याहावे यासि पाडाप्रमाणे ॥ ९ ॥ लोभग्रस्त कलित प्राणि । सत्वत्वाचि कैचि शिराणि । अधिक नेहति घरालागुनि । दुकान पाहुनि साधुचे ॥ ११० ॥ परि मोजु जाता आगळे कैचे । भावासारिखे भरति साच । न्युन्याधिक नसे काहिच । आश्चर्य वाचे करिति जन ॥ ११ ॥ ऐसे वर्तता विचित्र नवल । निंदक सर्व चाकाटले । भाविक नर पाई लागले । उपदेश घेतले बहुतेकी ॥ १२ ॥ उद्बोधनाथ हास्य

करिति । जैसा भाव तैसि प्राप्ति । प्रपंच अथवा परमार्थि । येणेचि रिति सकळिक ॥ १३ ॥ जीव नेणति शुद्ध विच्यार । उगेचि भ्रमले अविद्यापसारे । दीवानिशी संसार । लागला घोर प्राणिया ॥ १४ ॥ असो ऐसा चमत्कार । होता भजति नारीनर । वाढीनलि किर्ति फार । येति सारे दर्शनासि ॥ १५ ॥ धनधान्य अळंकारवस्त्रे । उद्बोधनाथासि अर्पिति विचित्र । भेटिसि येति बहुक्षेत्रे । वानिति वगत्रे वैदिकादि ॥ १६ ॥ संग्रह होता नाथजीनि । लुटावे घर तेचिक्षणि । आपण ज़ावे निघोनि । सकळ टाकोनि कुटुंबसहित ॥ १७ ॥ वारंवार ग्रामस्त यानि । आणीत असावे प्रीतिकरूनि । परि उदास अंतःकरणी । उद्बोध मनि सर्वदा ॥ १८ ॥ मग पंढरिसि शिष्येसहीत । नाथ निघाले यात्रेत । समागमे बहुत । जन ग्रामस्त मिळाले ॥ १९ ॥ प्रेमळ सुस्वर अभंग गाति । मार्गी चालता भजन करीति । ठाई ठाई उभे राहाति । नृत्य करिति स्वानंदे ॥ १२० ॥ परोपरी अळउन । करुणा भाकीति दीन वचने । प्रेमाश्रुने गळति नैन । भाव पूर्ण अंगी ते ॥ १ ॥ इकडे भगवान श्रीपंढरिनिवास । गडबड जाहालि बहु तयास । पाच्यारिले गरुडास । येती संतास सामोरे ॥ २२ ॥ संतवृंदे घेउनि संगे । निघाले स्वये श्रीपांडुरंग । मग तो माजला अद्भुतरंग । गजरधींग होतसे पै ॥ २३ ॥ ऐशा प्रकारे पंचक्रोश । सामोरे आले रुक्मीणिविलास । ऐक्य होता देवभक्तास । तया सुखास कोण वर्णि ॥ २४ ॥ हाती धरोनि उद्बोधनाथासि । घेउनि गेले राउळासि । भजन कडाका वाटेशि । ध्वनि वाचेसि अनुपम्य ॥ २५ ॥ महाद्वार उल्लंघन करिता । समाधि लागलि उद्बोधनाथा । समुळ जाउनि बाह्यांग्रता । स्वस्रूपि चिता समरसु ॥ २६ ॥ तयेकाळी प्रेमळजनि । देहावरि आणिले नाथजीलागुनी । मग मिठि घातलि समचरणी । पाहाति नैनि घनसावळा ॥ २७ ॥ तात्काळीक कीर्तनासि । उभे ठाकले गरुडपारासी । संतासहित हृषीकेशी । निजकथेसी श्रवण करिति ॥ २८ ॥ तये काळि प्रेमात येउनि । अभंग केले उद्बोध-

नाथानि । साधु गाति ते कीर्तनि । सकळजनी सांप्रदाई ॥ २९ ॥ जये कथेचि ऐसि ख्याति । समाधीस्त जाहाली श्रीमूर्ति । सनकाधिक धन्य वदाति । ऐकु ईछिति देवगण ॥ १३० ॥ स्वमुखे श्रीभगवान । भक्तिप्रिय रुक्मिणीरमण । पुंडलिकापासि करिती स्तवन । उद्बोधकीर्तन अटवोनि ॥ ३१ ॥ अभंगपर ते भगवद्वाणि । सोलिव शब्द चिन्मयखाणि । साधु गाति सदा वदनि । आदिकरूनि पंढरीसि ॥ ३२ ॥ अभंग उब्दोधनाथाचे । आणि स्वये श्रीभगवदूमुखींचें । सकाम निष्काम गावोत वाचे । अर्थ जीविचे पुरति पैं ॥ ३३ ॥ पुढिले अध्याई अपूर्वकथन । केशरिनाथाचें होईल वर्णन । श्रोतीये करुनि येकाग्रमन । द्यावे अवधान सर्वत्री ॥३४॥ ह्रदयकमळि होउनि सित्ध । वदविति स्वये श्रीगुरुसित्ध । राजारामि केला प्रसाद । महिमा आगाध स्वामिचा ॥ १३५ ॥ भक्तमंजरिमाळाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । नाथलीलाचरित्राते । अध्याय समाप्त प्रथम हा ॥ १३६ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त ॥ अनुक्रमे अध्याय एकतिसावा ॥३१॥ श्रीगुरुदत्त दिगंबरार्पणमस्तु॥ ७॥



## अध्याय ३२

### —नवनाथ—

( पुढें चालू )

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो सिद्ध परब्रह्मा । अद्वयरुपा निर्गुणधामा । वर्णु जाता तुझा महिमा । अगमनिगमा दुर्लभ तो ॥ १ ॥ तापसाचा शिरोमणि । जो का भगवान शुळपाणी । तोहि सकल त्याग करूनि । राहिला स्मशानि तयासुखा ॥ २ ॥ तेथे स्तुतिस्तवन कायसे । मुकावले जेथे शेष । सनकादिक जाहाले पिसे । अनुभव मिसे स्वरूपाच्या ॥ ३ ॥ इतर बापुडि हेदरी किति । जीव वाच्यांश करिति वित्पति । ज्ञानाभिमाने गर्वोक्ति । धरिता प्राप्ति कैचि त्या ॥ ४ ॥ जैसा मि मौनि म्हणु जाता । मौन भंगे ते तत्वता ।

हातिंचि गेली मुक्तता । होय बद्धता सहजी ते ॥ ५ ॥ बद्धमुक्तता वेगळा । अनिर्वाच्य जो का सोहळा । तयेस्थळि ईतराला । सामान्या लागति केंवि ॥ ६ ॥ येथे येकाचि उपाय । इतरसाधने प्राप्त नोव्हे । सद्गुरुकृपा जरि होय । तरिच लाहे निजात्मपद ॥ ७ ॥ ह्मणुनि जन्मले तयानि । प्रयत्न करावा हाचि जनि । सकळकार्ये त्यजुनि । श्रीगुरुचरणी अनुसरावे ॥ ८ ॥ बद्धमुमुक्षुसाधकाचा । सिद्धस्वरूप ठेवा साचा । तोचि स्वामि समर्थ अमुचा । नवल तयाचा प्रताप पै ॥९॥ कृपालेशे उजिवडे । त्रैलोक्य वाटे थोकडे । ग्रंथरचना वाडेकोडे । चरित्र प्रौढविति पै ॥१०॥ नवविधभक्ति स्थापावया । नउनाथ जन्मले भूठाया । ती आजी कथा वर्णावया । स्फुरण हृदया बुद्धिसि ॥ ११ ॥ जयापठणे श्रवणे करूनि । मुक्तिसी पावति तात्काळ प्राणी । सिद्ध-दयेचि हे शिराणि । सर्वी ह्मणोनि ऐकिजे ते ॥ १२ ॥ संतस्वरूपे आवतरोनि । धर्मस्थापन केले मेदिनि । तयाचि ते लीला वदनी । उच्चारणी सुखसुख जीवा ॥१३॥ उद्बोधनाथ प्रथमोध्यायी । पंढरीसी गेले यात्रेसि पाही । अभंगी तोषवोनि हृदई । साटविले देहि हरि ते ॥ १४ ॥ घरासि येउनि अनंदेसि । स्वधर्मि वर्तति कैवल्यराशि । भजन कथा आहर्निसि । दिवानिशि स्मरति पै ॥ १५ ॥ नित्य नेम जालिया वरि । पठण करावि ज्ञानेश्वरी । रात्र जाहालीया दिडप्रहरि । बैसोनि येकाग्री दुकानाते ॥ १६ ॥ तयेकाळि श्रोतेजन । बहुत मीळति कराया श्रवण । तयात मुमुक्ष प्रेमळ जाण । प्रमुख जन पाच ते ॥ १७ ॥ देशलेखक द्विजवर । नाव जयाचे विश्वांभर । अवलिया दुजा फकिर । तिसरा ढोर ज्ञातिचा ॥ १८ ॥ दडगळ उपनाम वाणी । जयापा ह्मणति तयालागुनि । च्यार असामि ऐसे मिळोनि । पाचवा जनि द्विजवर तो ॥ १९ ॥ ऋग्वेदशाखा अश्वलायन । केशवपंडित नामाभिधान । ग्राम जे का ह्मणति राशन । मामलत पूर्ण तेथील पै ॥ २० ॥ अत्यादरे नित्यनेम । श्रवणासि यावे तेणे प्रेमे । जालिया निशि दिडयाम । सारुनि कामे

नाथा जवळि ॥ २१ ॥ ऐसे होता काहि दिवस । रंगोनि गेले अर्थिमानस । लागता स्वरुपी निजध्यास । कारभारविलासी लक्ष कैचा ॥ २२ ॥ उद्बोधनाथासि तेव्हा अज्ञानप्राणि । निंदु लागले पाटिलकुळकार्णि । वेडा केला आमुचा धणी । ऐसे वदनि जन वदति ॥ २३ ॥ नाथासि कळता वर्तमान । आणिले पंतासि बोलाउन । ह्मणति केशवा आमुचे हेळण । कासया करणे ते तुजला ॥ २४ ॥ तये काळि तो मामलतदार । केशवपंडित सुभेदार । संकोचरिति जोडुनि कर । आज्ञा साचार करणे ते ॥ २५ ॥ परि अंतरि न पडे चैन । वेधले श्रवणि सदा मन । युगासम जातसे क्षण । ज्ञानेश्वरी श्रवण न करिता ॥ २६ ॥ मग कोणि येकासि न कळता । वस्त फीरोन गेलीया तत्वता । येकटेचि जावे सर्वथा । केशवपंडिता छंद मनि ॥२७ ॥ दुकाना बाहीर बैसावे । जे कवणासि नव्हे ठावे । पाउल वाजो न द्यावे । निशीम भाव ज्या ह्रदई ॥ २८ ॥ गुप्तरूपे दिनासारिखे । ऐकत असावे येकाग्र निके । दुकानातुन बाहीर लोक । जावे न देखता आले तों ॥ २९ ॥ ऐशाप्रकारे काहीं दिवस । होता वर्तले ऐका सुरस । केशवपंडित श्रवणास । आला विश्वास धरूनि ॥ ३० ॥ नित्यापरी न कळता कवणा । उभा ठाकला बाहीर जाणा । आंत बैसले जाऊनि दुकाना । येकाग्र मना करूनि इतर ॥ ३१ ॥ ज्ञानेश्वरीचे पारायण । श्रीउद्बोधनाथ करिति जाण । अनुक्रमे वाचितां प्रकरण । अध्याय प्रसंगी प्राप्त जाला ॥३२॥ तयातील वाचूनियां वोवि । वाचिते जाले ते गोसावि । अर्थ करिति अनुभवी । धरूनि जीव चतुर्विध ॥ ३३ ॥ श्रीज्ञानेश्वरीची ओवी । आधी तव ओंकारू । ध्यानी कीं जे गोचरू । पाठि आणि जे उचारू वाचेसि ॥ ३४ ॥ परि मुखशातार्थ तो राहिला । अद्भुत सर्वि वाखाणिला । बोध न होये मनाला । संशय उरला मनाला श्रोतिया ॥ ३५ ॥ नाथजिस तेव्हा सकाळिकानि । विनंति केली हात जोडुनि । म्हणति या स्वामिया आपुलि वाणि । वदता जनि मुख होये ॥ ३६ ॥ सर्व साक्षी

सद्गुरुनाथ। जो कां माहाराज उद्बोध समर्थ। बाहेर आहेत केशवपंडित। हे विदित तयासि ॥ ३७ ॥ ज्ञानेश्वरी नोहे सामान्य ग्रंथ। ब्रह्म स्थिति आदि अंत। अनुभव घेता येके वोवीत। जीवचि होत शीवरूप ते ॥ ३८ ॥ यालागी तुकारामानीं। अभंगीं सुचविले जना लागुनि। येक वोवी अनुभवोनी। मायाजीवनीं तरती जीव ॥ ३९ ॥

## ॥ अभंग तुकोबाचा ॥

**ज्ञानराज माझा योग्याची माउली। जेणें निगमवली प्रगट केली ॥१॥**
**गीता आळंकार नाम ज्ञानेश्वरी। ब्रह्मानंदलहरी हेलावली ॥ २ ॥**
**छंपन्न भाषेचा केलासे गौरव। भवार्णवीं नाव उभारली ॥ ३ ॥**
**तुका म्हणे श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानदेवी। येक तरी वोवी अनुभवावी ॥ ४ ॥**

॥ इति अभंग तुकोबाचे समाप्तः ॥

यालागी ग्रंथ ज्ञानेश्वरीचा। मूर्तिमंत तो ब्रह्मरूप साचा। नवल महिमा त्या श्रवणाचा। अद्वय सुखाचा लाभ पूर्ण ॥ ४० ॥ तशांत ते मुख्यार्थाची। वोवी प्राप्त जाहाली साची। शरण आलीयावीण कैची। प्राप्ती तयाची चोरूनि ऐकता ॥ ४१ ॥ यास्तव नाथ उद्बोध पाहीं। स्तब्ध राहिले ठाईंचे ठाई। श्रोतिये अनुग्रह करिता साई। म्हणे गुह्य कांहीं न वदे मी ॥ ४२ ॥ अनाधीकारी निगुराप्राणि। दुकानबाहेर असेल कोणी। ऐसे सांगता खोचले मनीं। अंतःकर्णीं केशव ते ॥ ४३ ॥ निःसंगपणें दुकानांत जाऊन। नमन केले साष्टांग जाण। विश्वांभर पंतासि सुचउन। करविले नीवेदन नाथासी ॥ ४४ ॥ पुढे पाहिजे जाहालि लिला। स्वामिनि ह्मणुनि अलक्ष केला। ज्ञानच नसता उपदेशाला। अधिकार अम्हाला कैचा तो ॥ ४५ ॥ ऐसे ऐकुनि केशवपंडित। विच्यार केला आपुले मनांत। सद्गुरु पाहाता पूर्ण समर्थ। परि मी व्यर्थ अनाधिकारी ॥ ४६ ॥ आपुला निश्चय सदृढ असतां। श्रीगुरु उपेक्षा नचले सर्वथा। रामानंद अव्हेरिता। कबीर निश्चीता तरले ते ॥४७॥ कीं द्रोणाच्यार्य कीरात आपुल्या शिष्य। धिकारिला परि न सांडिले गुरुस। प्रतिमा करून धनुर्विद्येस। साधिले विशेष भाव धरूनि ॥ ४८ ॥

तयापरि केशवपंडितानीं । आरंभिला विच्यार मनीं । न कळता कवणा लागुनी । दास्य जनीं आरंभिले ॥ ४९ ॥ साहा घटका रात्रि उटावे । उद्बोधनाथाचे अश्रमी जावे । द्वारि आंगण झाडुनि बरवे । सामर्जन करावे यथोक्त ॥ ५० ॥ सेवा हेचि अनुष्ठान । षणमास घडके ऐसे पूर्ण । मग जाहाले जे कारण । तेहि श्रवण करा तुह्मि ॥ ५१ ॥ द्वार उघडोनि उद्बोधनाथ । रात्रौ आले बाहिर सहज्यात । तो सडा घालिति केशोपंत । येकाग्र चित्तें उषःकाळीं ॥ ५२ ॥ हे अवलोकिता नाथजीनि । कृपा उद्भवलि तेचिक्षणि । ह्मणति झडकरि यावे स्नान करूनि । सुमुहुर्तपणी वेळा ही ॥ ५३ ॥ श्रीगुरुआज्ञा ऐसी होता । हर्ष जाहाला केशवचित्ता । स्नानविधी करूनि तत्वता । घेतले साहित्य पुजेचे ॥ ५४ ॥ तात्काळीक लवलाही । नाथजीकडे आले पाही । नमन करून अनन्य पाई । आर्चिले ह्रदई येकाग्रते ॥ ५५ ॥ सांप्रदाय क्रमे निरुते । उपदेश केला उद्बोध नाथे । मग स्वानंदाब्धीसि आले भरते । गुरुकृपा ते पूर्णतीथी ॥ ५६ ॥ की पातला ज्ञानतरणी । तेणे बिकाशिल्या अद्वयकमळणी । निःशेष सरता अज्ञानरजनि । गेले हारपोनि दृश्य आसता ॥ ५७ ॥ नातरि गुरुकृपावसंत । शीष्यह्रदयवन प्रफुल्लीत । वैराग्यकोकिळा गुंजारव करीत । शब्द तेथे मधुरोक्ति ॥ ५८ ॥ स्वानंदघन समाधि । लाधली पूर्ण आत्मसिद्धि । दिनत्रय नाहि शुद्धि । पावालि वृद्धि सुलीनदशा ॥ ५९ ॥ केशवपंडित ऐशापरि । निमग्न जाहाले निर्विकारि । मग आणिले देह्यावरी । तुर्यमंदिरि सद्गुरुनि ॥ ६० ॥ जीवलगसखी ती अर्धमात्रा । तनुत्रयाची साक्षिणी पवित्रा । जिका घालुनि मोक्षसत्रा । ज्ञान नेत्रा बैसलि जे ॥ ६१ ॥ केशवराये उघडीता दृष्टि । पुढे श्रीगुरुमूर्ति गोमटि । सदृढ चरणीं घातली मिठि । होतसे वृष्टि प्रेमाचि ॥ ६२ ॥ प्रदक्षणा नमस्कार । वारंवार जोडुनि कर । वाणी जातसे चाचरे । व्यापिले शरीर अष्टभावे ॥ ६३ ॥ असो जडसमाधि विसर्जुन । देह्यावरि आणिला केशव ब्राह्मण । सहज स्थिति सांगुनी खुण । स्वरूपीं कीन पै केले

॥ ६४ ॥ मग लोकरीत्या काहीयेक । प्रपंचमार्गी वर्तति देख । परी पाहाणे रघुनायक । भूति येक परिपूर्ण ॥ ६९ ॥ केशवपंडीतद्विजाचे हृदया । विसाउ पातल्या शांतिक्षमादया । नवविधभजनी रंगलि काया । मोक्ष पाया लागतसे ॥ ६६ ॥ ग्रामाधीपत्य कारभार करणे । कांटाळले तेथे मन । न सोडिति परि जन । स्नेहाने गाव करीतसे ॥ ६७ ॥ तयेकाळि अवर्षण । प्रांती पडले दुर्भिक्ष जाण । अन्नावीण जाती प्राण । प्रज्या-पीडण जाहाले बहु ॥ ६८ ॥ हे पाहुन केशवराव प्रभु । कृपेने द्रवला जैसा शंभु । कोंदाटले कीर्तने नभु । लुटले धान्य भूअंतर्गत ॥ ६९ ॥ दामाजिपंतासारिखे । दिवाणात कळविले देख । माहालकरी दुर्जनमुर्ख । जाहाले कौतुक समजाविले ॥७०॥ नगरकील्यात यवनीठाणे । तेथे जाता बोभाट जाण । तात्काळ धरणी पाठउन । नेहले धरून केशवपंता ॥७१॥ पायात घालून शृंखळा । प्रतीबंध त्या पंतासि केला । तये काळीं आरंभिला । धावा केला केशवें पै ॥ ७२ ॥ जय सद्गुरु करुणा-सागरा । अनाथनाथ सर्वेश्वरा । भक्तजनाच्या निजमाहेरा । पाव सत्वरा यावेळे ॥ ७३ ॥ मागे बहुतासि त्वां तारिले । हे तो पुराणीं ऐकिलें भले । तरि आजी येथें दावीं पाउलें । संकट निरसलें पाहिजे ॥ ७४ ॥ जन्मोजन्मीं दास पदरींचा । अभिमान रक्षी स्वामिया ब्रिदाचा । मी तो अन्याइ अपराधी त्रिवाचा । उपेक्षीता नामाचा बडिवार जाईल ॥ ७५ ॥ करूणा भाकीता ऐसी जाण । दिनत्रय घडले उपोषण । येकनिष्ठा करिता स्तवन । करुणाघन द्रवले मनीं ॥ ७६ ॥ भगवान श्रीकृष्ण पुरुषोत्तम । जयाचा पिता वसुदेव नाम । तयासि गांजितां कंसें अधमे । बंधन परम तुटलें पै ॥ ७७ ॥ तैसीच येथें गोष्ट घडली । सद्गुरुस्मरणें बेडी तुटली । मध्यरात्रीं कुलपें मोडलीं । उघडिलीं द्वारें किल्ल्याचीं ॥ ७८ ॥ श्रीदत्तात्रयापरी जाण । प्रगटले तेथे उद्बोध आपण । केशवपंडितासी थापटोन । सावधान केले पै ॥ ७९ ॥ ह्मणती उठा याचि वेळा । जाई आपले सत्वर घराला । ऐसें बोलुनी गुप्त जाहाला । सद्गुरु भला उद्बोध जी ॥ ८० ॥ भग तो आनंद सांगणे किती ।

न समाये उल्हास केशवाचित्तीं । निर्वोनी आले सत्वरगती । राशनाप्रती गुरुजवळी ॥ ८१ ॥ करुणापर अभंग ते वेळींचे । पठण करिती कोण्ही वाचे । बंधन तुटे तयाचें । माहात्म गुरुचें अगाध पै ॥ ८२ ॥ असो केशवरावपंडितानो । नमन करूनि श्रीगुरुचरणीं । कारभार सोडिला तेचि क्षणीं । दौतलेखणी वाहीलीसे ॥ ८३ ॥ तये काळि उद्बोधनार्थें । मस्तकीं ठेविला पूर्णहात । नाम ठेविलें केशरीनाथ । जाणुनि यथार्थ निजप्रीती ॥ ८४ ॥ सहस्रदळकमळींचे केशर । सेविले तेणे केशवभ्रमर । यालागी शोभे निर्धार । नाम थोर केशरी त्या ॥ ८५ ॥ नातरी कामादिक हे वारण । मातले जगीं बहु दारुण । तयाचें कराया निवारण । केसरी जाण प्रगटला ॥ ८६ ॥कीं पंढरीनाथाचे अळंकार । साधुवृंदें ते चि सार । केशरीटिळक त्यांत निर्धीर । शोभे साचार कपाळींचा ॥ ८७ ॥ असो केशवरायासि उद्बोधनार्थें । नाम ठेविले केशरीसमर्थें । वर्णूं जातां अनेक अर्थ । संभवत श्रीगुरुपद ॥ ८८ ॥ पुढें विच्यार कैसा जाहाला । ऐकावी ती श्रोतिये लीला । सद्गुरुसेवे विनटला । केशरी भक्त स्वामी तो ॥ ८९ ॥ श्रीरामदासस्वामीचा शिष्य कल्याण । तयापरी सेवा करणे । परापेक्षा स्नान भोजन । नातरी अनुष्ठान सेवांचि ते ॥ ९० ॥ नीचकार्यांची बहुप्रिती । आमानित्व आंगी विलसे स्थिति । न स्फुरे कांहीं दिवाराती । रंगली वृत्ति गुरुचरणीं ॥ ९१ ॥ प्रपंचरिती राहिलें भान । सहन करावे जगहेळण । बहुधा असावे धरुनी मौन । बोलावें वचन नम्र तें ॥९२॥ सहज स्थिति अखंडाकार । पूर्णता पातली ज्यासी निर्धार । कोण वर्णी तो विच्यार । नाथ केशर धन्य तो ॥ ९३ ॥ उद्बोधनाथाचे कोणीं येके दिनीं । उचंबळलीं दया अंतःकरणीं । केशरीनाथासी पाच्यारुनी । ठेविला पाणी मस्तकीं त्या ॥ ९४ ॥ ह्मणती जगदोद्धारार्थ जन्म घेणें । ते तो राहिले समूळकारण । तरी तुवा आता काव्य करणें । श्लोकपूर्ण अभंगादि ॥ ९५ ॥ आणी सिद्धांतसार या नावें । ग्रंथीं बोलिजे स्वानुभव । तेणें आम्हासी

गौरव । पावलें सर्व शिष्यवर्छा ॥ ९६ ॥ तीर्थमिसे या जगासी । जरि तू केशरी पावन करिसी । तरी घडलें अखंड पुजेसी । धरी मानसीं हे बोल ॥ ९७ ॥ उद्बोधनार्थें ऐशापरी । प्रबोधिला तो केसरी । तेणें बैसली वैखरी । सरस्वती वरी येउनी स्वये ॥ ९८ ॥ मग तेथे काय पाहाणे । सद्गुरुप्रसाद लाधला पूर्ण । शब्द निघती मुखांतून । ते ते कवन सुंदर पै ॥ ९९ ॥ सिद्धांतसारग्रंथ केला । गणीत नाहीं पद अभंगाला । उपदेशिले जडजिवाला । पंथ दाविला भक्तीचा ॥ १०० ॥ तीर्थें सकळ हिंडोनी । उद्धारिली जेणें मेदिनी । सेवटीं क्षेत्रीं येउनी । मठ पैठणीं तो बांधिला ॥ १ ॥ प्रतिष्ठानीं वास केला । द्विजवरासी हर्ष जाहाला । प्रत्यही येती दर्शनाला । उदय पावला ज्ञानरवि ॥ २ ॥ केशरीनाथाचें आचरण । पाहुनीं निवाले सकळ जन । सर्वत्रवर्णा अन्नदान । कथाभजन निरंतर ॥ ३ ॥ अपेक्षा धरुनी प्राणी येती । तात्काळ नाथ ते पुरविती । सेवटी सांगुनी आत्मस्थिती । मेळविती स्वस्वरूपा ॥ ४ ॥ अज्ञानजीव धाकुटी मुलें । तयासीहि भक्तिसी लाविले । श्रीगुरुसमर्थ वंदुनी भले । घेती कवळ मग मुखीं ॥५॥ ऐशापरी प्रतिष्ठानांत । वास्तव्य करिती केशरीनाथ । पुढे वर्तलें अपूर्व श्रोते । ते हि कथे श्रवण करा ॥६॥ शिवदीननाथाचें चरित्र । वदवितील स्वामि सिद्ध पवित्र । अवधान देता पातकयंत्र । नासोनी स्वतंत्रपद पाविजे ॥ ७ ॥ सिद्धसुखाची स्वानंदराशि । जो का भगवान पंढरीसि । प्रगट होउनि तो हृदयासि । चरित्रासि करवितसे ॥ ८ ॥ राजारामीं अंतर्बाह्य । व्यापुनी ठेली श्रीगुरुमाये । ग्रंथ करणे हे तो काय । विलास सहजी तो ॥ ९ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणेंची पुरती मनोरथ । नाथलीला चरित्राते । अध्याय होय द्वितीय हा ॥ ११० ॥

॥ अाध्याय २ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय बत्तिसावा ॥

# अध्याय ३२

## —नवनाथ—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरुनिजात्मसूर्या ॥ सिद्धपरेशा मुनिवर्या । ज्ञानप्रकाशा अद्वया । निरसली माया सहजिं ते ॥ १ ॥ अज्ञानतम हारपलें । निस्तेज जाहाले मनचंद्रमंडळ । दृश्य चांदणें लोपलें । पुंज्याळले ब्रह्मतेज ॥ २ ॥ इंद्रिय कमळें विकासली । जीवषट्पदें मुक्त जाहालीं । भक्तिपंथें चालूं लागली । मुमुक्षमंडळी साधक ती ॥ ३ ॥ काम क्रोधादि तस्कर । पळाले अपसया षडविकार । निर्भय जाहाले सज्जनवीर । प्रबोध थोर पाहाटे फुटताचि ॥ ४ ॥ प्रातःस्मरामि कोण्ही जन । करिते जाहाले अध्ययन । पंचम वेद तो चि जाण । सोहं स्फुरण सर्वाभूतीं ॥५॥ कितेक बैसले योगासनीं । प्राणापान ऐक्य करूनी । अजपाजप धरूनी स्मरणीं । अनुभव ध्यानीं कीतेक ते ॥६॥ज्ञानगंगेत प्रातःस्नान । गुरुपुत्र करिती आपण । घडता स्वरूपचिंतन । संध्याविधान परिपूर्ण तें ॥ ७ ॥ पूज्य पुजक दुजा नाहीं । तेथें पूजन करणें काई । देहींच असता विदेही । चराचर पाही तो जाहाला ॥ ८ ॥ निर्विकार ब्रह्मचंडांश । उदय पावला सिद्ध पूर्वेस । ते स्वसुख वर्णावयास । स्वये शेष मौनावला ॥ ९ ॥ तेथें स्तवन न घडे कदा । सद्गुरुस्वरूप अवर्णीय सदा । अनन्यभावें आठउनी पदा । नमन सिद्धा साष्टांगें ॥ १० ॥ बुद्धिसी तेणें प्रसाद जाहाला । चित्तीं स्फुरली संतलीला । याळागी विनवी श्रोतियाला । अबोलबोला परिसा ते ॥ ११ ॥ आम्हा शिवदीन प्राप्त होता । अज्ञानरजनी गेली तत्वता । आरंभिली तीच कथा । शिवदीननाथा वंदुनि पै ॥ १२ ॥ सिंव्हावलोकन मागील कथन । केशरीनाथ पैठणीं येउन । वास केला निरंतर पूर्ण । मठ बांधून रमणीक ॥ १३ ॥ श्रीगुरुसेवा करुनी बहुत । तोषविले उद्बोधनाथ । दक्षणउत्तरमानसतीर्थे । भ्रमण करीत उद्धरिले ॥ १४ ॥

पुढें अध्यानरूपिणीगंगे । शब्दप्रवाह चालिला वोघ । श्रोते पावन होती वेगें । कीला अभंगसरितोदकीं ॥ १५ ॥ पैठणकर ज्योतिषीब्राह्मण । यजुर्वेदी शाखा माध्यांदिन । तयाचा पुत्र छांदसी जाण । द्वादश पूर्ण वर्षें तया ॥ १६ ॥ पदार्थ पडेल जो दृष्टीसी । नेऊन द्यावा तेणे हलवेकर-यासी । आणूनि शर्करामिठाईसी । वाटुनी सर्वांसी आपण भक्षावा ॥ १७ ॥ पिताहीन तो येकटा घरी । माता सिकवी नानाप्रकारीं । छंद न टाकी द्विज तो परी । पडला वैखरी अभ्यास सदा ॥ १८ ॥ धनधान्य वस्त्रेपात्रे । लुटिलीं समग्र ऐशाप्रकारें । प्राप्त जाहालें बहु दरिद्र । पडला विच्यार अन्नाचा ॥ १९ ॥ माता फार त्रास पावली । केशरीनाथाचे मठासी आली । पुण्यातिथी तये काळीं । नवमी आली वैशाख तो ॥ २० ॥ उद्बोधनाथाचा मुख्य दिवस । यात्रा बहु मिळाली असे । अन्नदान कीर्तनघोष । रात्रंदिवस निरंतर ॥ २१ ॥ भोजन कराया तया मुलाते । उदकपात्र कैचें निरुते । मातेनें त्या सुचविता नाथें । पंचपात्र होतें दिधलें तें ॥ २२ ॥ ते हि तात्काळ भांडु रुप्याचें । हलवयासी दिधलें साचें । मातुश्री ह्मणे दैव आमुचें । करुणा वाचे भाकीतसे ॥ २३ ॥ केशरीनाथ माहासमर्थ । शांति क्षमा ज्या आंगीं बिलसत । हिशेब करुनी हलवयाते । स्वहस्तें पैका दिधला ॥ २४ ॥ पंचपात्र आणिलें सोडउन । मातेसी त्या बोलती वचन । पुत्र आम्हासी अर्पण करून । राहावे आपण स्वस्थ मठीं ॥ २५ ॥ अवस्य ह्मणोनी तेणे जननी । मिठी घातली सदृढ चरणीं । निजसुत दिधला ऐसे वदुनी । सोडिलें पाणि श्रीगुरुपदिं ॥ २६ ॥ तये काळीं केशरीनाथ । आज्ञापिले तया मुलातें । नित्यनेमें स्नान केलीयाते । खडावा ते ठेवा ह्मणुनी ॥२७॥ नेमुनी दिधली ईतुकी च सेवा । संभाळ केला स्वामिनी बरवा । मिठाईविषय देउनि जिव्हा । पाळिके तेव्हा निरंतर ॥ २८ ॥ पुढे काहीं काळेंकरून । नेमासी पडलें अंतर जाण । तये काळीं जाहलें कारण । ते हि श्रवण श्रोती करा ॥ २९ ॥ सद्गुरुरायें प्रातःकाळीं । केशरीनाथे अंगोळी केली । पुढे पाहाता नेत्रकमळीं । पादुका जवळी

नाहींत ठेविल्या ॥ ३० ॥ यास्तव राग स्वामिसी आला । खडाव मारिली त्या मुलाला । ती लागताचि हृदयाला । रक्त भळभळां वाहतसे ॥ ३१ ॥ गेले अशुद्ध ते चि क्षणीं । शुध्दता लाधली अंतःकर्णीं । विकार निघाले हृदयांतुनी । पादुकानी स्पर्श करिता ॥ ३२ ॥ अनन्य भावें चुकलों म्हणून । नमन केलें नाथासी जाण । प्रेमाश्रूनें गळती नैन । घर्म पूर्ण दाटला अंगा ॥ ३३ ॥ पश्चाताप बळावला । करुणा भाकीता तो द्विज जाहाला । मग तेथें गुरुकृपेला । व्हावयाला काय उसीर ॥ ३४ ॥ पोटासीं धरुनी स्वहस्तें । रक्त पुसिलें केशरीनाथें । बैसउनी पुढें निरुते । बीजमंत्राते उपदेशिले ॥ ३५ ॥ तें सुख उघड ग्रंथीं । लिहीता नये वाचेहातीं । उन्मन पावे जेथें वृत्ती । काय स्थिती वर्णूं ते ॥३६ ॥ श्रवणभुमिके पेरिता निजबीज । नैनी कोंब विरुढला सतेज । विस्तारला सबाह्य वोजे । नवल चोज श्रीगुरुकृपा ॥ ३७ ॥ सुभिक्ष पावता सोहंमेळी । स्वात्मसुखाची नित्यदिवाळी । ब्रह्मस्थिती लागली टाळी । ब्रह्मांड बुबळीं सांटवले ॥ ३८ ॥ निर्विकल्पदशा होता । चळणवळण राहिले तत्वता । इंद्रियें पावलीं स्थिरता । आली हाता निजसमाधी ॥ ३९ ॥ चतुर्दश दिनपर्यंत । निजआत्मगंगे बुडालें चित्त । मग आणिले देहावरुते । केशरीनाथें त्या ब्राह्मणा ॥ ४० ॥ पिंडब्रह्मांड ऐक्य करूनी । सहजस्थिति दिल्ही दाउनि । शिवदीन ऐसे ते चि क्षणीं । नाम वदनी ठेविलें त्या ॥ ४१ ॥ जीवित्व आंधार लयासी गेला । शिवित्वदीन उदया पावला । यालागीं शोभे तया मुला । नाम सोहळा शिवदीन पै ॥ ४२ ॥ नातरी शीवित्वज्ञान प्रगटावया । जीवित्व अज्ञान नेहणें लया । अवतार धरणें भूठाया । सद्गुरुराया यासाठीं ॥ ४३ ॥ कीं शिवांश नवनाथ । मुगुटमणी साहावा त्यात । यास्तव आवडी सद्गुरुनाथ । केशरी वदत शिवदीन त्या ॥ ४४ ॥ अनेक अर्थ ऐसे किती । शिवदीन पदीं त्या शोभती । वर्णावया न पुरे मती । तन्मय वृत्ति होतसे पै ॥ ४५ ॥ असो केशरीनाथस्वामीचा । शिवदीनमाहाराज शिष्य साचा । अद्भुतप्रेमा तयाचा । गुरुभक्तीचा कळस तो ॥ ४६ ॥ रात्रंदिवस सेवे ठाई ।

रंगुनी गेलीं इंद्रियें पाही । आणीक दैवत दुजें नाहीं । सद्गुरुपाईं अनन्यता ॥ ४७ ॥ गुरुगीता गुरुस्तोत्र । गुरुनाम वदे सदा वक्त्र । घातलें जेणें मोक्षसत्र । नाथ पवित्र शिवदीन तो ॥ ४८ ॥ जे जे प्राणी दृष्टीसीं पडती । कृपेनें तया उद्धरिती । आत्मानुभव स्वरुपस्थिती । प्राप्त होती दर्शनीं त्या ॥ ४९ ॥ असो पुण्यतिथी उद्बोधनाथाची । पुढें वर्षानंतर आली साची । तये काळीं कीर्तनाची । आज्ञा नेमाची केली पै ॥ ५० ॥ ह्मणती स्वतसिद्ध काव्य करावें । शिवदीना कथेसि त्वां उभे राहावें । साधुजना तोषवावें । वक्तृत्व बरवें करूनि ॥ ५१ ॥ आज्ञापिता श्रीगुरुवरें । घातिला साष्टांग नमस्कार । तात्काळ जोडुनी दोन्ही कर । कीर्तनगजर आरंभिला ॥ ५२ ॥ पदें अभंग सुंदरकवन । कीर्तनकाळीं करूनि जाण । बहर केला नाथशिवदीन । अद्भुत पूर्ण रस जाला ॥ ५३ ॥ नवविधभक्ति वेदांत । अतिप्रेमळ जो सिद्धांत । तोचि वर्णिला स्वकाव्यांत । शिवदीननाथ धन्य तो ॥ ५४ ॥ ऐसे कीर्तन रंगासी येता । अपूर्व जाहाले ऐकीजे तत्वता । येकायेकी विदेह अवस्था । ताटस्तता सर्वांसी ॥५५॥ मग तो आनंद सांगणे किती । प्रगट जाहाली भगवंतमूर्ती । राहि-रुक्मीणीसहित ज्योती । फाकली दीप्ती येकसरा ॥ ५६ ॥ मुद्रा लागली श्रोतेजना । नरनारी तटस्त जाणा । सुरवर वर्षती सुमना । श्रवणीं नैना प्रेमोदकें ॥ ५७ ॥ तन्मय जाहाली सकळसभा । शिवदीनकथेची ऐसी शोभा । श्रीपांडुरंग जेथें उभा । दाटली नभा विमानें तीं ॥ ५८ ॥ केशरीनाथ विस्मय करिती । आलींगन दिधले शिष्याप्रती । सहजे होतसे मंगळआर्ति । नोव्हे पराति कदा ते ॥ ५९ ॥ नंतर पुढें अनेक ग्रंथ । निर्मीयेलें शिवदीननाथें । भक्तिरहस्य वेदांत । विलसे अर्थ ज्यामाजीं ॥ ६० ॥ अभंगपदें अनेक । बहुविध धाट्या सुरेख । पठण करिता अमरादिक । श्रवणसुख इछिती ते ॥ ६१ ॥ खळ चांडाळ दुर्जन प्राणी । ते हि पावती आत्मसदनीं । शिवदीन-पदाची हे शिराणी । काय वाणी सांगणे ते ॥ ६२ ॥ जे जे देवता

दृष्टिसी पडे। पद करावें तेथे चि चोखडे। ध्यानपद्धति वाडेकोडें। स्थिति प्रौढ ज्यामाजीं॥ ६३॥ जे जे संत सहजि बोलति। ते ते पडे श्रुतिसंमति। कां ते जाहाले सच्चिद्‌मूर्ति। स्वयंज्योति परमात्मा॥ ६४॥ असो शिवदीनस्वामीचा पुत्र। नरहरिनाथ जो का पवित्र। तयाचें ऐका चरित्र। येकाग्र श्रोते करूनी॥ ६५॥ गर्भी च असतां मातेसी डोहळे। निर्माल्य भक्षण तुळसीदळ। भजन करावें प्रेमळ। येकांतस्थळ पाहुनी॥ ६६॥ संत घरासी जे का येती। तयाचें ध्यावे तीर्थाप्रती। पुजन करूनी यथोक्ति। नमनोक्ति वारंवार॥ ६७॥ ऐशाप्रकारें नउ मास। नवविधभक्ति ते चि सुरस। प्रसुतकाळी उछायास। करि विशेष पिता तो॥ ६८॥ शुक्लपक्षीं दिवसेंदिवस। चंद्रमंडळा अधिकप्रकाश। नरहरिनाथासी बुद्धि सुरस। नामघोष सतत पै॥ ६९॥ बाल्य दशेंत खेळूं जातां। आपण व्हावें गुरु तत्वता। शिष्य करुनी मुलें सर्वथा। स्वयें कथा करावी॥ ७०॥ ऐशापरी सात वर्षें। होतीं जाहालीं नरहरीस। मग करिता व्रतबंधास। चमत्कारास ऐका ते॥ ७१॥ शिवदीननाथपिता याने। गाईत्री उपदेश करितां जाण। ते चि क्षणीं जाहालें ज्ञान। स्वरूपीं निमग्न ततक्षणी॥ ७२॥ निर्विकल्प-समाधी। नरहरीसी जाहाली आत्मसिद्धि। देहमान जाउनि शुद्धि। पावली वृद्धि ब्रह्मनिष्ठता॥ ७३॥ घाबरे जाहाले इतर जन। स्त्रिया मुलें वैदिक ब्राह्मण। समजले नाथशिवदीन। सुचाविती जाण सकळीका॥ ७४॥ जन्मांतरींचा योगी प्रांजळ। नरहरि नोव्हे सामान्य मूल। ब्रह्मोपदेश करिता भले। निमग्न जाहाले स्वरूपीं॥ ७५॥ आणिक कल्पना तुह्मी न धरा। भुतपिशाचसमंधगीरा। न स्पर्शी या निर्धारा। द्विजवरा नरहरिते॥ ७६॥ च्यार घटिका समग्र होता। स्वस्थ न पडे कवणा चित्ता। तये काळीं अनुभवदाता। शिवदीननाथा स्त्री विनवी॥ ७७॥ ह्मणे मूल सावध करा। उदास वाटे सकळा अंतरा। यास विधि होतां बरा। समारंभ खरा सांग घडे॥ ७८॥ शिवदीननाथें ऐकुनी ऐसें। देह्यावरी आणीले त्या मुलास। स्पर्श करितां मस्तकास। नरहरीस

कृपाकरें ॥ ७९ ॥ प्राप्त जाहाली तुर्यावस्छा । सचेतनता इंद्रिया समस्ता । हस्य करूनी मग तत्वता । गुरुनाथा नमन केलें ॥ ८० ॥ आनंदले सकळ जन । भीकाळ घाली माता जाण । मंगळ वाद्यें वाजतीं पूर्ण । घोष सघन होतसे तो ॥ ८१ ॥ आसो व्रतबंधविधी सांग जाहला । पुढें नरहरीनाथ विरक्तीनें वरीला । प्रबळ व्यवहार टाकूनि भला । वास केला येकांतीं ॥ ८२ ॥ देवगृहीं देवाळई । नातरी वनीं पर्वताठाई । घळींत बैसती लवलाई । योगी देही नरहरी तो ॥ ८३ ॥ शिवदीननाथ पिता यासी । उल्हास जाला बहू मानसीं । ह्मणे ध्वज लाविला वंशासी । जन्मला कुळासी सुपुत्र पै ॥ ८४ ॥ परी मातेचे अंतः-करणीं । संसार करावा निजकुमरानीं । सुन्मुख पाहावि हाव नैनीं । प्रार्थी ह्मणूनि स्वभ्रतारा ॥ ८५ ॥ शिवदीनस्वामिसि जोडुनी कर । हे चि विनवी वारंवार । तये काळीं युक्तिद्वारें । नरहरीकुमर बोधियेला ॥ ८६ ॥ गृहस्ताश्रम करुनि जाण । घरी साधावा योग योग पूर्ण । स्वरूपस्थिति बाणल्या खूण । कैचे जनवन मग तया ॥ ८७ ॥ सांडिमांडि करणे काई । अंतरबाह्य आत्मा पाही । गाठ घालुनीं प्रारब्ध देहीं । साक्षी होई आपणया ॥ ८८ ॥ ऐशापरी बोध करिता । श्रीगुरुनीं आज्ञापिता । उत्तम ह्मणूनी ठेविला माथा । जेणें पिता तोषविला ॥ ८९ ॥ मग तात्काळ शिवदीनस्वामींनी । पुरोहितासी आणीले बोलाउनी । वधू योजना करउनी । येक महिनियानी लग्न केले ॥ ९० ॥ लौकरीत्या नरहरीनाथ । गृहस्ताश्रमीं जनविख्यात । परि सदा स्वरूपींस्थित । समाधिस्त सदा ते ॥ ९१ ॥ आहोरात्र कीर्तन भजन । पंढरीसी जावें प्रीतिकरून । सद्गुरुपदीं होउनी अनन्य । सेवा पूर्ण केली पै ॥ ९२ ॥ वदे जयाची सहजी वैखरी । काव्यरूप ते निर्धारी । पठण करीता नरनारी । मुक्ति वरी सहजी त्या ॥ ९३ ॥ धालेपणाचे ढेकर । तेवि ब्रह्मीचे शद्ब उद्गार । पदें अभंग साचार । जगदोद्धार ऐकतां ते ॥ ९४ ॥ बहुत पातकी उद्धरिले । भवार्णवीं जीव तारिले । ठाईं ठाईं मठ केले । भजनीं लाविले सकळ जन ॥ ९५ ॥ तयाचा पुत्र लक्ष्मणनाथ । तो

ही प्रेमळ माहा समर्थ । श्रवण करितां तयाचे कथे । लाभ होत तत-क्षणीं ॥ ९६ ॥ श्रीकोल्हिबराजसाधुसारिखे । जयाची स्थिती असे देख । अत्यंत विषई ह्मणती लोक । स्त्रैण निके लक्ष्मणबावा ॥ ९७ ॥ सिपाई डौल मस्तकीं फेटा । पायांत तोडा वेष म्हराटा । परी स्वरूपीं अखंड पैठा । दारवंठा वृत्ते ज्याचे ॥ ९८ ॥ अमानित्वलक्षणें योगी । तो चि लक्ष्मण पाहातां जगीं । भगवद्गीतेंत शारंगी । बोलिले त्यागी प्रत्यक्ष जाण ॥ ९९ ॥ स्वरूपीं सावध अखंड । अवस्थात्रे नाहीं खंड । परंतु जना दाविती वेड । गणिका द्वाड सदा संगे ॥ १०० ॥ अष्टौप्रहर वेश्येपासीं । निमग्न असाति सच्चिद विलासी । तये काळीं लक्ष्मणनाथासी । दुरोक्तीसी वदती नर ॥ १ ॥ सत्कुळीं लाविला कळंक । नरहरीस्वामीचा पुत्र मूर्ख । नेणुनी हृदयींचा निजविवेक । बहिमुर्ख बोलती हे ॥ २ ॥ ऐसे वर्तता कांहीं दिन । पुढें जाहलें जें कारण । ते ही ऐका चित्त देऊन । निरोपण रसाळ तें ॥ ३ ॥ लक्ष्मणबावाची पितृभगिनी । वैराग्य-खाणि जे का ज्ञानीं । गेली होती सहजी पैठणीं । भावेकरूनि पुण्य-तिर्थासी ॥ ४ ॥ तेथें लक्ष्मणबावा फिरत फिरत । आले प्रतिष्ठान क्षेत्रांत । समागमे स्त्री कळवात । दिसती उन्मत्त सर्वांसी ॥ ५ ॥ अरक्तनेत्र मुखीं तांबूल । लाविले केशासी मोगरेल । गर्णाकेशी धरूनि रतनों भले । रस्त्यांतुनी सरळ चालती पै ॥ ६ ॥ क्षेत्रवासी परस्परें । विपरीत वदती नारी नर । ह्मणती नरहरीनाथ ज्ञानसागर । तयाचा कुमर पाहाता हा ॥ ७ ॥ सज्ञान साधुसी पुत्र व्हावा । नातरी निर्वंश जाहाला बरवा । निष्टुर बोलती ऐसें जेव्हां । वर्तले तेव्हां विचित्र पै ॥ ८ ॥ स्वयंपाकशाळेतून माडीवर । कळवांतिणीचा धरुनी कर । लक्ष्मणबावा चालिले थोर । देखिले पितृबहिणीने त्या ॥ ९ ॥ मग ती बोले अत्याबाई । लक्ष्मणनाथासी ते समई । आरे तूं सटवलासी कांरे नाहीं । केरसुनी दहिमेळा पोटीं ॥ ११० ॥ ऐसे ह्मणतां चि त्या अवसरीं । पश्चाताप जाहाला अंतरीं । धारण केली

तेव्हां च फकेरी। ऐकीजे चतुरीं साकल्य ते ॥ ११ ॥ निमित्तमात्र त्रियेच्या बोला। बहिरंभटासि अनुताप जाहाला। किंवा धृव वनांत निघाला। धिःकारिला मातेनें म्हणुनी ॥ १२ ॥ तयापरीं लक्ष्मण बावानीं। स्वयंपाकांतील घेऊनी अग्नि। अंगावरींलीं वस्त्रें काढुनी। लाविले जाळुनी भस्म अंगा ॥ १३ ॥ गुरुरूप मानुनी त्या मातेसी। नमन केलें साष्टांग नमनेसी। त्याग करूनी कळवांतिणीसी। नाडबंद जोडव्यासी पाईं घातिले ॥ १४ ॥ पाहावयासि ते लीला। जनसमुच्चय भोवता मिळाला। राग मग गणिकेला। बोले अबला विचित्र ते ॥१५॥ ताटांत माझ्या भोजन करून। भ्रष्ट जाहाला हा ब्राह्मण। इच्छितसे त्याग करून। सोवळेपण मिरवावया ॥ १६ ॥ गणिका भाषण करिता ऐसें। निंदक जना जाहाला हर्ष। द्विज म्हणती न करा स्पर्श। भ्रष्ट दिसे लक्ष्मणनाथ ॥ १७ ॥ विच्यारशीळ माहानशिष्ट। ते हि तेथें होते स्पष्ट। प्रेमळ जनासी वाटले कष्ट। जाहाले रुष्ट संतजन॥ १८॥ लक्ष्मणनाथ स्पष्ट मनीं। लक्ष जयाचे श्रीगुरुचरणीं। भजनीं रंगुनी गेली वाणी। अंतःकरणीं स्वानंदें ॥ १९ ॥ स्वस्वरूपीं जो सावध। भगवंतासी तया नाहीं भेद। सगुण निर्गूण जया प्रसिद्ध। साक्षात् गोविंद ज्यापासीं ॥१२०॥ स्वभक्ता गांजितां कदा जाण। साहूं न शके श्रीभगवान। लक्ष्मणरावासी टाकून। ईच्छिती भोजन करावया ॥ २१ ॥ तये काळी नवला जाहालें। स्नानासी ब्राह्मण सकळ गेले। तेथे श्वान प्रगटले। स्पर्श केले सर्वांसी ॥ २२ ॥ निवारण तें न होय कवणा। शिवूं लागलें पुनः पुना। बुड्या मारितां थकले जाणा। उपाय कवणान सुचे पै ॥ २३ ॥ सहस्त्रावधि धोंडे मारिती। नानापरी निवारण करिती। परि तें कुतरें जवळ निश्चिती। विस्मय चित्तीं सर्वत्रा ॥ २४ ॥ तये काळीं येक्या ब्राह्मणा। आठवलें सहजीं त्याच्या मना। ऐकुनीं कळवंताच्या वचना। योगीजना दुषिले पै ॥ २५ ॥ न करिता तो विच्यार। पंक्तिबाह्य केला त्वरें। यालागीं क्षोभला परमेश्वर। त्रासिलें अंतर साधूचें ॥ २६ ॥ कुतर्क आमुचा फळासि आला। तो चि कुतरा पाठीं लागला। दुजा

उपाय नसे याला । शरण तयाला जाऊं ते ॥ २७ ॥ सुचता गोष्टी हे सकळासी । गेले लक्ष्मणबावापासीं । अनन्यभावें नमितां पदासीं । न पडे दृष्टिसी श्वान तें ॥ २८ ॥ शोध करितां गणिकाजल्प । मिथ्या अपवाद तो संताप । लक्ष्मणनाथ ते निष्पाप । वदती आमुप जन सारे ॥ २९ ॥ भोजनविधि सांग जाहाला । उत्छाहा तो ही सिद्धिसी गेला । पुढे जाहाली जे का लीला । विच्यार भला तो ऐका ॥ १३० ॥ लक्ष्मणनाथ जाहाले विरक्त । सर्वत्रासि आली प्रचीत । संचरलें वैराग्य गणिकेते । शरणांगत जाहाली ते ॥ ३१ ॥ सत्संगाचा अगाध महिमा । प्राणी गुंतले उगे चि कर्मा । मेळविती स्वसुखधामा । पादपद्मा स्मरिजे त्या ॥ ३२ ॥ अत्यंत पातकी दुराच्यारी । विषय सिंधुची केवळ लहरी । कामक्रोधमातंगाची दरी । घाली अघोरीं नेह्रुनि बळें ॥३३॥ वेशा दुष्ट ऐसी असतां । चरणावरी ठेविला माथा । लक्ष्मणनाथासी म्हणे आता । क्षमा सर्वथा करणें पै ॥ ३४ ॥ निजात्मखूण सांगुनी वेगें । उद्धरावें दीना स्वरूपगंगे । ऐसे बोलता चित्सुखतरंग । नाथ अंगे द्रवले मनीं ॥ ३५ ॥ होतां सद्गुरु कृपादिष्टि । गणीकेसि जाहाली स्वरूपीं भेटीं । नये वर्णितां ते गोष्टी । दिसे सृष्टि येकात्मता ॥ ३६ ॥ असो लक्ष्मणनाथस्वामियानीं । वैराग्य सेविलें प्रतिष्ठानीं । निर्विषय होउनि जनीं । फिरती मेदिनि तीर्थांतरा ॥ ३७ ॥ पुढिले अध्याई अपूर्वकथन । श्रोते ऐका सावधान । अनंतजन्माचा हरे शीण । संतस्तवन धन्य तें ॥ ३८ ॥ जन्मांतरींचा लाधला ठेवा । भेटीं जाहाली श्रीगुरुदेवा । ग्रंथरूपिणी देउनि सेवा । केलें वैभवा पात्र ते ॥ ३९ ॥ सिद्धस्वामिचे चरणकमळीं । वृत्ति भ्रमरी तन्मय जाहाली । स्वसुखानुभवे परिमळें धाली । नये बोलिते बोल तो ॥१४०॥ राजारामीं सद्गुरुनाथ । प्रगट जाहाले निजहृदयांत । वदविती स्वामी संतकथे । सिद्धसमर्थ दयानिधी ॥ ४१ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । नाथरहस्य चरित्राते । अध्याय समाप्त तृतीय हा ॥ आध्याय ॥ ३ ॥ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय तेतिसावा ॥ ३३ ॥

# अध्याय ३४

## —नवनाथ—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्धराजया। सार्वभौमत्व तुझा स्वामिया। भद्रासन शोभे अद्वया। अक्षई ठाई चराचरीं ॥ १ ॥ येकछत्री राणीव। विवेकप्रधान स्वानुभव। इंद्रियसेना अद्भुत गौरव। वाद्यें सर्व अनुहातध्वनी ॥ २ ॥ स्वानंदवारण उन्मत्त। माहाद्वारीं सदा झुलत। च्यारीसाही वाखाणीत। उभारुनी हात ब्रिदावळी ॥ ३ ॥ प्रबोधवारु धांवती। भक्तिध्वजा निशाणें झळकती। अर्धांगी ते विलसे स्थिती। आत्मज्योती पट्टराणी ॥ ४ ॥ शांति क्षमा सख्या तयेच्या। दोहीं भागीं उभ्या साच्या। द्वैतभाव तेथें कैचा। नये वाच्या वर्णिल्या त्या ॥ ५ ॥ हृदयमंदिरीं सिंव्हासन। ज्ञानदीपिका तेथें पूर्ण। स्वात्मद्रव्य अमूप जाण। भरले सघन भांडार तें ॥ ६ ॥ तेथें याचक मागू जातां। अज्ञानदरिद्र नुरे सर्वथा। आपणासम करिती तत्वता। विलंब सर्वथा नाहीं तया ॥ ७ ॥ केवळ कंगाल मी भणंगदीन। सहजी होतां श्रीदर्शन। आपुले पदीं बैसवोन। स्वात्मधन वोपिले पै ॥ ८ ॥ ऐसा माहाराज सिद्ध समर्थ। लोकत्रैसद्गुरुनाथ। अनन्यभाव तवपदाते। नमन सतत साष्टांग ॥ ९ ॥ नमन घडतां चि न मन। मनासि कैचें मनपण। संकल्पविकल्प सांडुन। संतगुण वदत पै ॥ १० ॥ पुर्वाध्याईं लक्ष्मणबावानी। उद्धरीली कळवांतिनी। विरक्ति आंगीं धारण करुनी। पैठणाहुनी निघाले ॥ ११ ॥ परि स्वभाव छान म्हराटी। टिळक केशरि ज्या ललाटीं। पायांत तोडा नाम कंठीं। आवडी मोठी भजनाची ॥ १२ ॥ मस्तकीं रुमाल फेटा बरवा। पाहाता देहभाव ज्याते हरावा। आत्मस्थिती प्राप्त जीवा। दर्शनें सर्वा आनंद मनीं ॥ १३ ॥ गळा मेखळा सहलिंगी। लावण्यखाणी पुतळा जगीं। नृत्य करितां भजनरंगीं। पांडुरंगीं प्रेमभरतें ॥ १४ ॥ राजयोगी परमसमर्थ। वैराग्यखाणी लक्ष्मणनाथ। केलीं जेणें सकळ

तीर्थें । अनुक्रमें समस्त यथाविधी ॥१५॥ ब्रम्हनाळक्षेत्रासी येता । वर्तलें तेथें अपूर्व तत्वता । तें सविस्तर ऐकिजे कथा । येकाग्रता श्रोत्रिये ॥१६॥ श्रीरघुनाथस्वामि आनंदमूर्त । समाधि तयाच्या स्थान अद्भुत । कृष्णा-वेदासंगम जेथे । प्रसिद्ध जगीं तें ब्रम्हनाळ ॥ १७ ॥ लक्ष्मणमाहाराज तये स्थळीं । येते जाहाले पर्जन्यकाळीं । समाधि पाहावी नेत्रकमळीं । ईछा धरिली मनानें ॥ १८ ॥ उष्णकाळीं तयाचें दर्शन । सकळ-जनासी होतसे जाण । वर्षाऋतूंत उदकपूर्ण । करिती दुरून नमन तया ॥ १९ ॥ वृंदावनें तीं कृष्णेंत केवळ । उपाय कवणाचा तेथें न चले । ऐसें असता केलें नवल । तें सकळ ऐका तुम्ही ॥ २० ॥ आरंभ करुनी श्रीकीर्तना । अनन्यभावें स्तविली कृष्णा । ह्मणती माये पाहूं दे नैना । वृंदावना मजलागीं ॥२१॥ प्रार्थना करुनी येकनिष्ट । उभे राहिले तन्निकट । अत्यंतपर्जन्य वर्षतां स्पष्ट । करसंपुष्ठ जोडुनी पै ॥ २२ ॥ नगरवासी स्वस्थानीं । विनंति करिती बावालागुनी । न बैसति परि मेदिनी । रंगली वाणी कीर्तनीं ते ॥ २३ ॥ देहस्मृति कैंचि काई । निमग्नवृत्ति श्रीगुरुपाईं । लक्ष्मणनाथ ऐसें पाही । दीनत्राईं उभे ठाकले ॥ २४ ॥ मग वसुदेवासी यमुनेनें । मार्ग दिधला जैसा जाण । तया-परी उतरले जीवन । न लागतां क्षण तेसमई ॥ २५ ॥ आनंदभरें तात्काळ । काढविला तेथील गाळ । समाधिते अवलोकिलें । नमन केलें साष्टांग ॥ २६ ॥ षोडशोपच्यारें करुनी पूजा । अभीषेचिले श्रीगुरुराजा । समर्पुनी नैवेद्य वोजा । सोहं बीजा मंत्रपुष्प ॥ २७ ॥ शेवटीं केली प्रार्थना । डोल व्हावा वृंदावना । तये काळीं सांगती जाणा । करुनी नमना सकळ जन ॥२८॥ माहाशिवरात्र आणि रामनवमीसी । डोल होतो प्रतिवर्षीं । याविर-हीत अन्य दिवसीं । वृंदावनासि डोल नाहीं ॥ २९ ॥ शिष्टजन सांगता ऐसें । लक्ष्मणनाथासि आले हांसें । ह्मणती भक्तवत्सळ जगदीश । पाई विलसे ब्रीद तया ॥ ३० ॥ मग अनन्यभावें करुनी नमन । प्रार्थि-येला श्रीजानकीरमण । उभे ठाकले प्रतिज्ञा करून । नाथलक्ष्मण ते काळीं ॥ ३१ ॥ वृंदावनाचा डोल न होता । खालीं न बैसणें सर्वथा ।

नमन करुनी दृढाचित्ता । ठेविला माथा गुरुचरणीं ॥ ३२ ॥ तात्काळीक श्रीचें भजन । अटाहास्यें मांडिले जाण । नसेचि कांहीं देहभान । श्रवती नयन प्रेमें त्या ॥ ३३ ॥ सवाप्रहरपर्यंत । गजर होतां चि अद्भुत । गडबड जाहली बहुत । सद्गुरुनाथ धन्य ते ॥ ३४ ॥ भक्तप्रतिज्ञा खरी कराया । उल्हास जाहला श्रीरघुराया । डोलूं लागलीं तयाठायां । पसरुनि बाह्या वृंदावनें ॥ ३५ ॥ नागसर वाजतां फणी । डुलतो जैसा आनंदेंकरुनी । नातरी भक्त प्रेमळज्ञानी । पडतां श्रवणीं नामघोष ॥ ३६ ॥ किंबहुना वायु लागतां रुखा । हालती येकसरा जेवि शिखा । वृंदावनाचा डोल देखा । तैसा निका होतसे पै ॥ ३७ ॥ गगनीं दाटलीं विमानें । आश्चिर्य करिती देवगण । कळीमध्यें जडपाषाण । प्रत्यक्ष जाण डोलविले ॥ ३८ ॥ आसो मंगळ आरती करुनी । श्रीस केला नैवेद्य पूर्ण । जेवले बहूत ब्राह्मण । दिधलें अन्न सर्वांसी ॥ ३९ ॥ नंतर निघोनी आळंदीसी । येते जाहले ज्ञानेश्वरासी । आनंद जाहला बहू मानसीं । समाधीसी पाहूनि पै ॥ ४० ॥ दिनत्रय राहूनि तेथें । किर्तन केले अत्याद्भुत । तेथुनी प्रयाण केले निरुते । पंढरीनाथ पाहावया ॥ ४१ ॥ भजनें कडाका ध्वनी प्रबळ । बहुत मिळाले शिष्यमंडळ । अभंग ह्मणुनि प्रेमळ । नृत्य सोज्वळ करिती पै । ॥ ४२ ॥ ते सुख केतले वानूं । विसर्जित जाहले देहभानु । उगवला तेथें स्वानंदभानु । द्वैत आज्ञानु निशि कैंची ॥ ४३ ॥ मागें पुढे हारि दाटला । जगदाभास समूळ आटला । आनिर्वाच्य ऐसा सोहोळा । देव आला सामोरा तया ॥४४॥ प्रवेश करितां श्रीराऊळी । लक्ष्मणनाथासी मुद्रा लागली । समचरणीं मिठी घातली । भेटी जाहली देवभक्ता ॥४५॥ रंगशिळेवरी भजनासी । उभे राहती सच्चिद्विलासी । आनंद नावरे देवासी । धरिती पोटिसी श्रीविठ्ठल ॥ ४६ ॥ असो चातुर्मास्य करोनि पंढरी । लक्ष्मणबावा आले आपुले घरी । समागमे श्रीहरी । रावणारी तिष्ठतसे ॥ ४७ ॥ प्रात:काळीं नित्यनेम । भजनासी उभे राहातें प्रेमे । श्रवतसे थबथबा घाम । सुंदर परम नृत्य तें ॥ ४८ ॥ भजनशील नारदमुनी ।

तो हि थक्कीत होतसे मनीं । लक्ष्मणनाथ धन्य मेदिनी । अप्सरा नर्तनीं लज्जित त्या ॥ ४९ ॥ ऐशाप्रकारें बहू दिवस । आराधिला श्रीपंढरी-निवास । गुरुसेवा करूनि विशेष । जगत्रयास उद्धरिलें ॥ ५० ॥ सेखि निर्याणसमय प्राप्त होता । जाणवले श्री लक्ष्मणनाथा । समाधिस्थान तत्वता । करविले सर्वथा अळंदिसी ॥ ५१ ॥ श्रीज्ञानेश्वराचे सांनिध्य । प्राणायाम करूनि शुद्ध । जीवंतसमाधि साधिला प्रसिद्ध । अवर्णीय सिद्धलिला ते ॥ ५२ ॥ नारदतुंबर नाचती । पुष्पवृष्टि देव करिती । चिदाकाशीं मीनली ज्योति । धन्य स्थिति अद्भुत ते ॥ ५३ ॥ शके संवत्सर कोण दिवस । कोण तिथी कोण मास । ते हि आइका सावकाश । येकाग्र मानस करोनि ॥ ५४ ॥ आतां मल्हारनाथ स्वामिसमर्थ । राहिलें कथन तयाचें निश्चित । ऐका ते येकाग्रचित्तें । सबाह्य भेटत श्रीगुरु त्या ॥ ५५ ॥ उद्बोधनाथाचे चिरंजीव । मूर्तिमंत तो ब्रह्मानुभव । की अवतरला प्रेमळभाव । रूपे मानव कलीमाजी ॥५६॥ नातरी मल्ल हे कामक्रोधादि निर्धारी । गांजिले येणें पृथ्वीत जीव भारी । निर्दळावया तयाते अरी । साधुरूपे हरी प्रगटले ॥ ५७ ॥ यास्तव मल्लारीनाथ नाम । वित्पन्न जाणती अर्थवर्म । स्थापिला जेणे स्वात्मधर्म । निरसिती जन्ममृत्य जीवाचे ॥ ५८ ॥ मल्हारनाथाची स्थिति सांगता । मौनावती वाच्या तत्वता । प्राप्त होउनि तादात्मता । सबाह्यता परिपूर्ण ॥ ५९ ॥ कर्मउपासना ज्ञान । त्रिकांडवेद जाणी पूर्ण । वैराग्य न करावें वर्णन । आयाचित जाण वृत्ती ते ॥ ६० ॥ काशीयात्रा तीन वेळा । यथासांग घडल्या जयाला । श्रीरामेश्वर युक्त पूजिला । उद्धारिला जीवसमुच्चय ॥ ६१ ॥ संताबाई स्त्री जयाची । पतिव्रता ते साध्वी साची । सेवा केली निजपतीची । ऐका तयाची गोष्टी ते ॥ ६२ ॥ प्रत्यहीं करुनी चरण क्षालन । यथासांग करूनी पूजन । जे जे काळीं जें जें अन्न । करी समर्पण इच्छिले ते ॥ ६३ ॥ भजन भोजन उभयतां । करीत असावे सर्वथा । योगमार्गी सादरता ।

अत्यंत चित्ता ऐक्य असे पै ॥ ६४ ॥ की सदाशिव आणि भवानी । नातरी लक्ष्मी चक्रपाणि । तैसी च दिसती याजनीं । धन्य मेदिनी मल्हार तो ॥ ६५ ॥ निरंजन स्वामी गाणपत्य । लोकत्रई माहासमर्थ । करहाटक क्षेत्री वास करीत । विस्तीर्ण कीर्ति जयाची ॥ ६६ ॥ तयासी स्वमुखें गणपतीनी । आज्ञापिलें कृपेकरूनि । ह्मणती मल्हार स्वामीचे घरासी जाउनी । संपुष्ट नेउनी द्यावे तया ॥६७॥ ऐसे सांगता गजवदनें । गेले राशनासी निरंजन । साष्टांगेसी करूनि नमन । बोलती वचन हितगुज ते ॥ ६८ ॥ सेवटीं सुचविले जोडुनी हात । वदनीं काय सुनिश्चित । भिक्षा आचरण सहजस्थित । हे चि युक्त साधुसी ॥ ६९ ॥ अयाचित वृत्ति ईतराला । उचित नोव्हे साधकाला । दत्तगोरक्ष ज्या भिक्षेला । अनुसरला सदाशिव ॥ ७० ॥ रामदासादि गेले कथून । तुकारामाचे अभंग जाण । सर्वोत्कर्ष भिक्षा ह्मणून । समास लेखन दासबोधीं ॥ ७१ ॥ देवाधिदेव श्री गजमुख । वहन जया शोभे मुषक । आज्ञापिले तेणें देख । संपुष्ट निके द्यावया तुह्मा ॥ ७२ ॥ तरी हें संपुष्ट घेउनी हातीं । भिक्षा करावी नित्याप्रती । समाप्त करूनी अयाचित वृत्ति । श्रीगुरुप्रती भजावे ॥ ७३ ॥ मल्हारनाथासी ऐशापरी । सुचविता निरंजनस्वामीनी निर्धारि । आरंभ केला त्या अवसरी । संपुष्ट करीं घेउन ॥ ७४ ॥ अग्रही वर्तणे कैचे काई । देहींच वर्तती जे विदेही । अनन्यभाव संतापाई । दैवत नाहीं दुजें तया ॥ ७५ ॥ निरंजनस्वामीचें करूनी पूजन । ठेउनी घेतले येकवीस दिन । प्रत्यहीं होतसे कीर्तन । ग्राम राशन धन्य तें ॥ ७६ ॥ मल्हारनाथस्वामिते । पंढरीचा प्रेमा बहुत । ज्ञानेश्वरीचा पाठ करीत । वाचे स्मरत गुरुनाम ॥ ७७ ॥ गुरुवारी सदा ज्यागर । विद्वज्जन मिळती फार । कोंदलें नभ तेणेंगजरें । साक्षात्कार होतसे पै ॥ ७८ ॥ येकायेकीं प्रकाश होउनी । परिमळ सुटावा तयेस्थानीं । मल्हारनाथ धन्य जनीं । अवतार मेदिनी उद्धरावया ॥ ७९ ॥ ऐशा प्रकारें हे नवनाथ । माहानसाधु जाहाले कलींत । गुरुभक्तीचे करुनी

निमित्य । उद्धरीत सकळ जीवा ॥ ८० ॥ शिष्यसंप्रदाई पाहातां तयाचे । कोंबची केवळ त्या ज्ञानवृक्षाचे । मनोहरनाथ देखिले साचे । वर्णिता वाचे सुख होय ॥ ८१ ॥ दर्शनमात्रें निर्धारें । मनाचें मनपण तात्काळ हरे । यालागी नाम मनोहर । शोभे साच्यार ज्यालागी ॥ ८२ ॥ ज्ञानेश्वरीची येकचि वोवी । कीर्तनामाजीं जेणें गावी । समाधी सकळाला लागावी । धन्य अनुभवी ह्मणती ते ॥ ८३ ॥ मग इतर काय सांगणे । भगवान ज्याचे संगे जाण । मागे धावे प्रीतिकरून । जया क्षण न विसंबे ॥ ८४ ॥ तैसाचि हरिनाथ ज्ञातीचा वाणी । गुरुनामीं ज्याची रंगली वाणी । तेथे कैची ज्ञानाची वाणी । ह्मणुनी वानी जग तयाते ॥ ८५ ॥ दडगल ज्यासी उपनाम । अखंड वाचेसी ज्याचें नाम । निरसोनी जेणें रूपनाम । सेविले अनाम परब्रह्म ॥ ८६ ॥ नउनाथज्ञानसमुद्रामाझारी । ऐशा बहुत शिष्यलहरी । वर्णन करिता निजवैखरी । लवणापरी ते विरतसे ॥ ८७ ॥ नवविधरत्नें नवनाथ । कीं नवनिधी त्या प्रगटल्या सत्य । नातरी नवविधभक्ति मूर्तिमंत । अवतरले सत्य भूठाई ॥ ८८ ॥ कीं नवरसे सांडूनि जडपण । ज्ञानरूप जाहाले जाण । कीं नवग्रहानी ग्रहत्व टाकून । भक्तिज्ञान सेविले ॥ ८९ ॥ किंबहुना नव इंद्रियाचा । मूर्तिमंत श्रीसदाशिव साचा । जगद्गुरु आद्य सर्वाचा । नउनाथांचा मुख्य प्राण ॥ ९० ॥ शिष्यमेळा ते शिवगण । नाथसंप्रदाई तयासी नमन । आठवले तितुके अख्यान । गाईले गुण श्रीगुरुचे ॥ ९१ ॥ नउनाथलिला सागरतीर्थी । बुद्धि सेवील तिटवी किती । परि पावन होणे निश्चिती । तुषारयुक्ति करुनी ॥ ९२ ॥ सद्गुरुसिद्धकृपा धन्य । ग्रंथ होतसे सर्वा मान्य । श्रवण पठणें श्रीभगवान । देत दर्शन प्राणीया ॥ ९३ ॥ अहंकाररावणवधार्थ । देह आयोध्ये आत्मा रघुनाथ । अवतरला जोति विलसत । पंढरीनाथ समचरणी ॥ ९४ ॥ नवनाथफकड्या संतसुमने । राजारामीं गुंफीलीं सुमनें । सिद्धनाथ तो अर्चिला पूर्ण । मालिका करून हेचि करवी ॥९५॥ याउपरी कथा निरंजनस्वामीची । वर्णवितील स्वामी उत्तम

साची ऐकता सकळ जीवाची । कामना नेमाची पुरेल पै ॥९६॥ भक्तमंजरी-मालाग्रंथ । श्रवणेचि पुरती मनोरथ । नवनाथअवतारचारित्राते । अध्याय समाप्त चतुर्थ हा ॥ ९७ ॥ आध्याय ॥ ४ ॥ अनुक्रमे आध्याय चवतिसावा ॥ ३४ ॥



## अध्याय ३५ वा

### —निरंजनस्वामी—

॥ श्रीगणेशायनमः । श्रीरामसमर्थ ॥ ॐनमोश्रीगणाधीशा । मूळप्रकृतिपरेशा । प्रणवरूपा अविनाशा । स्वामि सिद्धेशा जगद्गुरु ॥१॥ तूं निर्विकार निरंजन । अद्वितीय ब्रह्म जाण । तेथे जाहाले सहजी स्फुरण । माया पूर्ण तेचि बोलिजे ॥ २ ॥ मी ब्रह्म ऐसें स्मरतां । प्राप्त जाहाली तुर्यावस्था । स्वरूपीं दुश्चित कांहीं होतां । गुणमयी पाहाता तेचि पै ॥ ३ ॥ गुणापासाव सकळ सृष्टी । पिंडब्रह्मांड प्रसवले पोटीं। जीवाशिवाची सहजी राहाटी । तत्वगोष्टी सकळ ते ॥ ४ ॥ जैसे येकाच उदकाचे प्रकार । लवण मोती जाहाली गार । तैसे घडले विकार । निर्विकार स्वरूपासी ॥ ५ ॥ मी देही ह्मणुनी गोटले । मीठ तेचि जाणा भले । मुक्त आसता बंधन पावले । मुक्तफळ जैसें का ॥ ६ ॥ जळापासुनी वेगळी जाहाली । आकारासी जरी आली । तरी पाहाता गार विरुनी गेली । सबाह्य पहिलि नीर चि ते ॥ ७ ॥ तेवि ज्ञानविग्रह परमेश्वर । सस्वरूप निर्विकार । देवभक्त जरी आवतार । जाहाले पर अद्वैत ते ॥ ८ ॥ आसो जीव अज्ञान भ्रमले । स्वरूपाते विसरून गेले । जन्ममरणाचे प्रवाहीं पडले । समूळ नाडले आपण ते ॥ ९ ॥ तयाची करावया सोडवण । जन्म घेती साधुजन । ऐकतां तें चरित्र पूर्ण । तुटे बंधन येकसरा ॥१०॥ सकामनिष्काम असोत श्रोते । आवड तयाची साधुकथे । तयाचे पुर्विती मनोरथ । सद्गुरुनाथ स्वयेची ॥११॥ पूर्वी श्रीव्यासनारायण । भृशुंडीचें जें आख्यान । पुराणांतरीं कथिलें जाण । साद्यंत पूर्ण मुळींचें पै ॥ १२ ॥ निरंजन तयाचा अवतार ।

प्रत्यक्ष जाहाला महावीर । ते ही कथा ऐका सार । निश्चळ अंतर करूनी ॥ १३ ॥ तरी तो मागील इतिहास । कैसा म्हणाल तर ऐका सुरस । व्यासोक्ति वदली बहुवस । येथें असे सक्षेप ॥ १४ ॥ वाल्हा कोळियाचे परी । हिंसक अति दुराच्यारी । नामा कैवर्तक निर्धारी । पृथ्वीवरी होता तो ॥ १५ ॥ नामळ ग्राम आहे जेथें । अटव्यवन होतें तेथें । राहतसे तो निश्चित । जन ह्मणत नामा तया ॥ १६ ॥ टोणपा सदा धारण करूनी । पांथस्तासी वधी काननीं । द्रव्य तयाचें हरण करूनी । कुटुंब पोषणीं विचरतसे ॥ १७ ॥ ऐसा बहुत काळ क्रमिला । पातकाचा पर्वत जाहाला । पतित पुरा होऊन ठेला । दुरिताला उणे नसे ॥ १८ ॥ तये काळीं ऋषी गणाचा । मुगुटमणी गाणपत्याचा । प्राप्त जाहाला मुनि साचा । मुद्गल वाच्या म्हणती त्या ॥ १९ ॥ दुराचरण शापदग्ध । नामा कैवर्तक परिक्षिति सिद्ध । करावया तयासी बोध । मुद्गल प्रसिद्ध शुक पातले ॥ २० ॥ नातरी ते पातकनीशि । नामा कैवर्तक युक्त तेणेसी । तेथे प्रगटला तेजोराशी । मुद्गल ऋषी प्रतापार्क ॥ २१ ॥ किंबहुना दुरितरोगाते । धन्वंतरी पातला मुनि समर्थ । उपच्यारिले ते ऐका श्रोते । कैवर्तकाते भवरोगिया ॥ २२ ॥ दर्शनमात्रें करूनी । रेचन तेचि अनुताप मनीं । अर्धमात्रा पूर्ण देउनि । घातिले वदनीं ब्रह्मरसा ॥ २३ ॥ उपासना जे सकळा आद्य । दिधली तयासी तीच सद्य । माहागणपति जो का प्रसिद्ध । मंत्र शुद्ध तो उपदेशिला ॥ २४ ॥ पाला फुटेल टोणप्याला । दोष गेळे तेचि वेळा । ही खुण सांगून कैवर्तकाला । मंत्रोच्चाराला बैसविले ॥ २५ ॥ आपण निघुनी सिद्धपंथें । जाते जाहाले सद्गुरुनाथ । गणेश आराधन जाहाले प्राप्त । कैवर्तकाते दैवदशे ॥ २६ ॥ मग तेथें काय पाहाणें । आधींच मूळीचा तमोगुण । घातिले तेणे सदढ आसन । अनुष्ठान आरंभिले ॥ २७ ॥ जन्मांतर तयाचे सांगतां । विस्तार होईल हा चि ग्रंथा । राहिली ती दूरी कथा । चरित्र तत्वता निरंजनाचे ॥ २८ ॥ असो बहु त्या तपाग्नीनें । पातक

गेलें जळोन । टोणप्यासी फुटले पल्लव पूर्ण । बाणली खुण श्रीगुरुकृपें ॥ २९ ॥ परी तप न करी समाप्त । विसरोन गेला देहभावाते । गणेशध्यानीं तन्मय चित्त । तें सुकृत न वर्णवे ॥ ३० ॥ तेणेंकरून इंद्रपदासी । कंप सुटला निश्चयेसी । सकळ देवता दर्शनासी । आल्या भूमीसी न जाणे तो ॥३१॥ निजध्यास ऐसा होता । प्राप्त जाहाली स्वरूपता । आळीकिटकन्याये तत्वता । गणेश सर्वथा जाहाला तो ॥ ३२ ॥ देहस्मृति मावळली । भृकुटींतून शुंडा फुटली । जगीं कीर्ति विख्यात जाहाली । भृशुंडी बोलि यानामे ॥ ३३ ॥ नारदासी हीनयोनी पासुनी । मुक्त केले श्रीगुरूनी । तयापरी जाहाले जनीं । भृशुंडीमुनिलागी पै ॥ ३४ ॥ ऐशाप्रकारें तो गाणपत्य । लोकत्रई जाहाला समर्थ । दर्शनमात्रे जीवा तारीत । कृपावंत ऋषी तो ॥ ३५ ॥ पुढें कांहीं काळेकरून । भृशंडी जाहाले स्वरूपीं लीन । राहिले परि अंतःकरण । गणेशभजन करावया ॥ ३६ ॥ अनुक्रमेंसी तें चरित्र । वर्णवितो सिद्ध पवित्र । येकाग्रवृत्ति ऐकता श्रोत्र । स्वतंत्रपद पाविजे ॥ ३७ ॥ प्रणवरूप श्रीगणपति । भृशुंडि माहाराज तो निश्चिती । यालागीं अवतार धरीला क्षिती । प्रणवोक्ति कृष्णतिरी ॥ ३८ ॥ विशेष क्षेत्र श्रीकरहाटक । अमर वांछिति ज्या भूमिके । माहात्म्य जेथील आलौकिक । वर्णिता सुख बहुतेका ॥३९॥ ॐकाररूप देव तिन्ही । उदकस्वरूपे जेथें मिळणी । ब्रह्माविष्णुरुद्र नैनीं । पाहाती जनीं सकळीक ॥ ४० ॥ ब्रह्मदेव तो ककुत्मती । जाणिजे कृष्णा ते श्रीपति । व्यासादिकीं कथिली युक्ति । वेण्या ह्मणती महेश्वरा ॥४१॥ ईडा पिंगळा सुशुम्ना । उदक रूपीणी त्रिपुटी जाणा । योगीयासी ऐसीये स्थाना । वाटले मना जन्म घेत ॥ ४२ ॥ असो कऱ्हाटकक्षेत्री प्रीतिसंगम । अवतरले तेथें चित्सुखधाम । भृशुंडीनाम योगी परम । गाणपत्या निशिम मुगुटमणी ॥ ४३ ॥ यजुर्वेदी माध्यंदिनीशाखे । महाविद्वान नृसिंव्हपाठक । कृष्णाबाई स्त्री देख । साध्वी निःशंक पतिव्रता ॥ ४४ ॥ नेणो तपाची कोण राशी । नव जाय वर्णिले त्या भाग्यासी । संत जन्मती

ज्याचे कुशी । लोक त्रयासी धन्य ते ॥ ४५ ॥ गर्भसंभव होताची । पालटली वृत्ति मातेची । देहभान जाउनी साचि । स्वरूपाची तादात्म्यता ॥ ४६ ॥ दुर्वांकुर वांटुनि पेणे । सर्वकाळ गणेशभजन । केव्हा तरी खावें अन्न । येक दोन दिवसांनीं ॥ ४७ ॥ ऐशापरी नऊ मास । पूर्ण जाह्याले गर्भास । तंवपर्यंत निःशेष । ते होत नसे ऋतुस्नात पै ॥ ४८ ॥ भृशुंडीमाहाराज येणार उदरीं । तो चमत्कार जाहाला आधींच निर्धारीं । सांगीजेल तो ऐका चतुरीं । नरनारी सर्वत्र ॥४९॥ कार्या आधीं होती शकुन । ज्ञान वैराग्य पूर्वी जाण । नातरी उद्भवे प्रभंजन । येणार पर्जन्य म्हणूनी ॥५०॥ तयापरी नवल जाहालें । येऊन घरासी तपस्वी बोले । नृसिंव्हपाठका सुचविलें । चतुर्थी भले व्रत कराया ॥५१॥ येक-वीस चतुर्थ्या होतांचि जाण । कृष्णाबाई जाहाली गर्भीण । मग त्या सुखा वर्णील कोण । श्रीगज्यानन जिच्या उदरीं ॥ ५२ ॥ असो नउ महिने पूर्ण होतां । जन्मले ऋषी भृशुंडि तत्वता । शके संवत्सर तो चि आता । कथन सर्वथा करणें ते ॥ ५३ ॥ पंधराशे शके शालिवाहन । सत्तावन आणिक वरुते जाण । संवत्सरासि नामाभिधान । ईश्वराख्य जन बोलती ते ॥ ५४ ॥ शुक्लपक्ष माघमास । तिथी चतुर्थी व्रत असें । रेवतिनक्षत्र प्रथम चरणास । भृशुंडीस अवतार तो ॥ ५५ ॥ ध्यान पाहातां अनोपम्य । गणेशाकृति साजिरें निःशीम । सकळमंगळाचें धाम । तेजस्वी परम गौरवर्ण तो ॥ ५६ ॥ लंबोदर खुजट मूर्ति । सामुद्रिकाचिन्हें अयति । ध्वजवज्रांकुश शोभती । पदतळाथीं सलक्षणें ॥ ५७ ॥ करमुळ्यासी दशचक्रें । विशाळ भाळ न्हस्व नेत्र । मित भाषण प्रसन्न वक्त्र । अवतार पवित्र श्रीगणपति ॥ ५८ ॥ असो भृशुंडी ऋषी गाणपत्य । अवतरण तयाचें जाहाले सत्य । जगदोद्धार कराया कृत्य । जन्मतथ्य साधुसी ॥ ५९ ॥ नीरंजन पदवी या जीवाची । दुरावली मुळचि साची । जनत्वदशा अज्ञानाची । बुंधी मायेची प्राप्त जाहाली ॥ ६० ॥ तयाचे करावया निरशन । भृशुंडी अवतरले आपण । धरिले तेचि नामाभिधान । वदती निरंजन

सर्वत्र ॥ ६१ ॥ बलिष्ट नक्षत्र रेवति । प्रथमचरणीं जन्मली मूर्ति । जन्मनाम देव निश्चिती । गणक बोलती स्वामिते ॥ ६२ ॥ तेचि ऐकुनी सकळिकांनीं । देव ह्मणती प्रिती करूनी । नातरी भूदेव द्विजालागुनी । संबोध जनी प्रसिद्ध पै ॥ ६३ ॥ किंबहुना देवभक्त । उभयता स्वरूप येक निश्चित । यास्तव युक्ति गाणपत्याते । बोलती समस्त देव ह्मणुनी ॥ ६४ ॥ असो अघोर कलि माजला । विघ्न करी आत्मप्राप्तीला । यालागी अवतार स्वयें धारिला । श्रीगणेश जाहला भक्तरूप ॥ ६५ ॥ दिवसेंदिवस वाढतां जाण । बाळलीला करीतसे पूर्ण । बुद्धि प्रकाश काय सांगणे । ज्याचे स्मरणें ज्ञानोद्भव ॥ ६६ ॥ निरंजनाचे गुण वर्णितां । वाच्या पावती तन्मयता । परी आवडी जाहाली चित्ता । उन्मनी अवस्था कोण वरी ॥ ६७ ॥ तरी ते ऐका श्रोते तुम्ही । ज्ञानाभिमान सांडुनी ऊर्मि । भक्तिपर ते निर्गुणधामी । काय भूमी अधिक ते ॥ ६८ ॥ अद्वितीय ते निरंजन । द्वितीयवर्षापासुनी जाण । करूं लागले नामस्मरण । गणेश भजन अतिप्रिती ॥ ६९ ॥ त्रितीय वर्षापासुनी । ध्वजपताकादि खेळ करुनी । मुळांमध्यें फिरता जनीं । नाम वाणी गर्जतसे ॥ ७० ॥ चवथे वर्षी देवालय । गणपतींचें रचिलें स्वयें । पूजन करुनी यथान्वय । कीर्तन अद्वय आरंभिलें ॥ ७१ ॥ पंचम वर्षी व्रतबंध । करिता जाहाला पिता शुद्ध । तो सोहळा वर्णितां अगाध । ध्यान सिद्ध शोभतसे ॥ ७१ ॥ कौपीन मेखळा यज्ञोपवीत । नासीक सरळ शुंडाकृत । प्रत्यक्षता गणनाथ । मानव सत्य द्विभुज पै ॥ ७३ ॥ असो सकळ व्रतबंध समयीं । संत मिळाले असती पाही । मग तो आनंद वर्णवे कायी । कृतार्थ देहीं माता पिता ॥ ७४ ॥ निरंजनस्वामी जन्मले जेंव्हां । चमत्कार जाहाला जनकासी तेंव्हां । स्वप्नांत येउनी गणेश बरवा । जन्मलों साधवा ह्मणे उदरीं ॥ ७५ ॥ भाविक पूर्ण नृसिंह पाठक । संत जनासी हे ठाउकें । रघुनाथस्वामी समर्थ देख । दिधली सुखें गाय तया ॥ ७६ ॥ दुग्धपान कराया निरंजना । ब्रह्मनाळ क्षेत्राहून जाणा । परस्परें समजून खुणा ।

गाय दोहना पाठविली ॥ ७७ ॥ औंधासी जातां देवीसी । तेथें भेटले परमहंसऋषी । देखुनी बाळ त्या पाठकासी । आपणापासीं बैसविलें ॥ ७८ ॥ निरंजनस्वामी करितील लीळा । तो तो विध सविस्तर लिहीला । तात्काळ श्लोक सिद्ध केला । गळयात बांधीला शिशुचे ॥ ७९ ॥ नृसिंह भटजीस सकळ सांगून । आलिंगन दिधलें स्वामीसी जाण । परमहंस जाहाला अदृश्यमान । करुनी नमन त्याठाई ॥ ८० ॥ ऐसें प्रथमवर्षीं निरंजनस्वामीचे । चमत्कार जाहाले उदंड साचे । काय वर्णू येकवाचे । पाठकाचें भाग्य त्या ॥ ८१ ॥ असो मौंजीबंधन जाहाल्यावरी । परम उदास निरंजन अंतरीं । सर्वकाळ वदे वैखरी । विघ्नारी गज्यानन तो ॥ ८२ ॥ जनक इछी विद्याभ्यास । करावया स्वपुत्रास । हें नावडे निरंजनास । सदावास येकांतीं ॥ ८३ ॥ श्रीकरहाटक क्षेत्रीं गणेशतीर्थ । प्रसिद्ध आहे जें कृष्णेंत । तये स्थळीं पुरश्चरणाते । येक चित्तें आरांभिलें ॥ ८४ ॥ नेणे आणिक दया कांहीं । तपश्चर्या धरिली पाही । चिंताक्रुति जाहाला ह्रदईं । पाठक नाहीं स्वस्थ तो ॥ ८५ ॥ सकळ क्षेत्रामाजीं आपण । विद्वान् वदती सर्वत्र जन । तो मी प्रसवलो विद्याहीन । निरंजन पुत्र मूढमती ॥ ८६ ॥ कोण देव नवसूं आतां । अपकीर्ति जाईल दिगंता । जन्मासी येउनी सार्थकता । कांहीं पाहातां न दिसे ते ॥ ८७ ॥ अग्नहोत्र नृसिंव्हपाठक । पूर्णविद्वान् परि भाविक । अखंडीत श्रीगणनायक । वाक्यनिके स्मरतसे ॥ ८८ ॥ ह्मणे मूर्ख पुत्र विधवा कंन्या । ज्यारिणी भार्या ज्याची जाणा । कुटीळ मैत्र कुग्राम स्थाना । तया मना स्वस्थ कैचे ॥ ८९ ॥ रोगग्रस्त सदा शरीर । जन्मवरी घरीं दरिद्र । जन्मासी येउनी काय नर । आयुष्य सारे व्यर्थ तें ॥ ९० ॥ ऐशापरी अनेक रिती । नृसिंव्ह पाठक दुःखित चितीं । सर्वसाक्ष श्रीगुरुमूर्ति । निरंजन स्थिती समजले ॥ ९१ ॥ गणेशतिर्थीं अनुष्ठानास । प्रत्यहि बैसणें श्रीस्वामीस । तेथें आणिले सहजीं मनास । पितृसंतोष करावा ॥ ९२ ॥ तात्काळ येउनी होमशाळेस । केला अग्नीसी प्रणिपात । उंचस्वरें अध्ययनाते । केला

त्वरित प्रारंभ ॥९३॥ ध्यारी वेद साही शास्त्रें । पुराणादि ग्रंथ विचित्र । पठण करिती मूळमंत्र । तयसे तंत्र मुखोद्गत ॥ ९४ ॥ येकायेकी ध्वनी प्रगटता । जनादि करुनी पातला पिता । आश्चर्य वाटलें सकळ चित्ता । फुटली वार्ता क्षेत्रांत ॥ ९५ ॥ पुसती सर्व पाठकासी । वेद सांगितले केंव्हां यासी । तो ह्मणे कधीं निरंजनासी । नाहीं श्रुतिसी शिकाविले ॥९६॥ सदा बैसतो येकांतीं । कृष्णातटाकीं गणेशतर्थीं । वेदाध्ययन कोणे रिती । प्राप्त निश्चिती यालागी ॥ ९७ ॥ प्रत्यक्षता श्रीगणपति । भृशुंडी माहाराज तो हा क्षिती । ब्रह्मनिष्ठ ज्यासी ध्याती । अवतार जगती निरंजन ॥ ९८ ॥ ज्ञानेश्वराचे कृपेंकरून । रेडा चि करी वेदपठण । तेथे स्वयें निरंजन । ह्मणे अध्ययन काय अधिक ॥ ९९ ॥ परि दुर्धर कर्मगति । विसरूनि गेले आत्मप्रचिति । अज्ञानाची जाहाली राती । पडली भ्रांति सकळजीव ॥ १०० ॥ साधु प्रत्यक्ष ब्रह्मरूप । न मानी त्यासी घडे पाप । नवल भ्रांति जडली बाप । फिरती स्वरूप धुंडावया ॥ १ ॥ जेथें जेथें धोंडापाणि । जाती उगेचि तीर्था प्राणि । मुख्यार्थाची व्यासवाणी । वदली पुराणीं संतभजन ॥ २ ॥ न घडे कदा तेचि करिती । न कळे ज्याची कवणा गति । सत्तामात्रें पंचभूतीं । वर्तणे स्थिती निजव्यापारी ॥ ३ ॥ ऐसा महाराज निरंजन । तयासी वेद पढविता कवण । ज्याचेनी वेदा वेदपण । तेथें सिकवणें कवणाचें ॥ ४ ॥ असो पित्यासी संतोष जहाला । जगीं किर्तिदीप उजाळिला । निरंजनरूपें अवतरला । भृशुंडी भला ऋषी तो ॥ ५ ॥ पुढें ऋणानुबंधे करून । वधूचे जाहाले पाणिग्रहण । परापेक्षा सोहळा पूर्ण । सांग जाण जाहाला तो ॥ ६ ॥ द्वादश वर्षें होतांचि पाही । वैराग्य जाहाले प्राप्त हृदईं । गुरुकृपेवीण कांहीं । न घडे देहीं सार्थकता ॥ ७ ॥ यालागी चित्तीं विच्यार करून । चाफळासी गेले निरंजन । रामदासस्वामिसी केलें नमन । अवतार पूर्ण मारुतीचा ॥ ८ ॥ अनन्यभावें भाकिता करुणा । कृपेनें द्रवला श्रीगुरुराणा । आश्वासुनी निरंजना । बैसविले जाणा जवळ

पै ॥ ९ ॥ कुशळवृत्त पुसो जाता । ऐकिएली त्रितापतप्तता । तयेवेळीं अभयदाता । जाहालीं सांगता ध्यानास्थिती ॥ ११० ॥ ह्मणे निरंजना नेत्र झांकून । येकांतीं बैसावें उगेचि जाण । तेथें प्रगटेल जे का ध्यान । ते सांगणे मजलागी ॥ ११ ॥ निरंजन स्वामिनी तात्काळिक । ध्यानयोग साधिला देख । मूर्ति पाहाता श्रीगजमुख । प्रगटले सन्मुख निवेदिले ॥ १२ ॥ भविष्योत्तर जाणुनी पुढील । रामदासस्वामीनें आज्ञापिले । ह्मणति स्वमुखें उपदेशिले । श्रीगणपाळ तुजलागी ॥ १३ ॥ जन्मांतरीची सांगता खूण । संतोष पावले निरंजन । रामदासी वंदन करून । आले निघोन स्वग्रहासी ॥ १४ ॥ गणेशतीर्थी अनुग्रहार्थ । बैसते जाहले अनुष्ठानाते । येकविंशति दिवसाते । प्रगटले गणनाथ झडकरी ॥ १५ ॥ सप्तवर्षाचें वय लहान । लावण्यतेजें दाटलें गगन । येकायेकीं प्रगटायमान । जाहाले गज्यानन त्या ठाया ॥ १६ ॥ ध्यान पाहता गणेशाचें । ब्रह्मचर्य आंगीं साचें । कौपीन मेखळा नेपुराचे । घोष त्याचे अनुहातध्वनि ॥ १७ ॥ कटिसूत्र यज्ञोपवीत । गळा हार रत्नखचित । किरीट कुंडलें ढाळ देत । भूषणें शोभत सकळ पै ॥ १८ ॥ ऐशाप्रकारें विघ्नहर । ज्ञानविग्रह परमेश्वर । मानवाकृति जो साचार । भाळचंद्र उद्भवला ॥ १९ ॥ निरंजनस्वामिनी पाहातां डोळा । देहभाव सकळ गेला । मग तो वर्णील कोण सोहळा । प्रताप अगळा न वर्णवे ॥ १२० ॥ येकाक्षरमंत्र सांगूनी कर्णीं । येकात्मता दाविली जनीं । जनीं वनीं निरंजनी । केले गुरुनी निरंजना ॥ २१ ॥ मस्तकीं टेवितां वरदहस्त । निरंजन जाहाले समाधिस्त । अंतर्धान सद्गुनाथ । पावले तेथें ततक्षणीं ॥ २२ ॥ कांहींवेळ जाहाल्यावरी । निरंजन आले देहावरी । पुढें पाहाता विघ्नारि । मानवशरीरी न दिसे तो ॥ २३ ॥ परि अंतरीं बोध जाला । आत्मा सर्वत्र होउनि ठेला । स्वानंदाब्धि उचंबळला । प्रज्वाळला स्वानुभव ॥ २४ ॥ घरासी येउनी जननीप्रती । पिता नमिला साष्टांग प्रीति । तव आश्रमीं देखिली ज्ञानमूर्ति । काशीराज ह्मणती ज्यालागी ॥ २५ ॥ विज्यापुरीं राहात

होते । माहान्समर्थ आत्मवेत्ते । परमनिःशीम गाणपत्य । यजुर्वेदी सत्य वाजसेनी ॥ २६ ॥ पूर्वीं तयासी अनुग्रहार्थ । निरंजनानी विनविले होते । ते चि माहाराज गणेशभक्त । आले होते ते दिवसीं ॥ २७ ॥ तयासीसाही वंदन करिता । वोळखिलें चिन्ह तेणें तत्वता । ह्मणती प्राप्त जाहाली तुर्यावस्छा । निरंजना संता तुम्हासी ॥ २८ ॥ मग साकल्य निवेदन । निरंजनस्वामीनी केलें कथन । कंठ दाटला भरले नैन । जाहली म्हणून मूर्ति अदृश्य ॥ २९ ॥ खेद करिता बहुत चित्तीं । स्वप्नांत आले श्रीगणपति । अभय वचनें गौरविती । भगवान सांगती स्वमुखें तया ॥ १३० ॥ काशीराज गाणपत्य । हि तो विभूती आपुली मूर्त । मद्प जाणुनी तयाते । प्रसादतीर्थ घ्यावे पै ॥ ३१ ॥ आज्ञा होतांचि ऐशापरी । संतोषले निरंजन अंतरीं । जागृत होउनी त्या अवसरीं । स्वप्नवैखरी निवेदिले ॥ ३२ ॥ पुढें चमत्कार कथा गहन । वदाविती स्वामी सिद्ध पूर्ण । राजारामी मंगळाचरण । केले निरंजनचारित्रासी ॥ ३३ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । निरंजनस्वामी अख्यानाते । अध्याय समाप्त प्रथम हा ॥१३४॥ अनुक्रमे अध्याय पस्तिसावा ॥ ३५ ॥ १ ॥ दत्तात्रयरघुनाथ निरंजन वंदी वेदमूर्ति ॥ श्रीपादश्रीवल्लभ श्रीनरसिंव्हसरस्वति ॥



## अध्याय ३६ वा

### —निरंजन स्वामी—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु श्रीसिद्धेशा । निरंजना अखिल अविनाशा । परात्परा स्वयंप्रकाशा । हृदयनिवासा स्वसुखाब्धि ॥ १ ॥ निराकार स्वयंभ गोळ । तेथील स्फुरण ते शुंडा सरळ । अर्धमात्रा तेचि कपोळ । मस्तक सोज्वळ बिंदु तो ॥ २ ॥

शुर्पाक्राति ।दिशाकर्ण । चंद्रसूर्य तेचि नैन । येकदंत प्रसन्नवदन । परीपूर्ण येकात्मता ॥ ३ ॥ चतुर्वेद च्यारि अंगे । स्थूळादि गुज्या त्याचि सांग । शांतावरि जो अद्भुतरंग । भवभंग आयुधें तीं ॥ ४ ॥ फरश अंकुश ज्ञान विवेक । तृतिय जाणा वरदहस्तक । स्वामिबोधी तोचि देख । करी मोदक चतुर्थ जो ॥ ५ ॥ माहानप्रचंड लंबोदर । अनंत ब्रह्मांडाचें घर । मुक्तमाळा घातिला हार । वैष्णववीर ते चि पै ॥ ६ ॥ श्रृतिसूत्र कडदोरा । नागबंद तोचि खरा । अद्भुत तेज पीतांबरा । उपनिषद विच्यारा वर्णिति त्या ॥ ७ ॥ वाळे ते चि चरणीं घुंगुर । पतितपावन ब्रीद तोडर । ऐशा प्रकारे विघ्नहर । परात्पर नमियला म्यां ॥ ८ ॥ आतां वंदू मूळमाता । अर्धमात्रा तुर्यावस्था । तयेवीण अन्य पाहातां । नसे सर्वथा भुवनत्रई ॥९॥ प्रकृतिपुरुष जनकजननी । गणेशसरस्वति हेचि जननी । हे तो कळे ज्याचे वचनीं । सद्गुरू धणी नमन तया ॥१०॥ मागील कथा अनुसंधान । निरंजनस्वामिशी उपदेश जाण । प्रत्यक्ष केला गज्याननें । स्वमुखें प्रगटोनि गणेशतीर्थी ॥११॥ सर्वेचि तात्काळ गुप्त होतें । दुःख जाहालें निरंजनचित्ता । तये काळीं अपूर्वता । घडली वार्ता ऐका ते ॥ १२ ॥ काशीराज स्वामीप्रति । सांगते जाहाले श्रीगणपति । उपासनेची अद्वयास्थिति । दृढ चित्तीं करा तुह्मी ॥ १३ ॥ आज्ञापितां ऐशा प्रकारे । काशीनाथासी उल्हास थोर । निरंजनासी अत्यादरें । सांप्रदाय विचार सांगितली ॥ १४ ॥ अन्वयव्यतिरेक सिद्धमार्ग । संपूर्ण कथिला राजयोग । अंतरबाह्य चित्सुखरंग । गणेश अभंग भेटविला ॥ १५ ॥ तें स्वसुख उघड ग्रंथी । लिहितां नये वाचे हातीं । ज्याचा तो चि अनुभवे युक्ती । येरा गती न घडे ती ॥ १६ ॥ पारि ते दुर्लभ कैवल्यदानीं । जेथें तेथें मत्ताभिभिमानी । शाद्बीक विचार सांगुनी । भोंदिति जनीं भोळी तीं ॥ १७ ॥ हेही जीव मूढमति । भांडीक पाहूनि तया भजती । विसरोनि गेले आत्मप्रचिती । व्यर्थ स्फीती आवघी ते ॥ १८ ॥ असो काशीराजस्वामीमुखें । निरंजना बाणलें सुख । पुढें जाहाले जें कौतुक । आवश्यक तें श्रवण करा

॥ १९ ॥ सवादेग्राम पुण्य पावन । तया सन्निध पर्वत जाण । सिद्धेश्वर दैवत तेथें पूर्ण । अद्भुतस्थान सिद्धिदायक ॥ २० ॥ तयेस्थळी निरंजनस्वामीनीं । योग साधिला प्रीति करोनी । तात्काळ साधिली तेणे उन्मनी । आनंदभुवनीं प्रवेशिला ॥ २१ ॥ सहजस्थिति अनुभवद्वारें । विचरती सदा योगेश्वर । परी राहिला जगदोद्धार । तेणें विघ्नहार कळवळिले ॥ २२ ॥ प्रत्यक्ष प्रगटोनी निरंजनातें । सांगती तेव्हां श्रीगणनाथ । विसरला तुह्मीं स्वकार्यातें । उपासनेते वाढवावया ॥ २३ ॥ आत्मतत्व आपुलें आहेचि पहिलें । मुदल मुळींचें पूर्ण गाठोळे । वेव्हारधर्मीं वर्तता भले । मेळविले काय अधिक ॥ २४ ॥ जन्म घ्यावया साधूप्रति । हे चि ध्यावया बा त्रिजगती । भक्तिपंथ दाउनि प्रिती । वाढवावे निश्चिती गुरुभजन ॥ २५ ॥ ऐसे सांगुनी निरंजना । तूर्य अवस्था धरविली जाणा । अदृश्य जाहाला देवराणा । तयास्थाना भक्तवत्सळ ॥ २६ ॥ मग गाणपत्यामाजी आत्मवेत्ता । जो कां अवतार भृशुंडि तत्वता । निरंजनस्वामी ज्ञानदाता । उपदेश करिता जाहाला जगीं ॥ २७ ॥ मुख्य उपासना श्रीगणेश । विसरुनी गेले प्राणी तयास । प्रणवाकृति जो सर्वेश । हरिहर जयास वंदिती पै ॥ २८ ॥ तयाचें करितां निजभजन । विघ्नासी येतसे पै विघ्न । तरणोपाय जीवासी पूर्ण । निर्विघ्न पद पाविजे ॥ २९ ॥ याकागी निरंजन स्वामीनीं । उपाय आरंभिला तो चि जनीं । ठाई ठाई गणपति स्थापुनीं । उत्छाह मेदिनी योजियेले ॥ ३० ॥ प्रथम जाउनी वेळगावासी । स्थापन केले विघ्नहरासी । जनालागुनी भक्तीसी । मोरगावासी जाती मग ॥ ३१ ॥ श्रीमयुरेश्वर-स्वानंदपुरी । पुराणप्रसिद्ध ग्रंथांतरीं । शिष्यासहीत निघाली स्वारी । भजन गजरी तये स्थळा ॥ ३२ ॥ मार्गीं चालतां गाणपत्य । प्रेमभरें आनंदें नाचत । भाद्रपदी यात्रेते । जाहाले येते निरंजन ॥ ३३ ॥ तव तेथें साधुवृंदे । गणेशभक्त मिळाले बहुप्रसिद्ध । कीर्तन करिती नानाविध । अर्चनसिद्ध प्रदक्षणा ॥ ३४ ॥ नारायणबाबा

चिंचवडकर । गाणपत्यांमाजी जो कां धुर । तेणें करावा कीर्तनगजर । अश्यादरें दक्षणभागीं ॥ ३५ ॥ ऐशा प्रकारें अनेक संत । मान तयाचे तेथील सत्य । महागणपति अद्यदैवत । उत्साह होत अनोपम्य ॥३६॥ निरंजन महाराज तयांत श्रेष्ट । वंदिती जयास सकळ शिष्ट । आरंभिले कीर्तन स्पष्ठ । श्रीचे निकट सव्यभागीं ॥ ३७ ॥ निर्वेधस्थळ पाहून । करिति स्वामी सहजीं भजन । ते चिंचवडकरासी पाहतां जाण । ह्मणती मान अमुचा पै ॥३८॥ तये काळी श्रीगणपति । स्वप्नांत येऊनि प्रत्यक्ष मूर्ति ॥ नारायणबावासी आज्ञापिति । कथा कर ह्मणती वामभागीं ॥ ३९ ॥ तैपासुनि आद्यापवरी । कीर्तन होतसे स्वानंदपुरी । मान दिधला मोरेश्वरीं । अति आदरीं उजवेकडे ॥ ४० ॥ ऐसे महाराज प्रेमळ पूर्ण । जयाचा सखा श्रीभगवान् । वाचे स्मरतां निरंजन । निर्विघ्न पद पाविजे ॥ ४१ ॥ यात्रा सांग करुनी सकळ । श्रीचे चरणीं ठेविला भाळ । निरोप मागतां भक्तवत्सळ । श्रीगणपाळ काय बोले ॥ ४२ ॥ जेवि दुष्काळ पडलिया भणंगासी । मिष्टान्न मिळालें तयासी । पात्रा वरूनी उठवितां त्यासी । गति तैसीं घडली अह्मा ॥ ४३ ॥ कीं अवर्षण पडतां पृथ्वीवरी । मेघ वोळला गगनाभीतरी । आनंद होतां सर्वांतरीं । निवारण करी वायु त्या ॥ ४४ ॥ किंबहुना मरतया जीवा । अमृत मिळतां सदैवा । आला तेथें धाऊन गोवा । उठविले तेंव्हां पात्रा-वरुनी ॥ ४५ ॥ तयापरी निरंजना । तुह्मी जातां वाटतें मना । ऐसें बोले देवराणा । सद्गदपणा मयुरेश्वरीं ॥ ४६ ॥ मग गाणपत्यामाजीं श्रेष्ट । भृशुंडि अवतार जो कां स्पष्ट । आज्ञा वंदुनी सेवानिष्ट । राहिले निकट देवाळई ॥ ४७ ॥ गुरुमंत्राचे पुरश्चरण । आरंभीले प्रितीकरून । आराधिला गज्यानन । आळवण पिष्ट भक्षोनी ॥ ४८ ॥ गणेश गाणपत्य काय भेद । परि आवडीचा पूर्णानंद । अनुष्ठान करुनी समाप्त प्रसिद्ध । केला नैवेद्य मयुरेश्वरा ॥ ४९ ॥ निरोप घेतला देवाचा । विचार केला मनीं साचा । लाभ घ्यावा दर्शनाचा । साधुजनाचा योग पै ॥ ५० ॥ प्रथमारंभीं

श्रीगणपतिस्थान । स्वानंदपुर ज्या नामाभिधान । चतुर्दळ ह्मणती योगीजन । आधार जाण सर्वांसी ॥ ५१ ॥ गाणपत्य श्रीनिरंजन । पुढें चालिले ध्यावया दर्शन । सोपान देवाचें पाहिलें स्थान । ब्रह्मदेव पूर्ण अवतार जो ॥ ५२ ॥ सोपाननाम मार्गाचे । वेदपंथासी मूळ साचें । उत्पत्तीस्थान सकळाचें । षडचक्र वाचे बोळती त्या ॥ ५३ ॥ किंबहुना योगेश्वरासी । सोपान हेचि ब्रह्मप्राप्तीसी । याळागी नाम विरंचीसी । सोपान जनासी कळिमाजीं ॥ ५४ ॥ असो संतस्वरूपा धारण करून । विधाता जन्मला कराया भजन । तेथें गेले निरंजन । सासवड जन ह्मणती जया ॥ ५५ ॥ ब्रह्मकुमंडली जेथील गंगा । उत्पन्न जाहाली चित्सुखतरंगा । करा ऐसे प्राकृत जगा । ह्मणता भंगा पाप जाय ॥ ५६ ॥ तेथें जाउनी निरंजनस्वामींनीं । सोपान वंदिला साष्टांग मेदिनी । कुमंडलीचें स्नान करुनी । आन्हीक सारूनि स्थिरावले पै ॥ ५७ ॥ ध्यानयोगासी बैसतां जाणा । आठवलें सहजी स्वामीचे मना । ब्रह्मकुमंडली सप्रदक्षिणा । करावी विधानापुरस्कर ॥ ५८ ॥ ईछिता ऐसे निरंजनें । पुढें देखिले परमहंस जाण । करूं जाता अभिवंदन । घडले आलिंगन परस्परें ॥५९॥ मग उभयतांचा संवाद । केहूं जातां लेखणी स्तब्ध । जनीं असता निरंजन सिद्ध । वरिळी शुद्ध ताटस्तता ॥ ६० ॥ असो निरंजन वदती परमहंसाते । दर्शनें करुनी जाहालों पुनीत । आतां जाणे कोठें तुह्माते । केले कृतार्थ श्रीस्वामिया ॥ ६१ ॥ परमहंस ह्मणती आह्माळागीं । कारण कार्य कैचें जगीं । परी आवडी सत्संगीं । तीर्थरंगीं विचरावया ॥ ६२ ॥ आतां ब्रह्मकुमंडलीची प्रदक्षणा । करणे हे चि आवडी मना । ऐसें सांगता निरंजना । अंतःकरणा उल्हास बहु ॥ ६३ ॥ उद्भवे ईछा हृदयांतून । तेचि पुढे मिळता जाण । मग त्या सुखा वर्णील कोण । दृष्टांत गौण देणें तया ॥ ६४ ॥ निरंजन आणि परमहंस । उभयता निघाले प्रदक्षिणेस । ब्रह्मकुमंडलीच्या उगमास । नमिले तयास साष्टांगें ॥ ६५ ॥ अनुक्रमेसी विधीयुक्त । ठाईंठाईं देवतार्चित । जडजीवाते उद्धरींत । चालती पंथ आनंदेसी ॥ ६६ ॥ निरंजन मार्गीं श्रम चालता । तान्हयासी रश्मी

जेवि माता । परमहंसमाहाराज तेवि तत्वता । संरक्षी भक्ता परोपरी ॥ ६७ ॥ ऐशापरी तीर्थ प्रदक्षणा । यथासांग करुनी जाणा । मयुरेश्वरासी येउनी पुन्हा । घालुनि पूर्ण नैवेद्य केला ॥ ६८ ॥ असंख्य करुनी ब्राह्मणभोजन । सकळभूतासी अन्नदान । तोषवोनी श्रीगण्यानन । निघाले आपण स्वआश्रमा ॥ ६९ ॥ परमहंस बावासहीत । निरंजन गेले देवाळयाते । बद्धांजुळी जोडुनी हात । केला प्रणिपात साष्टांगें ॥ ७० ॥ निरोप घेउनी मागें पाहातां । तो परमहंस जवळी नाहींत तत्वता । विस्मय जाहाला निरंजनचित्ता । खेद अवस्था अंतरीं बहु ॥ ७१ ॥ ह्मणती मजसी न कळतां देवा । मार्गीं केली बहुत सेवा । योगीयाते न पडसी ठावा । तुज म्यां निर्दैवा कष्टविले ॥ ७२ ॥ ऐशाप्रकारें करुणा भाकून । निरंजन करिता प्रेमें रुदन । येकायेकीं अवधूत पूर्ण । प्रगटला जाण देवाळई ॥ ७३ ॥ श्रीस्वामीते पाच्यारून । बोलता जाहाला हास्यवदन । ह्मणले धरिले कां अज्ञान । असतां सर्वज्ञ निरंजन तूं ॥ ७४ ॥ श्रीधुंडिराज सर्वाभूतीं । ऐसे बोले वेदश्रृति । दुजा पदार्थ आणीक जगती । न दिसे निश्चितीं चराचरी ॥ ७५ ॥ ऐसे असतां परमहंस । तोची मानिला श्रीगणेश । ईतर स्वरूपें कोण आसे । हे तो मनास आपुले आणीं ॥ ७६ ॥ ऐसें सांगूनी निरंजनाते । अदृश्य जाहाले अवधूत । निरंजनस्वामी समजुनी चित्तें । संशयातीत पै जाहाले ॥ ७७ ॥ असो ध्यान करितां सगुणाचें । प्रत्यक्ष पुढें उभें साचें । वेडे चि केलें दैवत सर्वाचें । निरंजनाचे प्रेमें पै ॥ ७८ ॥ तीर्थावळीं सांग करुनी । घरासी आले स्वात्मदानी । आनंदली जनक जननी । कोण वर्णी तया सुखा ॥ ७९ ॥ विद्वज्जनासी उल्हास थोर । दर्शना पातले नारीनर । कीर्ति भूगोळ दाटला गजर । श्रीगुरुवर धन्य ते ॥८०॥ कोणे येके दिनीं सहजस्थिती । निरंजन स्वामींचे आठवले चित्तीं । भेटिसी जावें सत्वरगती । श्रीमारुतिरामदासाचे ॥ ८१ ॥ जयाचे प्रसादेकरून । भेट दिधली गण्याननें । जन्मांतरींचें होउनी ज्ञान । लाधलों पूर्ण निज आत्मता ॥ ८२ ॥ ऐसें जाणुनी निरंजनानीं । चाफ-

ळासी गेले आनंदेंकरूनी । रामदासस्वामि पाहाता नैनीं । दाटले मनीं अष्टभाव ॥ ८३ ॥ ते सुख बोलतां वाचे । उन्मन होतसे ज्या मनाचे । वेऊं जाता दृष्टांत टाचे । अनिर्वाच्य जे का प्रीती ॥ ८४ ॥ रामदासस्वामीनीं निरंजनासी । आलिंगन दिधलें अतिप्रेमेसीं । जैसी जननी बाळकासी । प्रीति तैसी उचंबळली ॥ ८५ ॥ आभेद रूप स्नेहेंकरून । बैसविले जवळी जाण । विच्यारिलें वर्तमान । जाहालें कारण सकळीक ॥ ८६ ॥ निरंजनानी इत्थंभूत । निवेदिलें जाहाले वृत्त । उभयतांचा संवाद होत । कल्याण तेथें जवळ पै ॥ ८७ ॥ अनुभव जाऊा निरंजनासी । पूर्ण कळलें रामदासासी । संतोषले बहु मानसीं । सांगता खुणेसी निज्यात्मता ॥ ८८ ॥ मग आल्यादरें निरंजन स्वामीस । ठेऊन घेतले कांहीं दिवस । कल्याणापरि घटिका निमिष्य । रात्रंदिवस न विसंबती ॥ ८९ ॥ निरंजनानीं कीर्तनयज्ञ । बहुत सुंदर केला जाण । रामदासासी आनंद पूर्ण । देहभान गेलें पै ॥ ९० ॥ प्रत्यक्ष गणपति कर्थेत उभा । देखती जाली सकळ सभा । तये वेळेची अति शोभा । फाकली प्रभा या जन्मीं ॥ ९१ ॥ परि ते स्मृति गुरुकृपेची । कल्याणपदवी मुळींची साची । भक्तमंजरीमालिकेची । श्रीरामाची आवडी बहु ॥ ९२ ॥ यालागी प्राचीन कांहीं कथन । यथामति स्फुरतसे जाण । श्रोतिये देउनी अवधान । करा श्रवण परम प्रीती ॥ ९३ ॥ रामदासस्वामि जगद्गुरु । गाणपत्य मालिके निरंजन मेरु । सहजी कर्थेत साक्षात्कारु । तो विच्यारु अगाध पै ॥ ९४ ॥ असो निरंजनस्वामिनी तेवेळे । दहा श्लोक केले प्रांजळ । कल्याण बहु सुखावले । ऐकता भलें गुरुस्तवन ॥ ९५ ॥ रामदासस्वामीजवळी । आली होती संतमंडळी । काव्यरचना पाहुनी भली । स्तुति केली सर्वत्रे ॥ ९६ ॥ ते ते संत कोण कोण । नामें ऐकता तयांचीं जाण । श्रीकृष्णउपासक जयराम पूर्ण । रंगनाथ धन्य आणि आल्या ॥ ९७ ॥ केशवस्वामी ब्रह्मनिष्ट । आत्मवेत्ते शिवरामभट । मल्हारगोसावी महान् श्रेष्ट । नाडोलि स्पष्ट स्वस्थान ज्या ॥ ९८ ॥ आनंदमूर्ति गुरुउपासक । ऐसे मिळाले संत

अनेक । निरंजनस्वामी पूर्ण उभारक । पाहुनी सुख काव्य तया ॥ ९९ ॥ मग कल्याणाचे संगे करून । रामदासस्वामींची सकळस्थान । बैसावयाचीं पाहिलीं जाण । निरंजनानें पर्वतांतील ॥ १०० ॥ पुढील कथेचा चमत्कार । वदविती स्वामी श्रीगुरुवर । जो कां उभा विटेवर । रुक्मिणीवर समचरणीं ॥ १ ॥ रामत्रयामाजी मधील । पूर्णब्रह्म भक्तवत्सळ । यालागी जघन करे स्पर्शिले । सुचविले आपण श्रीराम ह्मणोनी ॥ २ ॥ उपासका खूण दाऊन । विठ्ठल नांवाचे केलें धारण । परी प्रत्यक्ष ज्यानकीरमण । दिसतसे पूर्ण आह्मांलागी ॥ ३ ॥ भक्त हें चि तुळसीदळ । आवडती बहु संत प्रेमळ । यालागी आवडी करणें माळ । स्वकरें प्रांजळ ग्रंथरूपिणी ॥ ४ ॥ रामदास अवतार श्रीसिद्धेश । सामर्थ्य पाहाता ज्याचें विशेष । उद्धरोनी कृपालेशें । निज अभिष्टास मेळविलें ॥ ५ ॥ स्वतासिद्ध हृदईं वसोन । संतवराचे वदविती गुण । राजारामीं देह्यभान । अर्पियेलें जाण निजपदीं ॥ ६ ॥ जागृतीं स्वप्नीं तो चि ध्यास । व्यापुनी गेलें सदा मानस । श्रोता वक्ता पंढरीनिवास । ज्यानकीविलास श्रीरघुपति ॥७॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । निरंजन स्वामी चरित्राते । अध्याय समाप्त दुसरा हा ॥ १०८ ॥ अनुक्रमें अध्याय छत्तिसावा ॥ ३६ ॥ ॥ २ ॥ श्रीगुरुदत्तादिगंबरार्पणमस्तु ॥



## अध्याय ३७ वा

### —निरंजन स्वामी—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजी अनादिसिद्धा । परात्परा स्वसंवेद्या । श्रीगणेशा सकल आद्या । मंगलप्रदा जगद्गुरु ॥ १ ॥ तुझी कृपा होय जया । ब्रह्मसाम्राज्य प्राप्त तया । अक्षै सुख देऊनिया । नांदवी ठाया स्वात्मभुवनीं ॥ २ ॥ तेथें माहात्म वर्णूं काई । वृत्ति तन्मय होतसे पाईं । देहींच असतां विदेही । दाविले हृदईं आत्मत्व

॥ ३ ॥ आतां मागणें हें चि येक । भावना उरो सेव्य सेवक । भक्ति-परते नाहीं सुख । भवनाशक गुरुमाये ॥ ४ ॥ आपलेपणा देशील जरी । शिष्यत्वपदवी राहील दुरी । दिगवेळ प्रेम अंतरीं । म्हणुनी करी हें चि पै ॥ ५ ॥ वारंवार जन्म घेउनी । आयुष्य सारीन संतस्तवनीं । नीच दास्यत्व करुनी चरणीं । नाम वाणी वदेन मी ॥ ६ ॥ हा चि संकल्प जन्मांतरींचा । सिद्धीसी लावणें मुळिंचा साचा । तेथें भाव विज्ञप्तिचा । आहे ठाईंचा विदित पै ॥ ७ ॥ प्रार्थना ऐकुनी वरदपाणि । हसिन्नले गद्गदावाणी । सिध चि दिले असतां वचनीं । भरलें मनीं प्रेम तुझें ॥ ८ ॥ तरी भक्तमाळिके गुंफूनि सुमनें । भावें पुजावा रघुनंदन । आज्ञापिता दयाघनें । जाहालें स्फुरण सहजी तें ॥ ९ ॥ तेणें आनंद सहजीं पोटीं । हर्षें कोंदली सकळ सृष्टी । संतस्तवनीं पडिली मिठी । नीरंजन गोष्टी वदतसे ॥ १० ॥ अवधान देतां येकाग्रवृत्ती । पाया लागे सायोज्यमुक्ति । सकळ सुखें वोळगतीं । वरी भक्ति सहजी त्या ॥ ११ ॥ सिंव्हावलोकन मागील कथा । चाफळासी गेले निरंजन तत्वता । रामदासस्वामीची भेट होतां । सुख चित्ता जाहालें पै ॥ १२ ॥ येकवीस दिवस करुनी वास । तोषविले कीर्तनीं श्रीरामदास । निरोप घेउनि मग घरास । कराडास आले ते ॥ १३ ॥ कांहीं दिवस राहती सदनीं । समाधिस्त जाहली जनकजननी । उत्तरविधान सारुनी । गेले निघोनीं कासीसी ॥ १४ ॥ तो चमत्कार अत्यद्भुत । जयासंगे श्रीगणपति सतत । मार्गी चालता गजर होत । भजन अद्भुत अनोपम्य ॥ १५ ॥ समागमें शिष्यमंडळी । बहुत मिळाली प्रेमळ भली । सायंकाळीं कीर्तन धुमाळी । श्रीवनमाळी प्रगटती ॥ १६ ॥ बाळविधवा जिउबाई । जिचा भाव नीरंजनपाईं । अति वृद्धाप्य असतां पाही । निघाली ते हि गुरुसंगे ॥ १७ ॥ प्रत्यक्ष भेटी श्रीगणपतीची । जियेलागीं असे साची । आत्मस्थिती मग तयेची । कोण सतीची वर्णी ते ॥ १८ ॥ ऐसा समर्थ नीरंजन गुरु । भृशुंडीचा जो अवतारु । सांप्रदाई साक्षात्कारु । अद्यापि विच्यारु सर्वांते ॥ १९ ॥ असो ऐसीं शिष्यवृंदें । नीरंजनस्वामी जगप्रसिद्ध । उद्धरोनी जीव

नानाविध । केले सिद्ध प्राणी ते ॥ २० ॥ क्षेत्रस्थांसी आनंद जाला । शिष्टजनानीं सत्कार केला । प्रीति जडली पदकमळाला । लागले मार्गाला नरनारी ॥ २१ ॥ विरक्त होउनी बहुतेकीं । उपदेश घेउनी जाहाले सुखी । उच्चार करिती सदा मुखीं । स्थितीनिकी लाधली त्या ॥ २२ ॥ उपासने ते वाढउनी । श्रीगणेशमूर्तीचें स्थापन करुनी । निघाले समर्थ काशीतुनी । मोक्षदानी नीरंजन ॥ २३ ॥ स्वानंदपुरी श्रीमयुरेश्वर । तेथें येउनी जान्हवीनीर । अर्पण करुनी विघ्नहर । यथोक्ताच्यारे पूजीयेला ॥ २४ ॥ नंतर निघोन स्वगृहासी । परतले माघारे कराडासी । आनंद जाहाला सकळ द्विजासी । आले भेटीसी सामोरे ॥ २५ ॥ समारंभें भजन करीत । आणिते जाहाले क्षेत्रस्थ । ठाई ठाई वंदन होत । नीरंजन येत मंदिरासी ॥ २६ ॥ देवगृहांत प्रथमता । साष्टांग नमोनी श्रीगणनाथा । आसनावरी मग तत्वता । बैसले पाहातां जगद्गुरु ॥ २७ ॥ वर्तमान कळता संतासी । येते जाहाले भेटीसी । मांदेसोहळा निश्चयेसी । तयेवेळेसी घडला तो ॥ २८ ॥ पुढें कांहीं काळें करून । बहुळेश्वरासी गेले नीरंजन । मल्हारगोसावी तेथें पूर्ण । आले जाण ते दिवसीं ॥ २९ ॥ मग सहजीं कीर्तन कराया । हर्ष जाहाला नीरंजनहृदया । काव्यरचना त्याचि समया । करुनी देवालया कथा केली ॥ ३० ॥ ते वग्तुत्व सांगता वाचे । जीवा शीवपद प्राप्त नेमाचे । धन्य भाग्य तें श्रोतियांचें । त्या सभेचें पुण्य अधिक ॥ ३१ ॥ असो नाडोलीकर मल्हारस्वामींनीं । नीरंजनासी सुचविलें ते चि क्षणीं । धन्यधन्य तुमची वाणी । परी सांगणी येक तुह्मा ॥ ३२ ॥ छंदलक्षण जाणुनी । नूतन काव्य करणें जनीं । इतुकी च माझी विनवणी । सलगी करुनी सांगतों ॥ ३३ ॥ ऐकुनी ऐसें भाषण । साष्टांग करुनी तयासी नमन । सोडुनी कविता नीरंजन । करीत भजन बैसले ॥ ३४ ॥ दीर्घाचळपर्वतीं जाउनी । धारण केली हातीं स्मरणी । येकाग्रस्थान पाहुनी । चिंतिती मनीं श्रीगणपति ॥ ३५ ॥ परी चैन न पडे श्रीदेवा । भक्तवत्सळ करुणार्णवा । ह्मणे माझे प्राप्तीसी

सदैवा । प्रेमळभावा अधिक जो ॥ ३६ ॥ तेथें च्यातुर्य कदा न सरे । वित्पत्तीचा वृथा चि भार । वाद घालिती बहु प्रकार । ह्मणती थोर विद्वज्जन ॥ ३७ ॥ हटयोगी कोणी वर्तती । नाना प्रकारें शरीरा दंडिती । वाग्शून्य होउनी राहाती । हस्त करिती वरते पै ॥ ३८ ॥ कोणी गौमुखी व्रत आचरून । पत्रावळी भक्षिती जाण । कितेक घेती टांगोन । मांत्रिक विधान कितेक ॥ ३९ ॥ पशु हिंसा करूनि किती । स्वर्ग सुखा पै ईछिती । आशा बुद्धि होउनी फिरती । कीर्तन करिती कामुक ॥ ४० ॥ असो ऐसे अनेक प्राणी । काळचक्रीं पडले भुलोनी । तयाते मी हृदय भुवनीं । कदा असोनी न पडे ॥ ४१ ॥ येक भाव नसता चित्तीं । तया न भेटे मी श्रीपति । ऐसी वाक्य बहुता ग्रंथीं । श्रृतिस्मृति आदिकरूनि ॥ ४२ ॥ परी दुर्धर ज्ञानाभिमान । जीवा न कळे स्वहीत जाण । असो नीरंजन स्वामी भाविक पूर्ण । साह्य गज्यानन जयासी ॥ ४३ ॥ स्वरूप घेऊन मल्हारबावाचें पुस्तक दिधलें छंदलक्षणाचे । दीर्घाचळासी येउनी साच । सांगती वाचे नीरंजना ॥ ४४ ॥ आजिपासुनी कवन करणें । ऐसें बोले दयाधन । उदईक नाडोळिसी येऊन । लाभ देणें पंक्तीचा ॥ ४५ ॥ मल्हारबावाचें रूपेकरून । आज्ञापिलें स्वमुखें पूर्ण । पर्वताखाले उतरोन । श्रीगज्यानन अदृश्य जाले ॥ ४६ ॥ नीरंजनस्वामी दुसरे दिवसीं । भोजनासी गेले नाडोळीसी । तंव बैसले जेवावयासी । ह्मणती वाचेसी गोविंद ॥ ४७ ॥ अवलोकोनी नीरंजनाते । ह्मणती कोणीकडे आला अकस्मात । ऐसें वदतां चि श्रीस्वामीतें । समूळ वृत्तांत सांगितला ॥ ४८ ॥ मग पश्चात्ताप होउनी मल्हारबावासी । अनन्यभावें लागले चरणासी । खेद जाहाला नीरंजनासी । गजमुखासी स्मरती मनीं ॥ ४९ ॥ तये काळीं भाळचंद्र । भक्तवत्सळ दयासमुद्र । निजदासाचे कराया भद्र । तेथें गणेंद्र प्रगटला ॥ ५० ॥ चतुर्भुज लंबोदर । कासे कासिला पीतांबर । माथा शोभे दुर्वांकुर । ध्यान साजिरें अनोपम्य ॥ ५१ ॥

गणेशाचें ध्यान पाहाता । संतोष जाहाला सहजी चित्ता । श्लोक केला तेथें चि तत्वता । गणनाथा स्तवनपर ॥५२॥ घरासी येऊनी त्यानंतर । टीका केली गणेशगीतेवर । ऐकतां ते नारीनर । पुनीत साचार होती ते ॥ ५३ ॥ नीरंजनदेवाचा भाव पाहुनी । मल्हारस्वामी दचकले मनीं । म्हणती प्रत्यक्ष अवतार मेदिनी । जाहाला जनीं भृशुंडिचा ॥ ५४ ॥ तईपासुनी मल्हारबावानी । नेम केला अंतःकरणी । प्रथमूळ आदिकरूनी । धान्य आणुनी अर्पावे ॥५५॥नंतर स्वमठांत आणावें । सेवन सर्वत्रीं करावें । ऐसा निश्चय करुनी भावें । धान्य सर्व पाठविती ॥ ५६ ॥ नीरंजन स्वामींनीं आपुलें घर । लुटवावें समग्र द्विजकरें । संग्रहाचा कदा विचार । नसे साचार लोभ वृत्ति ॥ ५७ ॥ प्रतिसंवत्सर प्रकार हा चि । सीमा जाहाली निस्पृहतेची । कोणीं येके दिनीं माध्यान्हिकाची । नैवेद्याची अडचण ते ॥ ५८ ॥ तयेकाळीं श्रीगणपतींनीं । वैश्याचें रूप धरुनी । तांदळाची आणुनी गोणी । अर्पियेली सदनीं नीरंजनाचे ॥ ५९ ॥ ऐसें माहाराज प्रेमळ भक्त । जया साह्य गौरीसुत । ऋद्धि-सिद्धि सहजी जेथें । जोडुनी हात उभ्या सदा ॥ ६० ॥ कोणी येके दिनीं नाडोळीस । निरंजन जातां प्रसादास । आनंद जाला फार मनास । घेतले स्वामीस ठेउनी ॥ ६१ ॥ उभयतांची अतिप्रिती । वियोग नाहीं दिवाराती । पूजाकाळीं विनोदार्थी । प्रश्नोक्ति आरंभिले ॥ ६२ ॥ म्हणती आमुचे मार्तंड मूर्तीस । उदक लागतें म्हणती नाभीस । सगळा चि बुडाला नर्मदागणेश । अभिषेकास कारिता पै ॥ ६३ ॥ ऐसें ऐकुनी नीरंजनानीं । अनन्य स्तविला फरशपाणि । नवल जाहालें ततक्षणीं । ऐकिजे कर्णीं ते श्रोते ॥ ६४ ॥ भक्तांकित श्रीगणाधीश । तात्काळ टाकिला कठीणांश । हळुवार होउनी निःशेष । तरंगला गणेश उदका-वरी ॥ ६५ ॥ मग तो चमत्कार काय सांगावा । सद्गद जाहाला मल्हारबावा । अभिमानाचा टाकोनी गोवा । धरिले तेधवा चरण स्वामीचे ॥ ६६ ॥ नीरंजन माहाराज गाणपत्य । अद्भुत पाहाता जयाचें कृत्य । वंदिती जया सकळ संत । आत्मवेत्ते माहानुभवी ॥ ६७ ॥

आल्यास्वामि श्रीरंगनाथ । गोसाविनंदनवामन पंडित । ब्रह्मनाळकर आनंद-मूर्ते । बहुसरूप इत्यादिका ॥ ६८ ॥ पाहुनी आधिकार निरंजनासि । नमन करिति आदरेसि । जोका भृशुंडिऋषि । भुमंडळासि गणेशभक्त ॥ ६९ ॥ आनंदमूर्तिचा सदा नेम । भार्ते करावा आदौ प्रणम्य । कदा-काळि न ढळे धर्म । बहुप्रेम भेटिकाळि ॥ ७० ॥ निरंजन स्वामिसि प्रथमता । नमस्कार करुं देणें नाही सर्वथा । निरंतर प्रकार ह्याचे पाहाता । भाव तत्वता आनंदमूर्तिचा ॥ ७१ ॥ सेखि समाधिस्त जाल्या-वरि । निरंजन गेले ब्रम्हनाळक्षेत्राभितरि । आणिले सहजी पूर्ण अंतरिं । नमस्कारि प्रथम म्हणुनि ॥ ७२ ॥ ऐसा चित्तांत संकल्प होता । आश्चिर्य जाहाले ऐकिजे श्रोता । निरंजन स्वामि जवळ जातां । वृंदावन तत्वता लोळले पाईं ॥ ७३ ॥ अत्यंत जडपाषाण । तेहि लवति कलींत जाण । ऐसे माहाराज समर्थ पूर्ण । लीला धन्य तयाचि ॥ ७४ ॥ निरंजनासि विस्मय जाहाला । प्रेमाश्रूचा लोट चालिला । कंठ दाटुनि ते वेळा । आले आंगाला अष्ट हि भाव ॥ ७५ ॥ मग दीनत्रय तेथें करूनि वास । कीर्तन केले त्याचि स्थळास । तो आनंद वर्णिता विशेष । डोल होतसे समाधिचा ॥ ७६ ॥ नंतर येउनि कराडासि । निरंजन गेले पैठणासि । हर्ष जाहाला सकळीकासि । दर्शनासि पातले ॥ ७७ ॥ निःशीम गाणपत्य पाहुनि । प्रश्न केला द्विजवरानि । नानाप्रकारे मत्ताभिमानि । तंडति जनिं कडोविकडि ॥ ७८ ॥ निरंजनस्वामि महासमर्थ । श्रुतिस्मृति ज्या अर्थ विदित । निवारण करूनि आशंकेत । गणपति दैवत सिद्ध केले ॥ ७९ ॥ संशय निरसितां विद्वज्जना । आनंद जाहाला सकळ मना । नर नारी लागुनि चरणा । उपासना घेतलि पै ॥ ८० ॥ सांप्रदाय देउनि प्रतिष्ठानिं । निघाले तेथुनि कैवल्यदानि । ठाईंठाईं मार्गी राहुनि । पंथ जनिं वाढविला ॥ ८१ ॥ जनासि लाउनि शुद्धमार्ग । घरासि आले ते भवभंग । पदे श्लोक करूनि अभंग । स्तवींत आंतरंग गणेश तो ॥ ८२ ॥ रात्रदिवस ध्यानिं मनिं । येक अवघा चिंतामणि । तयाधीण या त्रिभुवनिं । देव

मेदिनी नसे दुजा ॥ ८३ ॥ जेथें तेथें निरंजना देवे । वर्णियेला येक देव । येकात्मता जाणुनि भाव । वासुदेव सदा भजति ॥ ८४ ॥ ऐसि गेलि दिगांता किर्ति । ठाईं ठाईं स्तवन करिति । जेथें तेथें उचार करिती । जन वदति धन्य सर्व ॥ ८५ ॥ हे ऐकोनि वैष्णवानि । विच्यार केला आपुले मनि । म्हणति जाउनि तयाचे सदनिं । पाहुं नैनीं उपासना ॥ ८६ ॥ वाद करूनि निरंजनासि । स्थापन करूं आपले मतासी । ऐशा प्रकारे दूर देशि । आले गृहासि स्वामिच्या ॥ ८७ ॥ तव प्रातःकाळिं निरंजन समर्थ । पूजासनीं बैसले होते । विद्वज्जन जवळि समस्त । आले तेथे वैष्णव हे ॥ ८८ ॥ देवार्चन पाहाता श्रीस्वामिचे । येक दैवत गणेश साचे । पंच्यायतन तेथें कैचे । शाळिग्रामाचे पूजन नसे ॥ ८९ ॥ ऐसे देखुनी वैष्णवासि । राग आला फार मानसिं । आरंभ केला वाच्यांशासि । सांडुनि लक्षांसि येकात्मता ॥ ९० ॥ अनेक युक्ति शास्त्राधारें । वाद घालिती वैष्णववीर । निरंजनस्वामिनिं नमस्कार । प्रथम विच्यार केला तयासि ॥ ९१ ॥ नम्रवचनें गौरउनि । सेवटिं जोडिले दोनि पाणि । तरि नावडे त्याचे मनिं । मत्ताभिमानि ते सर्व ॥ ९२ ॥ वगत्रुत्वासि मग समर्थं । आरंभ केला श्रीगाणपत्यें । श्रुतिस्मृतिचा करुनी अर्थ । उपासनेते स्थापियले ॥ ९३ ॥ प्रणवरूप श्री गणपति । सर्वाधार तो चि जगतिं । आधार-चाक्रि योगि ध्याति । प्रतम पूजिति प्राणि तया ॥ ९४ ॥ ऐशा प्रकारें बहुतापरि । वैष्णव बोधिले त्या अवसरिं । तरि तो संशय ज्या अंतरिं । न बोलति वैखरि निर्धार ॥ ९५ ॥ ह्मणती तीर्थ गणपतिचे । शाळि-ग्रामाविण घेता साचे । प्रायश्चित्त तुज नेमाचे । देऊं विधीचे आज्ञेवरूनि ॥ ९६ ॥ निष्ठुरवाक्य ऐसें वदून । शाळिग्राम दिधला कराया पूजन । निरंजनस्वामि समर्थ पूर्ण । द्वैत जाण नसे तयासि ॥९७॥आग्रहाचा नाहीं लेश । संत स्वरूप ते निर्दोष । भावना करूनि श्रीगणेश । अर्चनासि आरंभिले ॥९८॥ आभिषेक होता ते चि वेळीं । शाळिग्रामासि शुंडा फुटली । धन्य धन्य गुरुमाउलि । भूमंडळी गाणपत्य

॥९९॥ श्रीकरहाटकक्षेत्रिचे विद्वज्जन । टाळी पिटाळि तयानि जाण । वैष्णव जाहाले लज्जायमान । करिति नमन साष्टांगें ॥१००॥ अनन्यभावें करुणा भाकिति । म्लानवदनें खालीं पाहाती । शापूं नये ऐसे वदती । चरण धरिति स्वामिचे ॥ १ ॥ निरंजन ह्रदई क्षमासिद्ध । येईल कोठोनि तेथें क्रोध । द्वैताद्वैत जाउनि शुध्द । निमग्न प्रसिद्ध यकात्मते ॥ २ ॥ शाळग्रामासि त्या नामाभिधान । विष्णुविनायक ठेविले जाणा । निरंजन गाणपत्य करिति पूजन । अद्यापि जन पाहाती ते ॥ ३ ॥ पुढील कथन आत्याद्भुत । निरंजनस्वामिसी रुक्मिणीकांत । पंढरीसी जाता यात्रेते । भेटले सत्य गणेशरूपें ॥ ४ ॥ ते कथा परम पावन । वर्णिविति श्रीगुरु आपण । श्रोति करूनी येकाग्र मन । सावधान परियेसा ॥ ५ ॥ सिद्ध चि उभा विटेवरी । पंढरीनिवास जो श्रीहरी । ध्यावया पूजा संतमंजरि । रावणारि तिष्ठतसे ॥ ६ ॥ सिद्धस्वामी राजारामि । व्यापुनी ठेला अंतर्यामिं । देहभान दवडुनि उर्मि । निरंजन प्रेमि वदावितसे ॥ ५ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । तृतीयाध्याय जाहाला समाप्त । निरंजनकथेलागी पै ॥ १०८ ॥ ॥ अध्याय तिसरा समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय सदतिसावा ॥ ३७ ॥



## अध्याय ३८ वा

## —निरंजन स्वामी—

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरुसिद्धकपिला । गणाध्यक्षा सर्वत्र आखिला । मुळारंभा इंदुभाला । नमन पदाला अनन्युक्त ॥ १ ॥ विनायेकाविण कांहीं । दुसरादेव कोठें चि नाहीं । जेथें तेथें सर्वा ठांई । आत्मत्व पाहि सकळीक ॥ २ ॥ भक्तांकित होउनि स्वयें । पंढरिसि उभा तो अद्वय । समसाम्य दाविळि सोय । म्हणुनि समपाय विटेवरि ॥ ३ ॥ ऐसा स्वामि सिद्धनाथ । तो म्या

नमिला अनन्युक्त । जयाचे कृपें स्फूर्तिते । प्रकाश होत तात्काळ ॥ ४ ॥ पुण्यपावन निरंजन कथा । ऐकतां हरे समूळव्यथा । चतुर्थो-ध्याय आरंभिला आतां । चतुर्वेदार्था स्वरूप जे ॥ ५ ॥ चतुर्थाचे जें दैवत । चतुर्दळामाजी विलसत । ते चि उपास्य आसे जयातें । चरि-त्राते ऐका ते ॥ ६ ॥ पूर्वी जाहाला इतिहास । वैष्णव आले निरंजन-गृहास । प्रवर्तले आग्रहास । दीधला पूजेस शालिग्राम ॥ ७ ॥ श्री-स्वामिनि पूजन करिता । शुंडा फुटली तयासि तत्वता । विष्णुविनायक आद्यापि पाहाता । प्रत्यक्षता मठि आहे ॥ ८ ॥ ऐसे माहाराज गाण-पत्य । भृशुंडि आवतार जो निश्चित । दावावया भक्तिपंथ । जन्म घेत पुन्हः पुनः ॥ ९ ॥ आसो पुढील कथा निरंजनस्वामि । गेले मध्वमुने-श्वराचे आश्रमीं । परस्परें अंतर्यामि । हृदयप्रेमी उचंबळले ॥ १० ॥ मग तो संवाद उभयताचा । ग्रंथीं न करवें लेखन साचा । जेथ भाग उपनिषधाचा । अनिर्वाच्या वदती ते ॥ ११ ॥ मग कांहीं दिवस राहाता तेथें । मध्वमुनेश्वरानि सुचविले स्वामिते । म्हसोबा नामें ग्रामदैवत । मुख्य येथें आसे पै ॥ १२ ॥ हिंसा करिति तयापुढें । पशु मारिति जन मूढ । बहुत दिवस पडली रूढ । जेणें मोडे ऐसे करा ॥ १३ ॥ तरी आपण गाणपत्य । प्रगट करोनि उपासनेते । जनासीं दाउनि शुद्ध पंथ । भवनदीते उतरावे ॥ १४ ॥ ऐसें सांगता निरंजनासि । हर्ष जाहाला बहु मानसी । तात्काळ आणवोनि ग्रामस्तासी । बोधिले तयासी युक्तिनें ॥ १५ ॥ म्हसोबा जे तेथील दैवत । आपण जाऊनी त्या देवालयाते । ध्याने सिद्ध केले त्वरित । गाणपत्य धन्य ते ॥ १६ ॥ स्वहस्तें स्वामिनि पूजा करिता । प्रगट जाहाली सहजी देवता । दृष्टांत होउनि ग्रामस्ता । हिंसा सर्वथा राहिले ते ॥ १७ ॥ मग मध्वमुनेश्वराचा निरोप घेउन । घरासि आले निरंजन । गणपतिचे करूनि चिंतन । रात्रंदिन भजन करिति ॥ १८ ॥ तव दर्शनासि संतवृंदे । येते जाहाले सकळ प्रसिद्ध । अंतःकरण होईजे शुद्ध । ऐकता सिद्धनामावळि ॥ १९ ॥ वामन स्वामि माहान संत । पंडित आणि भगवद्भक्त । उद्बोधस्वामि केशरी नाथ ।

चिद्धन समर्थ कोकिलप्रभु ॥२०॥ गोसाविनंदन माहानुभाव। वैष्णवशुद्ध दयार्णव। श्रीकरहाटकक्षेत्रासन्निध गाव। कोपर्डे सर्वत्र म्हणति तया ॥२१॥ माहाभागवत जे प्रसिद्ध। त्यातिल जो का दशमस्कंद। करूनि टीका तयावरि सिद्ध। अर्थ विवद केला तो ॥ २२ ॥ ते कृष्णदयार्णव आणि निरंजन। उभयतां प्रिति अत्यंत जाण। तैसे चि गोसाविनंदन। गाणपत्या महानु भुमंडाळि पै ॥ २३ ॥ तेणें दाहा श्लोककरूनि। अर्पियेले निरंजनचरणीं। मेखळा उद्बोधनाथानि। आंगीचि काढुनि दिधली पै ॥ २४ ॥ केशरीनार्थे अभंग करून। स्तवन केले स्वामीचे जाण। कटिबंध केला उद्धवचिद्घनें। निरंजन याच द्वअक्षरांतरि ॥ २५ ॥ येका श्लोकांत वामनानि। गौरविले प्रेमेकरूनि। नमन करूनि कोकिलप्रभुनी। आरति चरणिं केलि पै ॥ २६ ॥ ते ते काव्य सहजस्थिति। लेखन केले असे ग्रंथीं। श्रवण करा अतिप्रिति। मनन श्रोति करणे ते ॥ २७ ॥ निरंजनस्वामिचि विख्यातकीर्ति। भरूनि गेलि तेणे जगति। प्रयागाहुनि येक निगुति। कराडाप्रति परमहंस आला ॥ २८ ॥ विच्यारसिल असता तया। संशय उरला असे हृदया। हिंडता जाला बहुता ठाया। द्वैतमाया न निघे चि ॥ २९ ॥ निरंजनस्वामिचा संग होता। उद्धरिला जो सहजी तत्वता। काय वर्णू श्रीगाणपत्या। जया स्मरता आनंद ॥ ३० ॥ भूतदयेचे तरि धाम। शांतिक्षमा ज्या आंगी निःशीम आचरणविधी सांगता प्रेम। आत्माराम सर्वत्र तो ॥३१॥कृषिवळ शूद्र पशुते मारिता। काकुलति यावे तयासि तत्वता। उपवासिप्राणि कोणी पाहाता। न पडे चित्ता चैन पै ॥३२॥ माज्यार आदिकरूनि। अन्न द्यावे तयालागुनि। गांजीले अनाथ देखुनि। करुणा मनिं येतसे त्या ॥ ३३ ॥ कोणे येके दिनिं प्रीति-संगमि। संध्येसि बैसले निरंजनस्वामि। विद्वज्जन जवाळे असति नेमि। वर्तले भूमि विचित्र ते ॥ ३४ ॥ मातंगाचि भार्या जाणा। भरावया आली समीप जीवना। गर्भवति ते नव्वामहिना। चैत्र जाणा मास तो ॥ ३५ ॥ बाळवंट होते तापले। पाठिमागुनि आलें तयेचे मूळ।

भाजति तयांचि पाउलें । रडता ऐकिले स्वामिनि ॥ ३६ ॥ तात्काळ घेउनि त्या कडेवरि । गेले मांगवाड्या भीतरि । अर्भक पोहोचउनि त्या आवसरि । स्नान निर्धारि केले मागुते ॥ ३७ ॥ हासति पाहुनि सकळ लोक । प्रायश्चित देति विप्र देख । ऐसि दया आलौलिक । पाहिले कौतुक सर्वांनि ॥ ३८ ॥ श्रीमयुरेश्वरासि जाता मार्गांनि । तस्कर भेटले बारामतिचे रानि । सिध्धासाहित्य सकळ हारोनि । देखीले स्वामिनि पळति त्या ॥ ३९ ॥ घृतपात्र होते जवळी राहिले । हाति घेउनि ते धाविले । ह्मणति तुह्मासाटि तूप आणिले । कोरडे खाल ह्मणउन पै ॥ ४० ॥ दुजि गोष्टि आणिक ऐका । चोर आले घरासि देखा । तयासि ह्मणति न्याहावा पैका । काहीं एक पैका ठेऊं नये ॥ ४१ ॥ सेवटि सोडिल्या गाई ह्मैसि । तीन प्रहर जाहालि निशि । आपण लागले पाठिसि । वत्से तयासि द्यावया ॥ ४२ ॥ सावकाश चला ऐसे वदति । धन्य कृपाळु निरंजनमूर्ति । तस्कर तेंव्हां पायासि लागति । पावले गति तात्काळ ॥ ४३ ॥ ऐशा पाहातां अनेक लीला । मति न पुरे ल्याहावयाला । भृशुंडि च पुन्हा अवतरला । तारावयाला कलिमाजि ॥ ४४ ॥ आणीक गोष्टी चमत्कार । ऐका तुम्ही श्रोते सारे । अमानित्वादिलक्षण विच्यार । वैराग्य थोर कैसे ते ॥ ४५ ॥ प्रतीनिधिचे भेटिसि । गृहस्त चालिला विशाळगडासि । शार्गीर्द न मिळे कोणी त्यासी । कऱ्हाडासी आला तो ॥ ४ ॥ तव प्रीतिसंगमि स्नान करीत । बैसले आहेत निरंजन-समर्थ । विच्यारिले तेणें गृहस्त । पाहिजे आपणाते ब्राह्मण ह्मणुनि ॥ ४७ ॥ तये काळि श्रीस्वामिनि । विच्यार केला आपुले मनि । ह्मणति ब्राह्मणाचे सेवेहुनि । आणीक त्रिभुवनि सार नसे ॥ ४८ ॥ तशात अडचणलेला गृहस्त । दुसरा कोण मिळेल याते । चित्ति स्मरोनि श्रीगणनाथ । काय बोलत तयासि ॥ ४९ ॥ मी च आहे ब्राह्मणजन । इछित बैसलो यजमान । पोटासि देता यथेष्ट अन्न । दास्य करीन आपुले पै ॥ ५० ॥ द्रव्यादिक मजला कांहिं । आणिक वांछा दुजि नाहीं ।

पावशेर अन्न देतां पाहि । तृप्ति देही तेणें चि ॥ ५१ ॥ ऐकूनि ऐसे त्या ब्राह्मणा । हर्ष जाहाला बहूत मना । चल रे ह्मणति निरंजना । अन्नवसना देऊं तुज ॥ ५२ ॥ तात्काळ घेउनि त्याचे गवाळे । स्वामी गाणपत्य संगे चालिले । मार्गि चालता इंदुभाले । स्मरति निर्मळ वाचेसी ॥ ५३ ॥ मग शागीर्दापरी सकळ कार्य । करिते जाहाले श्रीगुरुराये । आदिकरूनि चुरावे पाय । इतर काय सांगणें ते ॥ ५४ ॥ ऐशा प्रकारे शेवा करीत । विशाळगडाजवळि गेले गुरुनाथ । विप्र म्हणे तो जाणें वरुते । आम्हासि निश्चित किल्ल्यावरि ॥ ५५ ॥ तेथें निरंजनस्वामिचा शिष्य । प्रतिनिधी मुख्य तो चि असे । वर्तमान कळतां हें तयास । गृहस्तास क्षोभेल पै ॥ ५६ ॥ यालागी तया विप्रा म्हणती । किल्यावरी नका नेऊं मजप्रति । विपरीत कार्य माझे हातीं । घडले निश्चिति आहे पै ॥ ५७ ॥ जरी ते वोळखितिल मजला । अंतर पडेल तरि शेवेला । सोडविणार कोण भला । शागीर्द तुम्हाला कैचा मग ॥ ५८ ॥ ऐसे सांगता त्या गृहस्ता । निषेध केला तेणें सर्वथा । म्हणे ब्राह्मणजनाविण जाता । दिसेल गौणता सर्वस्वे ॥ ५९ ॥ यालागी समागमें चालावे । उगेच शेवेंत रत असावे । उपद्रव करितिल जे स्वभावें । निवारण सर्व करूं ते ॥ ६० ॥ ऐशापरि आग्रह करून । निरंजनस्वामिसि तो ब्राह्मण । घेऊनि गेला वरुता जाण । जाहाले कारण ऐका ते ॥ ६१ ॥ स्वामिचा शिष्य जो प्रतिनिधि । तयासि कळले तोचि संधि । दर्शन होताचि त्रिशुद्धि । आश्चिर्य बुद्धि करिति ते ॥ ६२ ॥ येकायेकि ऐसा वेश । दृष्टि पडतां सतशिष्यास । अश्रु दाटले नेत्रास । उटले अंगास रोमांच पै ॥ ६३ ॥ म्हणति माझ्या स्वामिलागी । शागीर्द केले कोणी जगी । पारपत्यासि तो विभागी । जाहाला अभागी उन्मत्त जो ॥ ६४ ॥ ऐसे वदतां चि त्या प्रभुनि । दूध तापले ते चि क्षणिं । अप्रतिष्टा योजिलि जनि । श्रीमंत मनि क्रोधावले ॥ ६५ ॥ निरंजनस्वामिनि तये काळिं । आण आपुल्या गळ्याचि घातलि । इत्थंभूत सांगितलि । सकळ जाहाली पूर्वपीठिका ॥ ६६ ॥ निवारण केले त्याचे अपमाना । सत्कारे

आणविले कचेरीस जाणा । द्विज तो करूनि खालीं वदना । बैसला दीनासारिखा ॥ ६७ ॥ म्हणे मजला न कळतां ऐसे । कर्म घडले दुर्धर असे । आतां यासी उपाय नसे । प्रायश्चित्तास घेणे पै ॥ ६८ ॥ घळघळा नेत्रिं अश्रु वाहाति । अनुताप जाहाला बहुत चित्तीं । भूमिस पडला दंडाकृति । अनुताप चित्तिं जाहाला तया ॥ ६९ ॥ निरंजन-समर्थ गुरुमाउली । अंतःकर्णीं खिन्न जाहाली । म्हणति आजि शेवा राहिलि । प्रतिष्ठा भलि नावडे त्या ॥ ७० ॥ असो प्रतिनिधीनि तात्काळिक । अभ्यंग कराविले स्वामिसीं देख । उंचवस्त्रे अलौलिक । स्वानंदसुखें नेसविलि ॥ ७१ ॥ उत्तमासनि बैसउन । लेवविलि सकळ भूषणें । नानाप्रकारें केले अर्चन । नैवेद्य पूर्ण धूपदीप ॥७२॥ उत्छाह-विधी तो वर्णन करिता । वाढ होईल फार ग्रंथा । ब्राह्मणभोजन बहु तत्वता । घडले सर्वथा त्या समईं॥७३॥ निरंजनस्वामिचा विशाळगडास । येकवीस दिवस घडला वास । अनुग्रह देवउनि सर्वास । उतरले सर्वेश किल्यावरूनि ॥ ७४ ॥ मार्गि संग जयासि घडला । विप्र सहजी तो उद्धरिला । धन्य स्वामिनिरंजनलीला । तारि जनाला बहु युक्ति ॥ ७५ ॥ ठाईं ठाईं गणपति स्थापोनि । वाढविले भजन मेदिनि । उपदेशिले बहुत प्राणी । आपुला देउनि सांप्रदाय ॥ ७६ ॥ निरंजनस्वामिचे शिष्य-मंडळी । ऐका तयाचि नामावळि । भक्ति ज्ञानवैराग्य आगळी । केली होळि पातकाचि ॥ ७७ ॥ सदाशीवगडिचा चितोपंत । येक-निष्ट जो अनुग्रहीत । समंध त्याच्या स्त्रियेचा निश्चित । दूरि सत्य केले पै ॥ ७८ ॥ बाळाजीपंत दुसरा शिष्य । कथन तयाचें ऐका सुरस । श्रीगणपतिच्या दर्शनास । समुद्रातिरास गेले स्वामि ॥ ७९ ॥ तेथें भेटला तो ब्राह्मण । बल्लाळ ज्याचे नामाभिधान । वैराग्यशीळ पाहून । केला पावन निरं-जनें ॥ ८० ॥ कर्मीं निष्ठा अति देखुन । बोधियेले ते चि आचरण । साक्षात्कार पावला तेणें । आत्मभुवनि प्राप्त तया ॥८१॥ पूर्ण जाहाला अधिकारि । टीका केली गणेशपुराणावरि । ऐकता चि ते निर्धारि । दुराच्यारि तरति पै ॥ ८२ ॥ सिंव्हगडि द्विज तैसा चि । पाहाता

भक्ति धन्य तयाचि । निरंजनदर्शनें जयाचि । स्वरूपाचे प्राप्ति तया ॥ ८३ ॥ दशग्रंथी परमविद्वान । आसता टाकिला समूळ आभिमान । सद्गुरूसी रिघून शरण । लाधला पूर्ण निजात्मसुखा ॥ ८४ ॥ निरंजन स्वामिच्या सदासंगीं । राहुनि रंगला आत्मरंगीं । अग्नीरक्षण करूनि जगीं । गुरुदास्य अंगीं स्वीकारिले ॥ ८५ ॥ परोपकारि अति प्रीति । यज्ञोपवितें वाटावि द्विजाप्रति । स्वहस्तें करूनि निगुति । यथापद्धति शास्त्रोक्त ॥ ८६ ॥ श्रीस्वामिचा पुराणीक । फरशराम क्षेत्रिचा विप्र देख । आत्मवेत्ता पूर्ण भाविक । उपासक निशीम तो ॥ ८७ ॥ गोपाळ शिष्य तो माहासमर्थ । निरंजना अनुग्रहीत । तयाचे जे कथन किंचित । ऐका श्रोते ते सकळ ॥ ८८ ॥ श्रीरामेश्वराचे दर्शन घेऊन । ताम्रपर्णिस आले निरंजन । तेथें भेटला येक ब्राह्मण । भाविक पूर्ण वीतरागी ॥ ८९ ॥ गृहस्ताश्रमी तो आसता । मुले होउनि मरति तत्वता । आपुले घरासि तेणें नेहता । जोडिले हाता स्त्रीनें त्याचे ॥ ९० ॥ पतिव्रता ते साध्वी बोले । मरतवांझ नांव पाडिले । येवढें संकट पाहिजे निरसिले । दीनदयाळा गुरुमाये ॥ ९१ ॥ ऐसे ऐकुनि निरंजनस्वामिनि । आशीर्वाद दिधला ते चि क्षणी । ह्मणति आपत्ये तुझी आजीपासुनि । जगती मेदिनी चिरकाळ ॥ ९२ ॥ मग संतोषोनि ती विप्रभार्या । मस्तक ठेविलें सदृढ पाया । यथोक्त पूजा करूनिया । श्रीगुरुराया नवस केला ॥ ९३ ॥ प्रथमपुत्राते अर्पण करीन । उदक सोडिले ऐसें वदोन । पुढे सवे चि जाहाली गर्भीण । जाहाला उत्पन्न पुत्र तये ॥ ९४ ॥ गोपाळनाम तया कुमरास । अर्पण केला निरंजनस्वामिस । घेउनि तयानें उपदेश । राहिला सेवेस जवळ पै ॥ ९५ ॥ निःशीम जो कां गुरुभक्त । भजनिं रंगले सदा चित्त । न दिसे दृष्टि दुजे दैवत । अनन्युक्त श्रीगुरुपदिं ॥ ९६ ॥ तैसा चि रामजोशी आणि विष्णुदेव । भवानदास माहानुभाव । निरंजनपदिं ज्याचा भाव । करिति शेवे निरंतर ॥ ९७ ॥ शिष्यीणी आणी शिष्य । बहुत आसति समागमास । विरक्त विषईं उदास । नामें विशेष तयाचि ॥ ९८ ॥ ऐशा

प्रकारें श्रीगाणपत्य । निरंजनस्वामि माहासमर्थ । श्रीकरहाटकक्षेत्रीं वास करीत । भजनीं रत सर्वदा ॥ ९९ ॥ तव आषाढीचि यात्रा आलि । पंढरीस निघालि संतमंडळि । भजनकडाकाध्वनि चालिलि । गजरधुमाळी अनोपम्य ॥ १०० ॥ तंव निरंजनस्वामि गणेशतीर्थावरि । बैसले होते कृष्णातिरिं । उचंबळले प्रेम अंतरिं । नाहीं सरि दुजी तया ॥ १०१ ॥ शिष्यमंडळि धावति मागे । वीणामृदंगादि घेउनि संगे । भजन होतसे निःसंग । चालति मार्ग पंढरीचा ॥ २ ॥ ठाईं ठाईं उभे राहाति । करुणापर अभंग गाति । अटाहास्यें गर्जना करिति । श्रीगणपति या नामें ॥ ३ ॥ ऐशापरि आनंदेसी । निरंजन गेले श्रीक्षेत्रासि । प्रवेश केला राउळासि । दर्शनासी देवालया ॥ ४ ॥ गरुडपारि उभे राहून । अवलोकिले श्रीचें ध्यान । तो कटावरी कर ठेऊन । समचरण उभा हारि ॥ ५ ॥ निरंजनस्वामि गाणपत्य । भृशुंडी अवतार जो निश्चित । तयासि आवडे येकदंत । गणनाथ लंबोदर ॥ ६ ॥ उपास्य आपुले आठउनि । प्रेम दाटलें अंतःकर्णि । म्हणति देवा फरशपाणि । ऐसे नैनिं कां दिसता ॥ ७ ॥ घळघळा नेत्रीं अश्रु वाहाति । दीनवचनें करुणा भाकिति । श्रीरामदासस्वामिसारिखी स्तुती । आरंभीलि निश्चिति ते वेळा ॥ ८ ॥ मग भक्तांकित पंढरीनाथ । जैसा भाव तैसा होत । निर्विकार त्रिगुणरहित । सद्गुरुनाथ अविनाश जो ॥ ९ ॥ भक्तिसुखा लाचाउन । निर्गुण सांडुनि सगुण होणे । जे जे करिती जैसें ध्यान । ते ते धरणें रूप तया ॥ ११० ॥ युगायुगीं हा चि नेम । आवडि मुख्य येथें प्रेम । निरंजन गाणपत्य जाणुनि निःशीम । जाहाले राम तैसेचि ॥ ११ ॥ सरळी शुंडा श्रीगणेश । तात्काळ जाहाले रुक्मीणिविलास । चतुर्भुज फरश अंकुश । आयुधे विशेष ज्या आंगि ॥ १२ ॥ श्रुतिस्मृति पुराणोक्त । ध्यान साजिरे अत्याद्भुत । श्रीगणपति जाहाले पंढरिनाथ । भक्तांकित ते चि क्षणि ॥ १३ ॥ निरंजनस्वामिनि दैवत आपुले । प्रत्यक्षता वोळखिले । धावत जाउनि नमन केले । मस्तक ठेविले पायावरि ॥ १४ ॥ देवभक्ताचि भेटि होतां । संवाद जाहाला सहाजि तत्वता ।

श्रीहरि ह्मणति निरंजन गाणपत्या । छंद आतां न धारि तूं ॥ १५ ॥ आजिपासुनी येत जावे । भिन्नत्व कोठें न देखावें । विनायकावीण दुजा देव । नसे सर्व भुवनत्रईं ॥ १६ ॥ पंढरीसी त्वां मठ करूनी । राहावे चातुर्मास्य या स्थानीं । ऐसें बोले वरदपाणी । आत्मदानी श्रीविठल ॥ १७ ॥ तो मठ अद्यापि पंढरपुरीं । प्रत्यक्ष आहे भीमातीरीं । दर्शन घेती नरनारी । मुक्ति चारि घरीं त्यांचे ॥ १८ ॥ अति प्रेमळ द्वारकाबाई । निरंजन स्वामीची शिषिण पाही । राहाती जाली तये ठाई । उपमा नाहीं दुजी तये ॥ १९ ॥ असो ऐशा लीला अगणीत । वर्णूं जातां न लागे अंत । निरंजन महाराज गाणपत्य । सकळ संतांत अग्रगण्यु ॥ १२० ॥ मग पंढरीसी वारंवार । जाती सदा श्रीगुरुवर । वैष्णव मेळीं मान्यता थोर । करिती नमस्कार अदोष्या ॥ २१ ॥ पुढे निरंजनानीं काळे करून । अवतार संपवीला जाण । चमत्कार ऐका तो पूर्ण । येकाग्रमनें करूनी ॥ २२ ॥ निधन संताचें श्रवण करिता । वृद्धिंगत होय अयुष्य सर्वथा । ईछित पावे मनोरथा । सहजीं त्या पद शाश्वत ॥ २३ ॥ शेवटी निरंजनस्वामींनीं । मयुरेश्वरासी कुटुंबसहित जाउनी । स्वपुत्रासी आज्ञा करूनी । कीर्तन भजनीं निरोपिलें ॥ २४ ॥ गजवदनासी निरवोनी कुमरा । सांगितलें प्रयाण द्विजवरा । श्रींचा घेउनी निरोप निर्धारा । केले विच्यारा निजांतरीं ॥२५॥ भृशुंडी अवतार श्रीस्वामी । जन्मांतरीची अनुष्टानभूमी । जाणुनी गेले त्या नामल ग्रामीं । चिदूव्योमीं लीन व्हावया ॥ २६ ॥ तो इतिहास कार्य कारण । प्रथमाध्याई केलें लेखन । यालागी निरंजन । केलें प्रयाण ते ठाई ॥ २७ ॥ तेथें स्वामींनीं कांहीं दिवस । राहोनी बोधिले सकळजनास । ते तो सांगणें कासयास । समाधिविलास तो ऐका ॥ २८ ॥ अनादिसिद्ध गणपतीचें । नामलग्रामीं स्थान त्याचें । ग्रंथांतरीं वर्णिलें वाचे । वेद शास्त्राचे मथित जे ॥ २९ ॥ तेथे जाउनि निरंजन स्वामिनीं । बोधिला स्वपुत्र आणि पत्नि । सकळजन खेळउनी रात्र जागरणीं घालविली ॥ १३० ॥ गणेशपद्धति समुळग्रंथ । पठण

करविले सर्वांते । प्रगट जाहालें निजदैवत । भागिरथीते स्वयें घेउनी ॥ ३१ ॥ कापड्याचे रूप धरून । कावडी घेतली स्कंदीं जाण । म्हणे स्वामीसाठीं आलो धाऊन । देहावसान जाणुनी ॥ ३२ ॥ इतुकें वदतां च सर्वत्रांस । आश्चिर्य वाटलें त्यावेळेस । निरंजनस्वामीनीं करूनि हस्य । नमन तयास केलें पै ॥ ३३ ॥ अर्घ्यपाद्यादि पुजा केली । उपास्यमूर्ति वोळखिली । म्हणती वचनें खरीं केलीं । ग्रंथीं वदली जे वाणी ॥ ३४ ॥ प्रयाणकाळीं निजभक्ताचे । संरक्षण करणें तुम्हासि साचें । तें हि ब्रीद आजि नेमाचें । केलें वाचे काय वदूं ॥ ३५ ॥ ऐसे वदुनी निरंजनानी । मस्तक ठेविलें सदृढ चरणीं । भागिरथीचे जळे करूनी । स्नान करूनि संतोषले ॥ ३६ ॥ तो प्रातःकाळ समय जाहाला । प्रकाश सर्वत्र असे दाटला । तये समई देह ठेविला । ते लीला अनोपम्य ॥ ३७ ॥ प्रत्यक्षता मुखामधुनी । ज्योति निघाली ते चि क्षणीं । तात्काळिक त्या विप्रवदनीं । चिद्गगनीं प्रवेशली ॥ ३८ ॥ तव इतुकियात तो ब्राह्मण । काशीचा जो कापड्या जाण । होता जाहाला अदृश्यमान । जाणती खुण योगी ते ॥ ३९ ॥ हें पाहुनी सकळिकांते । विस्मय जाहाला नारीनरांतें । परस्पर आत्मवेत्ते । गजर अद्भुत करिती ते ॥१४०॥ तें माहात्म्य केतुले वर्णावें । गणपतिस्वरूप जाहाले निरंजन देव । समाधिस्थान केलें बरवें । नामलगांव धन्य तें ॥ ४१ ॥ कोण तिथी कोण मास । शके संवत्सर कोण असे । प्रयाणसमय कोण दिवस । ते श्रवणास करा तुह्मी ॥ ४२ ॥ शालिवाहन शके सोळासे । आणिक वरुते येकुणपन्नास । प्लवंगनाम संवत्सर असे । उत्तममास भाद्रपद जो ॥ ४३ ॥ अनंतचतुर्दशी शुभतिथी । मंगलकारक सर्वांप्रती । वासव जाणा भार्गव निश्चिती । उदयगभस्ति समय तो ॥ ४४ ॥ निरंजनस्वरूपीं श्रीनिरंजन । तये काळीं जाहाले लीन । प्रत्यक्षता चितेंतुन । श्रीगज्यानन निघाले ॥ ४५ ॥ गणेशगाणपत्या नाहीं भेद । हें दाविलें जगा प्रसिद्ध । किंबहुना अर्थ सिद्ध । आणिक विविध असे

पै ॥ ४६ ॥ द्वादश अवतार गणपतीचे । पुराणांतरी वर्णिले साचे । स्थापन केले एकादशाचे । व्हावया जगाचें कल्याण पै ॥ ४७ ॥ बारावा जो राहिला । तो चित्तेमाजीं प्रगटला । याप्रकारें सिद्धीसी गेला । संकल्प केला मुळिंचा तो ॥ ४८ ॥ चतुर्थी दैवत उपासकाचे । च्यार अध्याय चरित्र साचे । वर्णिलें या जड वाचे । माहात्म गुरुचें किती वानूं ॥ ४९ ॥ साधुगणाचा जो का ईश । तोचि स्वामी पंढरी-निवास । श्रवण कराया संतकथेस । उभा असे समचरणीं ॥ १५० ॥ यालागी श्रीसद्गुरुनाथें । आज्ञापिलें मज दिनातें । साधुस्तवन करून ग्रंथ । भावें अर्पित श्रीविठला ॥ ५१ ॥ सिद्धकृपेचीं तीं तीं चरित्रें । श्रवण करा तुह्मी पवित्र । तात्काळीक दुरीतयंत्रे । क्षणमात्रें नासतीं पै ॥ ५२ ॥ राजारामीं सिद्धनाथ । प्रगट जाहाले निजहृदयांत । अवधान द्यावें तुह्मी श्रोते । कृपावंत ज्ञाननिधी ॥ ५३ ॥ पुढें वामन महासाधु पंडित । वर्णिजेल त्या आख्यानाते । श्रवणमात्रें श्रोते वक्ते । होती कृतार्थ गुरुकृपें ॥ ५४ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । निरंजनस्वामींचरित्राते । अध्याय होत चतुर्थ हा ॥ १५५ ॥ ॥ आध्याय ॥ ४ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय अडतिसावा ॥ ३८ ॥



## अध्याय ३९

### —वामनस्वामी—

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरुसिद्ध परेशा । अजअव्यय पंढरीनिवासा । श्रीराघव मायाविलासा । न कळे सर्वेशा पार तुझा ॥ १ ॥ अंतरबाह्य तूं चि येक । बोलतां वाचेसी पडे टक । मौनावले शेषादिक । येक्यामुखें काय वर्णूं ॥ २ ॥ जेथे सकळ वेद-श्रुति । नेति नेति ऐसे वदती । स्वये विस्मित सरस्वती । तेथें किती मानव ते ॥ ३ ॥ परि भक्तांकित सर्वोत्तम । आदिपुरुष आत्माराम ।

निजदासाचा पुरविसी काम । आवडे प्रेम तुजलागीं ॥ ४ ॥ मछकछादि अवतार । धरिले तुवां रमावरें । संताप्रियकर श्रीरघुवीर । रुक्मिणीवर श्रीजगदात्मया ॥ ५ ॥ तूं चि श्रोता आणि वक्ता । आपुली आपण वदवी कथा । दीनदयाळ सिद्धनाथा । ठेविला माथा तवपाईं ॥ ६ ॥ भक्तमंजरी हे माळा । जे कां शोभे तुझिया गळा । त्यांतील मणी वामन भक्त । साधु जन्मला कलीठाईं ॥ ७ ॥ ते चि कथा आतां वदवी । हृदयाकाशीं प्रगटे रवि । स्फुर्तिकीर्णा प्रसवता बरवी । पावेन पदवी प्रसादिक ॥ ८ ॥ धन्य धन्य तीं पाउलें । प्रार्थितां स्वसुखबींद उदेले । संत कथेसी अनुसरलें । अंतर रंगलें निजरंगीं ॥ ९ ॥ वामनस्वामीचें आख्यान । परम गोड अति पावन । तें चि कथविती श्रीगुरु जाण । द्यावें अवधान सर्वत्रीं ॥ १० ॥ संतस्तवन श्रवण करितां । दोष जाती दिगांता । सहजी चुके गर्भव्यथा । स्वतंत्रतापद पाविजे ॥ ११ ॥ जो जो जयाचे मनीं काम । तो तो पूरवी मेघःश्याम । यालागी कथा आवडे प्रेमें । निज्यात्में धर्म अवधारा ॥ १२ ॥ जन्मांतरीं वामन कोण । कथविती स्वामीसमर्थ आपण । सांगिजेल तें चि कथन । संक्षेपें जाणा कांहीं येक ॥ १३ ॥ अंबऋषी श्रीभागवत । वैष्णवमेळीं जो प्रख्यात । येकादशी मुख्यव्रत । करोनी हरिते तोषविलें ॥ १४ ॥ सुदर्शन जयासाठी । लागले दूर्वासऋषीचे पाठीं । पळता श्रमला सकळ श्रृष्टि । आला वैकुंठीं सेवटीं तो ॥ १५ ॥ भगवान सांगती ऋषीला तया । तूं शरण जाईं आलीया ठाया । तेणे चि होसील निर्भया । वंदिता पाया वैष्णवाच्या ॥ १६ ॥ ऐसा थोर भगवत्जन । तो चि जाहाला अवतार वामन । किंबहुना श्रीजगजीवन । केले अवतरण संतवेशें ॥ १७ ॥ अहंकार बळी दैत्य माजला । तयासी घालुनी पाताळा । स्वात्मधर्म स्थापियेला । वामन जाहाला कलीमाजीं ॥ १८ ॥ निर्बेळी निगुरा जाणेल काई । आत्मा असोनि ह्मणे देही । पडला व्यर्थ संशयडोहीं । पाहिजे सोई गुरुकृपेची ॥ १९ ॥ साधु प्रत्यक्ष ब्रह्मरूप । न मनी त्यासी थोर पाप । देव धुंडिती नवल

बाप । लागली झोप विस्मृतीची ॥ २० ॥ जयालागी स्वहीत करणें । तेणें धरावें संतचरण । नाहींतरी सकळ सीण । नानासाधनें वृथाचि ॥ २१ ॥ असो कराया जगदोद्धार । अंबऋषींचा जाहाला अवतार । वामन नाम ज्या साचार । वैष्णव थोर भूमंडळीं ॥ २२ ॥ विज्यापुरात पुण्यश्लोक । ऋग्वेदी ब्राह्मण परमभाविक । तया उदरीं जन्मले देख । ज्ञानदीपक भक्तराज ते ॥ २३ ॥ गर्भसंभव होता जननी । समाधिस्त वर्ते जनीं । रामकृष्ण गर्जे वदनीं । निशिदिनीं तो चि छंद ॥ २४ ॥ गृहधंदा कैचा काई । वृत्ती जियेचि जाहाली विदेही । नऊमास होता चि पाही । प्रसवली आई सुपुत्रा ॥ २५ ॥ नाम ठेविले श्रीवामन । प्रत्यक्ष अवतार हा वामन । त्रिपदभूमी घेऊनी दान । तेचि जाण सच्चिद-पदे ॥ २६ ॥ तिसरेपदासी ठाव चि नाहीं । अहंकारबळी रगडिला तो हि । तेव्हां चि होउनि आनंद देही । लाधलें पाही अनिर्वाच्यपद ॥ २७ ॥ गळीत होता अभिमान । पाताळीचें राज्य त्या जाण । पाण्याहुनी पातळपण । अतिलीन बळीराजा ॥ २८ ॥ मग तयाचे इंद्रियद्वारीं । सदा तिष्टे आत्मा श्रीहरी । द्वैतभाव कैचा उरी । उदकलहरी अभेद ते ॥ २९ ॥ देव तो चि भक्त जाहाला । भक्तें भक्तपणा देवा अर्पिला । अनिर्वाच्य हे बोलिला । काय जिव्हेला वदवेल ते ॥ ३० ॥ आतां चरित्रभाग श्रवण कराया । उदित आवडी सकळ हृदया । यालागीं आवरिले मति इया । अध्यात्मविद्या निरोपण ॥ ३१ ॥ नातरी हें चि बरवें । स्वात्मभाग्य जेणें फावे । परी अज्ञानी बहु जीव । न कळे ठेव ज्याची तया ॥ ३२ ॥ संतलीला श्रवण पठणें । शुद्ध होय अंतःकर्णें । आरंभिले म्हणुनी कथन । द्यावें अवधान सर्वत्रीं ॥ ३३ ॥ विज्यापुरी द्विजोदरीं । जन्मले वामन निर्धारी । ज्ञान जयाचें वसिष्ठापरी । वशीष्ट गोत्रीं ते जाणा ॥ ३४ ॥ उपनाम ह्मणती जन शेष । बोलका तैसा चि जेवि शेष । साधिलें जेणें विशेष । स्वरूप निःशेष सर्वाभूति ॥ ३५ ॥ बाल्य दशेंत वामन । पारशी भाषेंत अतिप्रवीण । अनेक कळा आंगीं जाण । चातुर्य पूर्ण सकळिक ॥ ३६ ॥ तेथील

अविंध अविच्यारी । पातशहा जो कां विज्यापुरीं । छळकबुद्धि तयाची भारि । आवड करी वामनाची ॥ ३७ ॥ वारंवार बोलावणें । पाठवितसे प्रीतिकरून । पंडित जो कां श्रीवामन । कांटाळे मन तयाचें ॥ ३८ ॥ अतिचतुर परी सोवळा । येणें नावडे कचेरीला । यालागीं अविंधें विच्यार केला । भ्रष्ट तयाला करावा म्हणूनी ॥ ३९ ॥ प्रभूनें त्या ऐसें योजिता । इष्टजनानीं कळविली वार्ता । वाटेसी कळले वामनपंडिता । घरासि येता सहजीं ते ॥ ४० ॥ मग ते चि क्षणीं झोळी घेउन । प्रारंभ केला भिक्षेसी जाण । वेदपुरुषायनमःउच्चारण । प्रितीकरून ह्मणतसे ॥ ४१ ॥ हे कळता चि यवनाधिपा । पातला सहजी तो अनुतापा । तात्काळ त्यजिले दुष्ट विकल्पा । आली कृपा तव हृदई ॥ ४२ ॥ गदैवाला जाहाला वामन । ऐकून ऐसें तेणें यवनें । घरासी येउनी स्वयें आपण । लोटांगण घालीतसे ॥ ४३ ॥ सनदा लेहून चिटणीसाहातीं । सरंजाम अर्पिता जाहाला प्रीती । वामन तया धिःकारिती । जाहाली विरक्ति सदृढ ते ॥ ४४ ॥ म्हणति अविंधा अरे मूर्खा । भ्रष्ट करीत होतासी मूर्खा । विषयकर्दमी लोळसी बेडुका । नाशिवंत सुखा भुलोनि ॥ ४५ ॥ भूदेव आम्ही ब्राह्मण । सकळ पृथ्वीसि वंद्य जाण । अधिपत्य तुजलागुन । प्रसादें पूर्ण आमुचिये ॥ ४६ ॥ पातशाहातें करूनि बोध । त्याग करूनि प्रतिग्रह अशुद्ध । स्वीकारूनि भिक्षा शुद्ध । जाहाले सिद्ध निःसंगपणें ॥ ४७ ॥ मग काशींत जाऊन स्त्रियेससहित । शास्त्राध्ययन केलें सत्य । सर्वावरिष्ट होउनि पंडित । अतिस्फुंदत विद्यामदें ॥ ४८ ॥ मध्वमत्त स्वीकारूनी । धारण केली दीक्षा जनीं । निघतां जाहाला काशीतुनी । दिवटी लाउनी दिवसा पै ॥ ४९ ॥ घेउनि संगे पुस्तकभार । बहुत शिष्य द्विजवर । सोवळे अत्यंत निर्धार । जिंकीत क्षेत्र निघाले ॥ ५० ॥ गीरीबाई वामनभार्या । पतिव्रतामाजि जे का आर्या । उत्पन्न ज्ञानी कारण कार्या । जाणे हृदया सकळीका ॥ ५१ ॥ परि तयेच्या हातून । न करिती वामन कदा भोजन । स्वहस्तें पाक करून । पंचमहायज्ञ करीतसे ॥ ५२ ॥ असो ऐसा सोवळा पंडीत । विद्याभि-

मानी जाहाला प्राप्त । सूर्यापुढें जैसें खद्योत । तैसें दिसत जग तया ॥ ५३ ॥ बहुतक्षेत्रे जिंकोन । इंद्रायणींतीरा आले वामन । उत्तम तीर्थ पाहून । कराया स्नान उतरले ॥ ५४ ॥ तव तेथे अत्याद्भुत । वर्तले तें ऐका श्रोते । नदीतटाकीं वृक्ष अश्वत्थ । विस्तीर्ण असत तेथें पै ॥ ५५ ॥ गगनचुंबीत थोर शाखा । अकस्मात देखिले तव रूखा । रात्र असतां दोन घटिका । पूर्णशशांका चांदणें पै ॥ ५७ ॥ पिंपळा वरी त्या झोटिंग दारुण । ब्रह्मराक्षस राहाती जाण । अगांतुक पिशाच्च तेथें येउन । लागले भांडण त्या सर्वा ॥ ५७ ॥ तयासी स्थाइकसमंध सांगती । मोठी फांदी वामनाची निश्चितीं । दुसरा न बैसे कल्पांतीं । आधिकार निश्चिति तुज नाहीं ॥ ५८ ॥ अडचणींत आह्मी बैसतो सकळ । प्रौढ ढाळि तयाचि केवळ । आम्हां सर्वांते श्रेष्ट प्रबळ । गुरुत्व अचळ त्यामाजि ॥ ५९ ॥ तरी वीच्यारुन वामनपंडिता । राही स्वस्थ मग तूं तत्वता । अगांतुकसमंधासी सांगता । आलें चिता तयाचे ॥ ६० ॥ पालट करूनि स्वरूपास । धरिला तेंव्हांचि ब्राह्मणवेश । ढाळीवरी त्या बैसावयास । पुसावयास आला वामना ॥ ६१ ॥ नम्र भावें जोडुनी कर । येवोनी ठाकला पिशाच्च समोर । आरंभिले प्रश्नोत्तर । दिवस च्यार स्थान या ह्मणूनी ॥ ६२ ॥ जिया समई टाकाल देह्यास । पावाल योनी ब्रह्मराक्षस । ढाळी तुमची देउनी तुह्मास । अन्यस्थळास जाईन मी ॥ ६३ ॥ ऐसें ऐकुनी श्रीवामन । आश्चिर्य करिती ह्रदई जाण । म्हणती तूंरे कोटील कोण । आलासी ब्राह्मणवेश धरूनी ॥ ६४ ॥ मग त्या समंधे जन्मांतर । कथन केले दोष सारे । ह्मणे मी होतो द्विजवर । पंडित थोर वाच्याळ ॥ ६५ ॥ ब्राह्मणाचे करूनी अपमान । क्षेत्रें जिंकिलीं विद्येकरून । देह पडतां पिशाच्च होऊन । भुतळी जाण फिरतसे ॥ ६६ ॥ आम्हाऐसीया तुम्ही श्रेष्ट । चतुःशास्त्री माहानगार्विष्ट । तुमचें स्थान ढाळी वरीष्ट । आहेत निष्ट पिंपळावरी ॥ ६७ ॥ कांहीं दिवस याळ स्थान । तरी राहीन तेथें पूर्ण । आपण येतां चि मी जाईन । जागा देईन तुमची तुम्हा ॥ ६७ ॥ ऐकतां ऐसें ते चि क्षणीं । पश्चात्ताप जाहाला

मनीं । वामन म्हणती अंतःकर्णीं । काय जन्मोनी म्यां केलें ॥ ६९ ॥ संपादोनी विद्या सकळ । ब्रह्मराक्षस होणें पडलें । वृथा हिंडोनि भूमंडळ । ब्राह्मण जिंकिले गर्वोक्ति ॥ ७० ॥ धिःकार असो या अध्ययना । ऐसे वाटलें श्रीवामना । त्याग करूनि अभिमाना । करिती रुदना दीर्घ स्वरें ॥ ७१ ॥ निरोप देउनी सकळ शिष्याते । विजविली दिवटी स्वहस्तें । खळखळा नेत्रीं अश्रू वाहात । आंग कांपत थरथरा ॥ ७२ ॥ अनुताप होउनि जाणा । घातिले सदृढ तेथें चि आसना । आरंभिले अनुष्ठाना । तया आरण्यामाजीं पै ॥ ७३ ॥ आधींच अवतार श्रेष्ठाचा । महाभागवत वैष्णवाचा । तयांत अनुताप जाहाला साचा । न पुरे वाचा दृष्टांत द्यावया ॥ ७४ ॥ मुळींच सुवर्ण बावनकशी । करी कोंदण केले त्यासी । काय पाहाणें मग तयासी । श्रीमंतासि भूषण तें ॥ ७५ ॥ किंबहुना शुद्धांमृत । शर्करामिश्रीत केली तयाते । नवल गोडी चाखी तयांत । अत्याद्भुत सांगता नये ॥ ७६ ॥ असो वामनस्वामींनी निग्रह करुनी । दिनत्रय बैसता येकासनीं । प्रगट जाहाले चक्रपाणी । ते वदनीं काय बोलूं ॥ ७७ ॥ उज्वलीत जाहाल्या दशदिशा । मुर्छा पातली भक्तवीरेशा । सगुणध्यान श्रीजगदीशा । पाहाता अविनाशा मन विरालें ॥ ७८ ॥ मस्तकीं मुगुट शोभायमान । तेथील प्रभा वर्णील कोण । कर्णीं कुंडले जडित रत्नें । देखिले निधान श्रीहरि तो ॥ ७९ ॥ मुडिवदंडीं वाक्या शोभती । गळी माळी वैजयंती । विरकंकण ढाळ देती । मुद्रिका दिसति दशांगुळीं ॥ ८० ॥ कासे कासिला पीतांबर । पाई ब्रीदाचा तोडर । वामांगी ते रमा सुंदर । जगदोद्धार श्रीमूर्ति ॥ ८१ ॥ ऐसे पाहाता दिव्यधान । गळीत जाहाले देहभान । करुणानिधी श्रीभगवान । सावध वामन केला पै ॥ ८२ ॥ मग पंडित भक्ताशिरोमणी । दंडवत पडला मेदिनीं । अत्यादरें नमन करूनी । करितसे वदनीं स्तुति बहु ॥ ८३ ॥ ह्मणे जयजयाजी करुणासिंधु । अनाथनाथा दीनबंधु । मी तो पामर बुद्धिमंदु । तोडि छंदु देहबुद्धीचा ॥ ८४ ॥ त्राहे त्राहे देवराया । त्रिविधतापें तापली काया । तवकृपेची करणें छाया । निववी हृदया

स्वामी तूं ॥ ८५ ॥ पाहातां माझे गुणदोष । मही न पुरे त्याहावयास । ऐसा पतित मी निःशेष । पावन सर्वेश तूं हारे ॥ ८६ ॥ अनन्यभावें करितां प्रार्थना । कृपेनें द्रवला वैकुंठराणा । माग रे ह्मणती तू वामना । असेल मना तें तें पै ॥ ८७ ॥ इंद्रादिपदें अष्टमा सिद्धि । देतो भगवान ह्मणती त्रिशुद्धि । न धरु येथें कांहीं अवधि । नवही निधी देतो तुज ॥ ८८ ॥ जें जें चित्तीं वांछित असेल । तें तें पावसी याचि वेळे । ऐसे बोलतां वैकुंठपाळ । भक्तवत्छळ सर्वोत्तम ॥ ८९ ॥ तयेकाळी भक्तचुडामणी । उभा ठाकला जोडुनी पाणी । श्रीवामन वैराग्यखाणी । गर्जे वाणी तें ऐका ॥ ९० ॥ अहो देवा ज्ञानतरुणी । मज कां झकविसि कैवल्य-दानीं । आधींच सिरला अभीमान मनीं । बुडतसे जीवनी मायेचा ॥ ९१ ॥ कामक्रोधादि जळचरें । गिळीतसे वासना सुसर । डंखियले या विखारे । अहंकारे भवसर्पे ॥ ९२ ॥ म्हणउनी तुजला बाहतसे । जाणतसा हृदयनिवास । आत्मज्ञानाविण आस । दुजी नसे सर्वथा ॥ ९३ ॥ स्वर्गादिक विषयभोग । तेतो माईक पाहाता रोग । वासनेचा दवडी पांग । देई अभंग निजात्मसुख ॥ ९४ ॥ आत्मज्ञानावाचुनी सिद्धी । तेतो सर्वथा माईकउपाधि । हें तूं जाणसी कृपानिधी । दवडी आधीं अभीमान ॥ ९५ ॥ मी वामन देह्यधारी । पंडित श्रेष्ठ जाहालो भारी । अहंकृति हे जडोनी शरीरीं । जातसे अघोरी नर्काते ॥ ९६ ॥ तरी स्वामिया ऐसें करा । आत्मस्थिती पावेन खरा । भक्तभाषण सारंगधरा । ऐकुनी बरा संतोष ॥ ९७ ॥ मग बोले यदुकुल भूषण । जाई जाई संतांसी शरण । तेणें पावसी स्वसुख पूर्ण । बाणसी खूण सहजी ते ॥ ९८ ॥ संतकृपेवीण कांहीं । आत्मस्थिति प्राप्त नाहीं । ह्मणुनी मी संतहृदई । निरंतर पाही वास करीतो ॥ ९९ ॥ धरी वामना सद्गुरुपद । तेणेंचि लाहासि आत्मपद । सांगता ऐसे श्रीगोविंद । हृदई आनंद उचंबळला ॥ १०० ॥ पुढें कथा हे चि रसाळ । परिसोत श्रोते भक्तप्रेमळ । मंजरी-माळा अतिसुढाळ । गुंफवी स्नेहाळ दिनाहाती ॥ १०१ ॥ सद्गुरुनाथ सिद्धस्वामि । वर्षिला मेघ हृदयभूमी । शद्धतुळसी उगवली नेहमी ।

स्वात्मधर्मीं मंजऱ्या त्या ॥ १०२ ॥ माळ तयाची राजारामीं । अर्पण होतसे स्वसुखधामीं । तादात्म्यता स्वानंदउर्मीं । रंगले प्रेमीं मानस त्या ॥ १०३ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । वामनस्वामीचरित्राते । अध्याय विलसत प्रथम हा ॥ १०४ ॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय येकुणचाळीसावा ॥ समाप्तः ॥ ३९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ४०

### —वामनस्वामी—

( पुढें चालू )

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजि आनंदकंदा । आत्मयारामा स्वतसिद्धा । पुराणपुरुषा सकळ आद्या । निरसि बाधा द्वैताची ॥ १ ॥ तू माउली मी लेंकरुं । नको मजला दुरी धरुं । गौत्तमीचे लाहान वासरु । तेवि हंबरु कीति पै ॥ २ ॥ जळचरासी जीवन । वेगळे करिता नुरे प्राण । तेवि माहाराज करुणाघन । अव्हेर न करणें सर्वथा ॥ ३ ॥ तरी आता निजदासा । सांभाळावे जानकीनिवासा । होवोनिया सर्वत्र सरिसा । पुरवी आशा भक्तीची ॥ ४ ॥ हें चि मागणें जन्मोजन्मीं । वृत्ति जडो पादपद्मीं । राहोनि सदा अंतर्यामीं । वदवी नामीं रसना हे ॥५॥ असतमाया निरसोनी अघवी । संतलीळा समुळ कथवी । देह्यबुद्धि कदा नुरवी । देई बरवी तव सेवा ॥ ६ ॥ प्रार्थना परिसोनि सिद्धनाथ । प्रगट जाहाले हृदयाते । बोलविती साधुकथे । ऐकतां तें सुख पावे ॥ ७ ॥ पूर्वाध्याई वामनाला । अनुताप होतां चि भला । श्रीभगवान भेटता जाहाला । जाय संताला शरण म्हणे ॥ ८ ॥ तेणे होईल आत्मप्रप्ती । ऐसें सांगतां रुक्मीणिपति । वेधली तेथें समुळवृत्ति । लागला चित्तीं निजध्यास ॥ ९ ॥ रात्रंदिवस न पडे चैन । पळ

जातसे युगासमान । हिंडतसे वामनब्राह्मण । मनीं धरुनि निज हेतु ॥ १० ॥ ह्मणे कधीं भोगीन स्वात्मरूपा । भवभ्रांतीच्या चुकतील खेपा । तिळांजुळी देईन पापा । जाळीन कंदर्पा भावबळें ॥ ११॥ सहजस्थिति आत्मनिवेदन । कधीं लाहीन सोहं स्फुरण । रात्रंदिवस भ्रमलें मन । न पडे चैन कोठें चि ॥ १२ ॥ पृथ्वीमध्यें नाना देश । ग्रामें नगरें पटणें विशेष । वनें उपवनें हुडकीतसे । माहापुरुष साधु ते ॥ १३ ॥ शहरें क्षेत्रें सकळ धुंडिलीं । बहुत फिरला भूमंडळीं । स्थिरवृत्ति नाहीं जाली । तनु भ्रमली वामनाची ॥ १४ ॥ तव अकस्मात ऐकिली कीर्ति । तुकाराम संत थोर जगतीं । तयाकडे वेधली वृत्ति । जावें ह्मणति शरण तया ॥ १५ ॥ देहुक्षेत्रासी येउनी त्वरें । पाहोनी तुकोबा वैष्णववीर । प्रश्न केला अत्यादरें । आत्मविच्यार पुसावया ॥ १६ ॥ तुकाराममाहाराज तयेकाळीं । बोलती सयुक्त ऐकिजे सकळीं । अमानित्वस्थिति भली । विसावली आंगीं ज्या ॥ १७ ॥ ह्मणती श्रेष्ठा वामनपंडिता । मी शूद्र प्रत्यक्ष पाहातां । वर्णामाजीं गुरु तत्वता । ब्राह्मण सर्वथा ते तुह्मी ॥ १८ ॥ नेणुनी आपलें थोरपण । वृथा चि हिंडसी भूतळीं जाण । उपदेश असेल जरी घेणें । जावें शरण तरी रामदासा ॥ १९ ॥ श्रीहनुमंताचा तो अवतार । शिष्य कल्याण तो नळवानर । करावया जगदोद्धार । गुरुशिष्य खरे विचरति पै ॥ २० ॥ तरी बा वामना तयाकडे । जाता पावसी सुख रोकडें । सिंधुवरी तारिले दगड । सामर्थ्य येवढे ज्या आंगीं ॥ २१ ॥ सकळ संतांत मुगटमणी । रामदासस्वामीसमर्थ जनीं । तयाजवळी कोदंडपाणी । आत्मदानी तिष्ठतसे ॥ २२ ॥ यालागी तुह्मी विद्याभिमान । टाकुनी धरावे सदृढ चरण । तेणे होउनी आत्मदर्शन । समाधान पाविजेल ॥२३॥ सुचवितां ऐसे तुकोबानी । संतोषले वामन मनीं । मार्ग धरिला ते चि क्षणीं । आले निघोनि चाफळा ॥ २४ ॥ मठांत येउनी श्रीरघुपतीसी नमन केलें साष्टांगेसी । विच्यारिले समस्तासी । मंडळीसी तेथील पै ॥ २५ ॥ म्हणती समर्थ रामदास । कोठें आहेत सांगा आम्हांस ।

धीर न पडे कदा मनास । येणें उपदेश तयाचा ॥ २६ ॥ वामन पंडित ऐशापरी । सांगता हृद्गद निजवैखरी । दाखविला सन्निध गिरी । आहे दरी ज्यामाजी ॥ २७ ॥ रामवळ ह्मणती जन । दुरोनी दाविलें तें चि स्थान । जेथे समर्थ राहाती पूर्ण । जवळी कल्याण शिष्य तो ॥ २८ ॥ मग तात्काळ वामन जाउनि तेथें । साष्टांग नमिला सद्गुरुनाथ । जो कां अवतार श्रीहनुमंत । जोडिले हात तयासी ॥२९॥ गीर्वाण भाषे प्रश्न करूनी । ह्मणे स्वामि द्या प्रतिवचन । समर्थें करूनी हास्यवदन । राहिले मौन उगे चि ॥ ३० ॥ वित्पत्तीचा जाणुनी स्फुंद । ह्मणती वामना राहे स्तब्ध । जेथें खुंटला श्रुतिवाद । तेथें छंद न करी तूं ॥ ३१ ॥ भविष्य जाणुनी पुढील । वामन स्वामीसी आज्ञापिले । पर्वत जो कां मळयाचळ । उपदेश होईल तेथे तुम्हा ॥ ३२ ॥ मग दिनत्रय करुनी वास । वंदिला स्वामी रामदास । निरोप घेउनी विद्वांस । लागले मार्गास द्विजवर ते ॥ ३३ ॥ समागमे गिरीबाई । पतिव्रता स्त्री पाही । लक्ष ठेउनी श्रीगुरुपाई । विचरती मही तीं दोघें ॥ ३४ ॥ ठाईं ठाईं तीर्थ करीत । उपदेशाचा मनीं हेत । मळ्याचळीं वामन पंडित । भजन करीत गेले पै ॥ ३५ ॥ तव तेथें कर्दळीवन । भयंकर दिसे अरण्य । वनचरें हिंडतीं बहुत जाण । निबिड पूर्ण झाडी ते ॥ ३६ ॥ तये स्थळीं कांहीं दिवस । स्त्रीपुरुष तेणें केला वास । परी स्वस्थ न होय मानस । ईच्छिती स्वरूपास भोगावया ॥ ३७ ॥ सेवटीं वामने निश्चय केला । प्राण द्यावया उदित जाहाला । ह्मणती आत्मप्राप्ति न होय आपणाला । त्यागीन देहाला सर्वाथा मी ॥ ३८ ॥ सारुनी सकळ नित्यकर्म । देवार्चनादि करुनी नेम । नैवेद्य अर्पावया सप्रेम । पाक धर्म आरंभिला ॥ ३९ ॥ चुलीवरी ठेउनी चरुपात्र । लाविले विच्यारीं आपण नेत्र । सच्चिद आनंदपदपवित्र । करिती स्वतंत्र अर्थ त्याचा ॥ ४० ॥ तये काळीं जाहालें नवल । ऐकावें तें श्रोतिये सकळ । वामनस्वामिनी झांकुनी डोळे । मानस सोज्वळ केलें पै ॥ ४१ ॥ पदद्वयाचा करुनी अर्थ ।

आनंदपद न होय प्राप्त । तये काळीं उठोनि त्वरित । स्वहस्तें कंबर बांधिली ॥ ४२ ॥ पर्वतावरुन देहपतन । करिता जाहाला वामनब्राह्मण । दीर्घ स्वरें गर्जोनी जाण । गुरुत्व ह्मणे बुडाले ॥ ४३ ॥ तये समईं श्रीगुरुराज । यतिरुपें प्रगटले सहज । द्रौपदीसी पावले गरुडध्वज । तैसे अधोक्षज पातले ॥ ४४ ॥ कि प्रऱ्हादे स्तवितां वैखरी । खांबीं प्रगटला नरकेसरी । कीं गजेंद्रे धावा करितां हरि । आले झडकरी तात्काळ ॥ ४५ ॥ तयापरी येथें जाहालें । अद्भुत तेज प्रज्वाळलें । सद्गुरुनाथ उद्भवले । नये वार्णिलें सुख तेव्हां ॥ ४६ ॥ सावध सावध ह्मणती वामना । फिरोनि पाहे माघे नैना । भुलोनी गेलासी आप आपणा । उगा चि प्राणा मुकसी तूं ॥ ४७ ॥ मग तात्काळ येउनी जवळी । दृष्टिपात केला तये वेळीं । मंत्र सांगुनी श्रवणकमळीं । निज्यात्ममेळीं मेळविले ॥ ४८ ॥ मस्तकीं ठेवितां वरदकर । स्वरूप दाटलें सबाह्य सारे । विरोनी गेले जेथें अंबर । तो विच्यार काय बोलूं ॥ ४९ ॥ उन्मनीस्थिती प्राप्त जाहाली । देहस्मृती मावळली । स्वयंज्योति उगवली । निशी गेली द्वैताची ॥ ५० ॥ जेथें हारपली दृश्य उडगणें । मिथ्याभास सकळ जन । ज्ञानसूर्य उदेला पूर्ण । भक्तिकीर्णें ज्यामाजी ॥ ५१ ॥ सहजसमाधी अपी अप । बाणोनि गेली सद्गुरुकृपें । द्वैततमाचा जाहाला लोप । उजळीला दीप सोहंतेचा ॥ ५२ ॥ दिनत्रय ताटस्थता । वामनस्वामिसी जाहाली तत्वता । नंतर श्रीगुरुनी थापटितां । तुर्यावस्था प्राप्त जाहाली ॥ ५३ ॥ इंद्रियें सकळ स्वकर्मीं । प्रवर्तले आपुल्या धर्मीं । सद्गुरुचे पादपद्मीं । निजप्रेमी विनटले ॥ ५४ ॥ यथाविधि करुनी पुजन । आरंभिलें पूर्णस्तवन । अनन्यभावें वामन । जाहाले तल्लीन गुरुपाईं ॥ ५५ ॥ तये वेळीं अवधूतवेशा । भगवान जो कां प्रगटलासे । म्हणे हनुमंत अवतार रामदास । समागमास राहावे तेथें ॥ ५६ ॥ तेणें होऊन कृतकृत्यता । लाहासी समूळ निजपूर्णता । ऐसें सांगुनी सर्वथा । स्वयें तत्वता गुप्त जाहाले ॥ ५७ ॥ मग वामनस्वामि स्त्रियेसहित । निघाले सोडून मळया-

चळपर्वत। परळीस जावया धरिला पंथ। भजन करीत आनंदेसी ॥५८॥ मार्गीं चालतां भेटती जीव। तयासी देती निज अनुभव। धन्य माहाराज वामनवैष्णव। ज्ञानवैभव ज्या आंगीं ॥ ५९ ॥ पतित चांडाळ अनाधिकारी। तेही उद्धरीले प्राणी भारी। स्वरूपस्थिती प्रगट अंतरीं। वदे वैखरी हरिनाम ॥ ६० ॥ स्वइछाच्यारि शुचिर्भुत। वामनस्वामी पूर्णभक्त। त्याची भार्या ज्ञानवंत। पातिव्रत्य अतिशयेसीं ॥ ६१ ॥ सन्निध येता परळीजवळ। अति अद्भुत नवल जाहालें। ऐकावें तें श्रोतिये सकळ। करुनी निश्चळ मानस पै ॥ ६२ ॥ उर्वशीनदी उत्तमतीर्थ। पाहुनी आरंभिले स्नानसंधेते। पाक करिती स्वहस्तें। सोवळे बहुत श्रीवामन ॥ ६३ ॥ चुलीवरी तांदुळ धुवोन। ठेविले स्त्री गिरीबाईनें। इकडे वैष्णव तो ध्यानस्त पूर्ण। विच्यारीं निमग्न सच्चिदपदीं ॥ ६४ ॥ तो चरुपात्रासी तये वेळीं। कडासी येता चूल घसरली। गिरीबाई खदखदा हासली। दृष्टी उघडली वामनानी ॥ ६५ ॥ हास्य करावया कारण काय। हे तूं सांग सत्वर भार्ये। विच्यारितां वंदुनी पाय। बोले अनन्यभावे करूनी ॥ ६६ ॥ ह्मणे मी सहजीं स्वभाविकपणें। केलें स्वामिया हास्यवदन। आपुल्या गळ्याची घातली आण। ह्मणती वामन सत्य वद तूं ॥ ६७ ॥ मग सांगे ती च्यातुर्यखाणी। लावण्यकळा सौदामिनी। सच्चिदपदार्थ अद्यापी मनी। शोधितां ह्मणुनी हास्य केलें ॥ ६८ ॥ ऐसें बोलतां ते अवसरीं। वामन खोचले पुर्ण अंतरीं। आलिंगन देउनी त्या सुंदरीं। करिती वैखरी स्तुति बहु ॥ ६९ ॥ ह्मणती आणीक कोण्ही असते दुजे। तरीं वंदितो त्याचे पदरज। अंतरीचे जाणिले गुज। धन्य आजे तूं होसी ॥ ७० ॥ संतोषोनी श्रीवामन। स्वस्त्रीहातून करिती भोजन। उत्कृष्ट जियेचें भाग्य जाण। जीचे मन श्रीभगवंतीं ॥ ७१ ॥ जन्मांतरीची योगभ्रष्ट। पातीव्रत्य जियेचें चोखट। ज्ञानकळा ती वरिष्ठ। मूर्तिमंत स्पष्ट गिरीबाई ॥ ७२ ॥ अंबऋषराजा विष्णुभक्त। तपश्चर्या जयाची अद्भुत। पुण्य-

राशी जेवि पर्वत । संगे विलसत जन्मो जन्मीं ॥ ७३ ॥ स्त्रीरूप ते गिरीबाई । अंबऋषि तो वामन पाहीं । उद्धरावया सकळ मही । जन्मले ठाई कलीमाजीं ॥ ७४ ॥ निवारावया वृत्ताभिमान । अमानित्व याचें अंगीं पूर्ण । यालागीं धरूनि नामवामन । लघुत्व जाण स्विकारिले ॥ ७५ ॥ परी तो स्वभाव पहिला । अंगीं सहजि होतां राहिला । ब्राह्मण द्रोह निरसोनी भला । भजनी लागला सद्गुरुपदीं ॥ ७६ ॥ असो ते जन्मांतर सांगता । ग्रंथ वाढेल सर्वथा । सारांश येथें वर्णिली कथा । ठेउनी माथा सिद्धपदीं ॥ ॥ ७७ ॥ जे जे स्वामि बोलविती । ते साक्ष देती श्रृती । श्रीगुरुकृपेची हृदईं स्फुर्ति । प्रत्यक्ष मारुती तो रामदास ॥ ७८ ॥ शिरीं ठेउनी पद्मकर । केलें कृपेनें निजात्मभद्र । जन्मांतरींच्या कथा सुंदर । वदविती साच्यार संतलीला ॥ ७९ ॥ ते संत वामनमहाराज । गिरीबाई स्त्री तयासी साजे । अंतरींचे तयेनें सांगतां विज । आश्चर्य चोज वाटलें पै ॥ ८० ॥ असो स्त्रीपुरुष उभयतां । आनंद होउनी तया चित्ता । भोजन सारूनी तेथें तत्वता । क्रमिती पंथा ते दोघे ॥ ८१ ॥ पुढे देखिला सज्जनगिरी । परळीगड तो चि निर्धारीं । तेथे माहाराज भवतमारी । राहती वरी रामदास ॥ ८२ ॥ सन्निध आले वामन जाणून । समर्थासी जाहला आनंद पूर्ण । उठोनी स्वयें आसनावरून । आले निघोन सामोरे ॥ ८३ ॥ परस्परें भेटी होतां । उचंबळला हर्ष चित्ता । नये सांगवे मज आतां । उन्मनी अवस्था वरीतसे ॥ ८४ ॥ तुर्ये अवस्थेवीण कांहीं । ग्रंथरचना होणार नाहीं । यालागीं विनवणी श्रीगुरु आई । वर्ते देही संत स्तवाया ॥ ८५ ॥ नातरी समाधी निर्विकल्प । योगी जनासी ते चि पडप । परि भक्ति करणें अमुप । तुर्यारुप भोगी ह्मणुनी ॥ ८६ ॥ जेवि अडभींतिवरील दीवा । प्रकाश दोहिकडे तेणे करावा । तैसे चि येथे पाहाता भावा । स्वानुभवा जाणीजे पै ॥ ८७ ॥ न तुटतां स्वरुपानुसंधान । इंद्रिये धर्मे वर्तती पूर्ण । श्रीगुरुसेवा नवविधभजन । साधुस्तवन इत्यादि ॥ ८८ ॥ रामदासस्वामि आणि वामन । भेटले

तें ऐका कथन । समुद्रासी मिळाली गंगा पूर्ण । निवडी जीवन कोण तेथें ॥ ८९ ॥ नातरी ते हरिहर । येकत्र होता द्वैत वीर । कीं गुरुशिष्य पाहातां विच्यार । ब्रह्म स्वतंत्र मुळिचें पै ॥ ९० ॥ कीं पितापुत्र अभेद । स्त्रीपुरुष येकचि सिद्ध । तेवि वामन रामदास प्रसिद्ध । भेटले निर्द्वंद येकसरें ॥ ९१ ॥ सप्रेम स्नेहयुक्त । परस्परें बोलती वृत्तांत विनोद करितो सहजी समर्थ । तो गुह्यार्थ अद्भुत पै ॥ ९२ ॥ ह्मणती आहो वामनराया । पडावें कीं नाहीं स्त्रीचे पाया । ऐसें वदतां चि समजलें हृदया । करीती आश्चिर्या वामन मनीं ॥ ९३ ॥ धन्य धन्य वदोनी वाणी । नमन केलें साष्टांग धरणीं । निवेदिलें सकळ चरणीं । आदिकरुनी अनुग्रहादि ॥ ९४ ॥ जोडोनी दोनी करसंपुष्ट । प्रार्थिती स्वामिसी वामन चोखट । ह्मणती राहात्रे सदा निकट । हें चि वाटे मजलागीं ॥ ९५ ॥ वृद्धिंगत होईल ज्ञान । राहील सदा समाधान । ऐसें बोलता दयाघन । आनंदले हनुमान रामदास ॥ ९६ ॥ आदर करूनि वामनस्वामीते । ठेउनी घेतले स्त्रियेसहित । उभयतांची प्रिती बहुत । उपमा तयाते नाहीं दुजी ॥ ९७ ॥ वेदांत सिद्धांत सारासार । नित्य संवाद प्रश्नोत्तर । नाना वाक्यें शास्त्राधारें । बोलती विच्यार सहजस्थिती ॥ ९८ ॥ कोणे येके दिनीं शिष्य कल्याण । संप्रदाई अनेक जन । स्वामिजवळी असती पूर्ण । तया वामन प्रश्न करीत ॥ ९९ ॥ प्रश्न ऐकुनी श्रीरामदास । संतोषले फार मानस । आज्ञापिले सत्‌शिष्यास । ब्रह्मचतुर्दश सांग ह्मणती ॥ १०० ॥ आज्ञा वंदुनी गुरुभक्त । ब्रह्मस्थिती निवेदित । तयेकाळींची ऐका मात । स्नेहभरीतसंवाद जो ॥ १ ॥ सातवा दशक तिसरा समास । दासबोधीं ब्रह्म चतुर्दश । स्थापुनी उडवीला शबलांश । तो विलास अतिसाजीरा ॥ २ ॥ पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत केला । अनिर्वाच्य ह्मणती वेद ज्याला । कल्याणानें स्वानुभव वदला । आनंद जाहाला सर्वांसी बहु ॥ ३ ॥ आनंदी आनंद जिरोन । जाहालें मनाचें उन्मन । परी प्रश्न करिती वामन । शास्त्रप्रमाण काय ह्मणुनो ॥ ४ ॥ तयेवेळीं ब्रह्मस्थितीचा ।

मुगुटमणी संताचा । अवतार पूर्ण मारुतिचा । धरी ठाईंचा वेश आपुला ॥ ५ ॥ भीमरूप अत्याद्भुत । जाहाले स्वामि श्री हनुमंत । पुच्छ हाणुनी पाठिवरुते । वामनाते दर्शन दिधलें ॥ ६ ॥ पुन्हा मागुति पूर्ववत । जाहाले रामदासस्वामिसमर्थ । परमप्रीतिने भाषण करीत । वामनपंडित धन्य ते ॥ ७ ॥ ब्राह्मणक्षेत्रें बहु जिंकिली । वेदशास्त्रें कैसी पाहिली । बृहदारण्यांत सांगितली । नाहीं देखिलीं चतुर्दशब्रह्में ॥ ८ ॥ ऐसें सांगतां रामदासस्वामी । वामन समजले अंतर्यामिं । जयजयकारें गर्जोनी नामीं । विनटले ब्रह्मीं तात्काळ ॥ ९ ॥ सर्वकाळीं भगवद्भजन । सकळ संतासी करिती नमन । नम्रता प्राप्त होऊन । जाहाले वामन लीन सदा ॥ ११० ॥ संस्कृत भाषण करुनि त्याग । प्राकृतभाषा बोलती सांग । सर्वांभूतीं रमारंग । पाहाती आभंग जग सारे ॥ ११ ॥ रात्रंदिवस आत्मध्यान । जिव्हेसी छंद नाम स्मरण । तेणें हरि संतुष्ट होऊन । वरप्रदान देतसे पै ॥ १२ ॥ जिव्हाग्रीं राहोनि सरस्वती । हृदईं प्रसवली काव्योक्ती । मग जें जें वामन बोलती । ते ते होती ग्रंथ पै ॥ १३ ॥ यथार्थदिपीका आदिकरून । ग्रंथ जाहाले अनेक जाण । वामनोक्ति करितां श्रवण । त्वरित ज्ञान होय जीवा ॥ १४ ॥ काव्यरचनेची पाहातां यमके । वाचस्पतीसी पडले ठक । चाकाटले व्यासादिक । सहस्रमुख विस्मित पै ॥ १५ ॥ पंडित आणि भगवद्भक्त । अंबऋषीचा अवतार सत्य । जयासाठी वैकुंठनाथ । जन्म धरीत युगायुगीं ॥ १६ ॥ ऐसें समर्थ माहावैष्णव । सामर्थ्य पाहातां ज्याचें आपुर्व । मागें पुढें देवाधिदेव । तिष्ठे सर्वकाळ ही ॥ १७ ॥ दुर्धर कली हा मळीन । विषयासक्त जाहाले जन । तेणें कळवळोनी दयाघन । संत सर्वज्ञ अवतरती ॥ १८ ॥ अनिर्वाच्य संतमहिमा । जयादर्शनीं वाधे प्रेमा । निरसुनी द्वैतभ्रमा । परब्रह्म मेळविती ॥ १९ ॥ श्रीसिद्धें कृपा केली । भक्तमंजरीमाळा करविली । पदांबुजीं भ्रमरी जाहाली । वृत्ति रंगली राजारामीं ॥ १२० ॥ पुढें कथा हे चि बरवी । वामनकथा ऐकिजे सर्वी । तेणें अर्थ सकळ पुरवी ।

त्रैलोक्य गोसावी षड्गुणेश्वर ॥ २१ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । वामनस्वामी आख्यानातें । आध्याय होत द्वितीय हा ॥ १२२ ॥ आध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमें आध्याय चाळिसावा ॥ ४० ॥

## अध्याय ४१

### —वामनस्वामी—

( पुढें चालू )

श्रीगणेशायनमः ॥ श्रीराम समर्थ ॥ जयजय सद्गुरु पंढरिनिवासा । पूर्णब्रह्म श्रीसिद्धेशा । आत्मयारामा चिद्विलासा । सूर्यवंशा तुज नमो ॥ १ ॥ दशइंद्रियात्मक दशरथ । कौसल्यामाया सुनिश्चित । जीचें कौशल्य पाहातां अद्भुत । प्रगटवीत चराचरिं ॥ २ ॥ लक्षिलें मनें जें अलक्ष । तें चि लक्ष्मणा जाणाअध्यक्ष । भगवंतप्रेमें श्रवति अक्ष । भरथ निरीक्ष सर्वत्र पै ॥ ३ ॥ अहंभावशत्रु संव्हारिता । शत्रुघ्नमाहाराज तो सर्वथा । विध्यार सन्मुख जोडुनि हाता । तया हनुमंता नमियेले ॥ ४ ॥ देह्य आयोध्येंत देवगण । अवतरले विबुध वान्नर जाण । अठरापद्में ती च पूर्ण । पाहाती तत्वज्ञ तत्वगणना ॥ ५ ॥ असो ऐसा सर्वाभूतिं । प्रसिद्ध नमिला श्रीरघुपति । सिद्धकृपें होऊनि स्फूर्ति । वदतसे युक्ति चरित्रमालिका ॥ ६ ॥ मागील कथा रामदाससंगति । वामन पावले पूर्णस्थिति । ग्रंथ निर्माण करूनि जगति । उद्धरति जडजीव ॥ ७ ॥ स्थळोस्थळीं भगवतकीर्तन । वाढविलें ब्रह्मज्ञान । अन्वयव्येतिरेक ज्याचा पूर्ण । दशा सुलीन शोभतसे ॥ ८ ॥ प्रांजळ करूनि गीतार्थे । लाविले जन आत्मपंथें । कवनं पाहातां वेधे चित । प्रगटे अनंत तात्काळ ॥९॥ अभंग अनेक धाटि । कवित्वरचना सुंदर मोटि । धरितां अर्थ सदा पोटि । होये लुटि स्वरूपाचि ॥ १० ॥ यमक पडतां कर्णि । यम गदगद कांपे मनिं । यमुनाविहारि प्रगटे ध्यानिं । यमनियमसाधनिं मोहित ज्या

॥ ११ ॥ अंबऋषिचा अवतार । वैष्णवामाजि वामन धुर । येकादशिव्रत सार । आचरिला निर्धार येकविध पै ॥१२॥ विष्णुवाचुनि अन्य देवता । नाहिं स्तविली तेणें तत्वता । मंगळाचरण तें चि सर्वथा । नेणे वार्ता गणेशादि ॥ १३ ॥ ऐसा निःशीम श्रीवामन । सर्वभावें येक नारायण । दुसरें दैवत न शिवे मन । स्तवन अवघें विष्णूचें ॥ १४ ॥ परि त्या विष्णूचें अराध्य । माहारुद्र येक प्रसिद्ध । तो अवतार रामदास शुद्ध । जाणुनि निर्द्वंद्व शरण गेले ॥१५॥ लाहोनि सहजीं कृतकृत्यता । समागमिं राहिले तत्वता । तये वेळीं जोडुनि हाता । असे सर्वथा हे दीन जवळि ॥ १६ ॥ ती कथा आजि श्रीगुरुराये । बोलविति माहाराज आपण स्वयें । सिद्धदयाघन रामदास होय । दुरीत जाय स्मरण करितां ॥ १७ ॥ कल्याणार्थ देह धरउनि । ग्रंथ करविती बुद्धित रिघोनि । मागिल समंध जाणुनि । धरविलि लेखणी गुरुरायें ॥ १८ ॥ नातरि मी काय दीन पामर । पूर्वील कथा वर्णीन सार । कृपासागर सिद्धेश्वर । रामदास अवतार धन्य तो ॥ १९ ॥ असो अंबऋषि तो वामन जाहाला । कारण हेतु हा चि भला । भगवतगुण वर्णावयाला । साधु जन्मला कलयुगीं ॥ २० ॥ ग्रंथ वाचितां तयाचे । जीवित्व काय जीवाचें । शिवित्व ते हि नुरे साच । लाहे नेमाचें परब्रह्म ॥ २१ ॥ स्वईच्छाच्यारे भ्रमण करीती । दर्शनें चि होय जना मुक्ति । वामनस्वामि करविराप्रति । सहजस्थिति आले पै ॥२२॥ पाहुनि क्षेत्र देवता स्वरूप । सकळ उदकें तीर्थरूप । संतोष जाहाला मनासि अमुप । नेत्रासि झिरपे प्रेमोदक ॥२३॥ साधुवृंदे ठाईं ठाईं । देखुनि आनंद जाहाला हृदईं । अंबिकेचे देवालईं । आले साहि वामन ते ॥ २४ ॥ शिष्टजनासि होउनि हर्ष । ठेउनि घेतले वामनास । प्रत्यहिं येति दर्शनास । घेति उपदेश नरनारि ॥ २५ ॥ संप्रदाय तेथें करून । कोरेगांवासि आले जाण । येकांतस्थळ पाहुन । स्थिर वामन जाहाले ॥ २६ ॥ श्रीनारायणाचि स्थापुनि मूर्ति । कीर्तन स्वयें आपण करिति । जे जे प्राणि श्रवणासि येति । ते ते होति

महारूप ॥ २७ ॥ दिवसा कीर्तनभजनप्रेम । रात्रौ ध्यानस्थ वामन परम । ऐसा जयाचा प्रत्यहिं नेम । धन्य ग्राम कोरेगाव ते ॥ २८ ॥ राहुनि तेथे दीर्घकाळ । असंख्य जीव उद्धरिले । मग तेथुनि सहजीं निघाले । कृष्णातीर सकळ पाहावया ॥ २९ ॥ अनुक्रमें समुद्रा- पासुनि । देवता क्षेत्रें पाहाती नैनिं । ठाईं ठाईं स्थिर होउनि । मेळविति प्राणि सत्स्वरूपा ॥ ३० ॥ समागमें सत्शीष्य । माहादेवनामें द्विज आसे । नवक प्रेमा तयाचा विशेष । सदा सेवेस तत्पर तो ॥ ३१ ॥ आणीक मंडळी भावीक । सांप्रदाई असति असंख्य । भजन करित चालती देख । कृष्णातटाक अवलोकीति ॥ ३२ ॥ ऐशापरि अनेक ग्राम । शहरें पटणें क्षेत्रें परम । वनें उपवनें अरण्य दुर्गम । देखति परम वामन ते ॥ ३३ ॥ बहुविध रम्य साधुस्थळ । वेदा संगमीं ब्रह्माळ । आनंदमूर्ति भक्त प्रेमळ । संस्थानिं केवळ त्या क्षेत्रिचे ॥ ३४ ॥ राहातां तेथे दिनत्रय । पंढरीसि यात्रा निघाली पाहे । वामनस्वामिचे दाटलें हृदय । लवलाहे सप्रेमें ॥ ३५ ॥ मंडळींसहित भगवद्भक्त । तेथुनि निघाले वामनसंत । पंढरिनाथ स्मरोनि चित्तें । धरिला पंथ पंढरिचा ॥ ३६ ॥ पुढें वाटेसि वैष्णवमेळा । समुदाव सकळ भेटला । मग त्या वर्मील कोण सुखाला । बहुत जाहाला आनंद पै ॥ ३७ ॥ श्रीरंगमूर्ति आत्मासंत । कृष्णउपासक जयराम भक्त । निरंजन तो गाणपत्य । शिष्यसहित रामदास ॥ ३८ ॥ केशवस्वामि शिवरामसाधु । अखंड जयाचा देवासि वेधु । तुकयासमर्थ कान्होबा बंधु । आले वधु- सहित ते ॥ ३९ ॥ केशरीनाथ शिवदिननाथ । कोकिलप्रभु तो विख्यात । मोरयादेव चिंचवड ग्रामस्थ । आले निश्चित तेहि पै ॥ ४० ॥ पाहातां असंख्य संतमंडळी । भगवान ज्याचे हृदयकमळिं । घेतां वाचे नामावळि । जाय समूळिं पातक पै ॥ ४१ ॥ नामस्मरणें गजर होत । दिंड्या पताका त्या झळकत । वामनस्वामि आनंदग्रस्त । करित नृत्य तयामाजी ॥ ४२ ॥ जवळ पाहुनी श्रीपंढरी । प्रेम दाटलें सकळांसि भारी । देहमान कैचें शरीरीं । गर्जे वैखरि हरिनामें ॥ ४३ ॥ सकाळीं

आउनि राउळांत । घातिले साष्टांग प्रणिपात । अष्टौ भाव दाटले चित्त । भजन होत स्वानंदें ॥४४॥ निजभक्त देखोनि दृष्टिं । प्रेमें महिवरळा अगजेठि । वामनस्वामिसि घातली मिठी । धरिले पोटिं पांडुरंगें ॥ ४५ ॥ म्हणती माझ्या स्नेहाळा । अंबऋषि लडिवाळा । वामन नामे जन्मोनी मला । पंढरीसी आला भेटावया ॥ ४६ ॥ तरी माझें वामनपण । तुझे हृदयीं राहो जाण । जगदोद्धार करूनी पूर्ण । शुद्धात्मज्ञान प्रगट करी ॥ ४७ ॥ ऐशापरी अनेकयुक्ति । वर देतसे स्वये श्रीपति । ग्रंथी लिहितां न पुरे मति । गजर संतीं पै केला ॥ ४८ ॥ मग यथा सांग यात्रा करून । कृष्णातीरासी निघाले वामन । संगे ज्यांचे रुक्मिणीरमण । राहीला पूर्ण सतत पै ॥ ४९ ॥ उपदेशमाला अभंग पर । ग्रंथ करविले जगदोद्धार । महादेव शिष्यें लिहुनी त्वरें । प्रगटविले सार भूमंडळीं ॥ ५० ॥ भागवताचा नित्यनेम । प्रत्यही वाचिती धरुनी प्रेम । पठणकाळीं मेघःशाम । प्रगटे राम प्रत्यक्ष तेथें ॥ ५१॥ शंख चक्र पीतांबरधारी । श्रवणासी बैसे मधुकैठभारी । जे जे भाविक नरनारी । तयासी हरि दृष्टिसी पडे ॥ ५२ ॥ इतर जनासी पाउलांची मुद्रा । अवलोकन घडे सदा नेत्रा । ऐशा परी मोक्षसत्रा । घातिले स्वतंत्रा श्रीवामनें ॥ ५३ ॥ स्वात्मधर्म स्थापोनि बरवा । उद्धरीले बहुत जीवा । निरसोनीया द्वैतभावा । वासुदेवा भजती पै ॥ ५४ ॥ निगडीचाफळपरळीसी जाऊन । श्रीरघुपतींचें घेतलें दर्शन । तेथुनी पुढें केलें प्रयाण । देखिला हनुमान जरंड्यावरी ॥ ५५ ॥ सप्तदिवस करुनि वास । गेले वामन वाईक्षेत्रास । ब्राह्मण येउनी दर्शनास । आदरविशेष केला पै ॥ ५६ ॥ नंतर रिघोनी सहजस्थिती । वामनमहाराज चालिले जगतीं । पश्चमपंथ धरिला प्रिती । जाती निश्चिती माहाबळेश्वरा ॥५७॥ श्रीकृष्णेचा उगम जेथें । मार्ग धरिला तो भगवद्भक्तें । अनुक्रमें विलोकित । ग्रामें लागत वाटेसी तीं ॥५८॥ तव पुढे गुरुघर म्हणुनी । ग्रामासी नाम सांगता जनीं । विचित्र केली वामनें करणी । ते करणी ऐकोत सारे ॥ ५९ ॥ म्हणती गुरुघर सापडावयासाठीं । नाना तपें भजन राहाटी ।

नग्न मौनी जाहाले हटी । हिंडती सृष्टी कितेक ते ॥ ६० ॥ स्त्रिया-पुत्र टाकुनी उदास । कोणी करिती वनवास । अन्न त्यजुनी उपवास । घेती संन्यास कितेक पै ॥ ६१ ॥ सांडुनी राज्य सकळ संपत्ति । गुरुघर पुसत जगीं धुंडिती । ते आजी मज प्राप्त निश्चिती । ऐसें प्रिती वामन बोले ॥ ६२ ॥ तरी आतां गुरुघर टाकुन । सहसा पुढें न करी गमन । ऐसे वदुनी घातलें आसन । करुनीं स्नान वरी बैसले ॥ ६३ ॥ द्वादश टिळे मुद्रा रेखुनीं । आज्ञापिले शिष्यासि वचनीं । नित्यापरी पडदा लाउनी । उपकर्णीं देवार्चन मांड ॥ ६४ ॥ आज्ञा वंदोनि महादेव शीष्या । साहित्य सकळ केलें असे । आपण गेला गांवांत भीक्षेस । नैवेद्यास पदार्थ आणावया ॥६५॥ पुन्हा येउनी त्वरित जवळी । अश्वत्थवृक्षासी अडकी-विली झोळी । सहाघटिका नित्यकाळीं । येकांत मेळीं वामन बैसती ॥६६॥ सहस्रदळिं होउनी स्थिर । सेवन करिती मकरंद थोर । मागुती येउनी देह्यावर । विचरती सर्वत्र धर्माते ॥ ६७ ॥ ऐसा सर्वदा नित्यपाठ । तये दिवसीं अपूर्व गोष्ट । इंद्रिया देउनी दृढ कपाट । मिळाले स्पष्ट ब्रह्मपदीं ॥ ६८ ॥ सप्तमचक्रीं गुरुस्थान । ग्रामासी ते चि त्या नामाभिधान । जाणुनी स्थळ पुण्यपावन । योग निर्वाण साधिला पै ॥ ६९ ॥ घंटा वाजती घणघणा । विमानें दाटलीं तेव्हां गगना । सुरवर वर्षती सुमना । धन्य वामना ह्मणती पै ॥ ७० ॥ नारद तुंबर करिती नृत्य । अप्सरा त्या गाणीं गात । वैकुंठासी आले भगवद्भक्त । धन्य होत दिन तों चि ॥ ७१ ॥ असो इकडे कैसी कथा । जाहाली ते ऐकीजे तत्वता । महादेव शिष्य जवळी असतां । तयासी वार्ता न कळे ती ॥ ७२ ॥ नित्यापरी घालुनी आसन । वामन बैसले पडद्या जाऊन । सहा घटिकेचा नेम पूर्ण । समाधी विसर्जन मग करिती ॥ ७३ ॥ दाहा घटिका तये दिवसीं । होता चैन न पडे शिष्यासी । दीर्घस्वरें सद्गुरूसी । प्रार्थनेसी आरंभिले ॥ ७४ ॥ अटाहास्यें मारिती हाका । प्रतिशब्द नये चि देखा । उघडिला तेव्हा पडदा निका । सोडुनी शंका मनाची ॥ ७५ ॥ अवलोकितां जवळ जाऊन । तव

जडदेह विसर्जिला श्रीवामनें । महादेवशिष्य घाबरा होऊन । करी रुदन ते काळीं ॥ ७६ ॥ सावरितां जाहाला शोक । उत्तरविधान करणें अवश्यक । तो अग्निहोत्र असे वामनासी देख । अग्नि लौकिक कामा नये ॥ ७७ ॥ याळागी शिष्यें त्या क्षेत्रासी जाऊन । सांगितलें द्विजा वर्तमान । मिळाले समस्त विद्वज्जन । निघाले दहन करावया ॥ ७८ ॥ इकडे श्री वैकुंठपति । भक्तवत्छळ दाशरथी । ब्राह्मणवेश धरूनी प्रिती । आले जगती तया स्थाना ॥ ७९ ॥ यथासांग सकळ साहित्य । निर्माण केलें तेथे चि त्वरित । उत्तरविधी करुनी यथोक्त । जाहाले गुप्त तात्काळ ॥ ८० ॥ च्यार घटिका जाहाल्यावर । वाईक्षेत्रांतून आले द्विजवर । तो शिष्यासहित पाहातां नेत्र । देखिले विचित्र सर्वांनीं ॥ ८१ ॥ जाहाला विधी पाहून । आश्चिर्य करिती सर्वत्र जन । म्हणति कोठील ब्राह्मण । केलें दहन कोणी पै ॥ ८२ ॥ ग्रामस्त होते जन जे सकळ । वदती मग तुह्मी च आला केवळ । ऐसे ऐकुनी चाकाटले । विस्मीत जाहाले मनामाजीं ॥ ८३ ॥ अनुताप होउनी तया द्विजा । लागले सर्व आत्मकाजा । आराधुनी गरुडध्वजा । ॐकारबीजा पावले ते ॥ ८४ ॥ असो तये गुरुवरग्रामीं । समाधी रचिली तये भूमी । वृंदावन करुनी सप्रेमीं । भजती नेमीं शिष्य तया ॥ ८५ ॥ पूजाविधी प्रदक्षणा । स्तुती स्तोत्रें गर्जेती नाना । इप्सीत पुरती सकळकामना । सुरवर दर्शना नित्य येती ॥ ८६ ॥ पादुका श्रीवामनस्वामीच्या । रेटरेकरशिष्यासी दिधल्या साच्या । पाट भागवत ठेवावयाचा । केला तयाचा विच्यार ऐका ॥ ८७ ॥ स्थापिली मूर्ति जी श्रीवामनें । कोरेगावीं श्रीनारायण । तयासन्निध वृंदावन । निक्षेपिला नेहून पाट तेथें ॥ ८८ ॥ ऐसे अनेक सांगता प्रकार । आज्ञेप्रमाणें विचरती सारे । सांप्रदाई वैष्णववीर । जन्मांतर धन्य तयांचें ॥ ८९ ॥ वामनस्वामीचा प्रसाद ज्यासी । च्यारी मुक्ति तयाच्या दासी । सदा जवळी ऋषिकेशी । अहर्निशी तिष्टतसे ॥ ९० ॥ अनुभूति ग्रंथ विशेष । उपदेश क्रम तेथें असे । श्रीवामनें वर्णिला असे । वाचितां

दोष पळती पै ॥ ९१ ॥ जे जे जयाची कामना । ते ते पुरवी पंढरीराणा । जे कां भजती संत वामना । ते वामना आवडति बहु ॥ ९२ ॥ यथामति जाहालें स्फुरण । संक्षेपें केलें तें तें कथन । असंख्य लीळा वामन पूर्ण । सहस्रवदनें न वर्णवे ॥ ९३ ॥ प्रताप अगळा सिद्धकृपेचा । म्हणुनी वदे हे जडवाच्या । राजारामीं प्रसाद मुळीचा । लडीवाळ संताचा म्हणवीतसे ॥ ९४ ॥ येथुनी पुढे कविकाळचैतन्याची । लीळा वर्णिली अपूर्व साची । श्रवणपठणें कामना मनाची । पुरवी नेमाची गुरुमाये ॥ ९५ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । वामनस्वामीचरित्राते । अध्याय समाप्त तृतीय हा ॥ ९६ ॥ आध्याय ॥ ३ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय येकेच्याळिसावा ॥



## अध्याय ४२

### —काळोबा ऊर्फ कविकाळ चैतन्य—

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु श्रीसिद्धेश्वरा । आदिपुरुषा रामचंद्रा । पंढरीनिवासा भक्तविहारा । परात्परा श्रीमूर्ति ॥ १ ॥ वर्णू जातां तुझें ध्यान । वाच्या पावती जेथें मौन । तर्क गळित होतसे जाण । जेवि लवण उदकीं विरे ॥ २ ॥ अंतरबाह्य स्वामिया अससी । व्यापकता जेवि आकाशीं । मितूपणा नुरे समरसी । सर्वत्र सरसि निज आत्मता ॥ ३ ॥ याळागी देवा सर्वोत्तमा । मागणें हें चि तव पादपद्मा । देउनिया निजप्रेमा । पुरवी कामा सकळिक ॥ ४ ॥ भक्तिरहस्य अलौलिक । ते चि आवडे सदा देख । ईछितसे भजन चोख । निष्कळंक गुण गावया ॥ ५ ॥ जन्मोजन्मीं म्हणावितों दास । पुरविसी ळळा जगन्निवास । मायबाप तूं सर्वेश । धरीली कास निजप्रिती ॥ ६ ॥ संतकथा वर्णावया । योजिले तुह्मी रामराया । तरी अखंडित राहुनी ह्रदया । वदवी सखया साधुस्तुति ॥ ७ ॥ कविकाळचैतन्य भक्तशिरोमणी । अवतरलासे जो का मेदिनी । तयाची लीळा

प्रसवे वाणी । चक्रपाणी करी ऐसें ॥ ८ ॥ प्रार्थना परिसोनी रघुकुळ भूषण । बोलवितसे संतगुण । श्रोतियें देउनी अवधान । करा श्रवण निजप्रिती ॥ ९ ॥ उत्पतिस्थितिप्रळय । जिया स्वरुपीं होतसे पाहे । ते अधिष्टान काळचैतन्य । पूर्ण अद्वय गुरुनाथ ॥ १० ॥ जेथुनि चराचर विश्वसकळ । आदिपुरुष निजनिश्चळ । भजनसुख भोगणें केवळ । ह्मणुनी जन्मले भूठाईं ॥ ११ ॥ नातरी तें चैतन्य । जेथील तेथें ठाईं स्वयें । परी जगदोद्धार कराया कार्य । मानवी होय निजलीले ॥ १२ ॥ भारद्वाजगोत्रीं ऋग्वेदी ब्राह्मण । अवतरले तेथें कविकाळ-चैतन्य । उत्पन्नकाळीं जया ज्ञान । करी चिंतन स्वरूपाचें ॥ १३ ॥ जेवि हस्तमळक स्वतसिद्ध । मूर्तिमंत निजबोध । आच्यार्यासी तोषविले शुद्ध । आत्मविनोद निजलीले ॥ १४ ॥ तैसा स्वामीकविकाळ । अद्वयरूप प्रांजळ । भोगावया भक्ति सोहळा । देह्य धरिले जगरिती ॥ १५ ॥ रात्रदिवस निज वैखरी । श्रीरामनाम उच्यारी । निद्रा नाहीं ज्या शरीरीं । निमग्न विच्यारीं सर्वदा ॥ १६ ॥ गुरुविण सार्थक नाहीं । वेदशास्त्रीं ही नवाई । यालागी विचरे मही । अनुताप हृदईं धरुनी ॥ १७ ॥ गीरिकंदरी अटव्यवनें । बहुत फिरला तो ब्राह्मण । तव अकस्मात कीर्ति ऐकिली जाण । उल्हासचैतन्यस्वामीची ॥ १८ ॥ स्वईच्छा हिंडत दक्षणमानस । आले तायवड्याकिल्यास । तो उदेला पुण्यचंद्रांश । देखिले उल्हास निजदृष्टी ॥ १९ ॥ मग तो उल्हास कीती ह्मणावा । जेथें ऐक्य जीवाशीवा । दरिद्रीयासी सापडे ठेवा । गुरु-देवा तेवि पाहिले ॥ २० ॥ कीं मृतासी आला प्राण । निर्वंशा जालें संतान । कीं अंधासी लाधले नैन । मिळाले पक्वान्न दुष्काळीं ॥ २१ ॥ कीं पंढरीसी पावला नामनिष्ट । कर्मठें पाहिली गया स्पष्ट । नातरी भानु होतां प्रगट । कमळणी दाट विकासती ॥ २२ ॥ तेवि उल्हासदर्शनें । कविकाळ भक्तासि जाले जाण । अष्टभाव प्राप्त होऊन । केले नमन साष्टांगें ॥ २३ ॥ प्रेमभरें स्फुंदत । नेत्राश्रूनें चरण क्षाळित । जोडोनिया दोनी हात । प्रार्थना करीत मायें ॥ २४ ॥ ह्मणे स्वामिया पदरीं घ्यावें । मज

दीनातें उद्धरावें । निजभक्ति दास्य द्यावें । निरसन करावें देहबुद्धि ॥ २५ ॥ माजि मज करुनि भेटी । अंतरबाह्य उघडा दृष्टि । स्वानंदबीज उघडुनी दृष्टी । मारिजे मुष्टि अभिमान ॥ २६ ॥ ऐसी करितां विज्ञप्ति । उल्हासचैतन्या हरुष चित्तीं । आलिंगन देऊन शिष्याप्रति । बैसविले निगुति सन्मुख पै ॥ २७ ॥ सांप्रदायक्रमे करून । अनुग्रह केला तात्काळ जाण । श्रवणीं पडतां मंत्र पूर्ण । गेला भान ते चि क्षणीं ॥ २८ ॥ मग ती दशा कोण वर्णी । जेथें थकिली वेदवाणी । तें स्वरूप प्रगटलें नैनीं । उघडला खाणी चित्सुखाचि ॥ २९ ॥ येकदेशी देणें उपमा । गुरुकृपेचा अगाध महिमा । चतुर्मुखाचा जरी ब्रंह्मा । धरी प्रेमा मौनत्वें ॥ ३० ॥ कविकाळ चैतन्याप्रती । प्राप्त जाली आत्मस्थिती । श्रीगुरुचरणीं रंगली वृत्ति । दास्य करिती प्रीतीनें ॥ ३१ ॥ रात्रंदिवस सेवे ठाईं । वय वेचिले असे पाही । उपमा द्यावया दुसरीं नाहीं । विस्मित ठाईं सरस्वती ॥ ३२ ॥ जें जें उल्हास चैतन्यें म्हणावें । तें तें आवडीनें करावें । धन्य सतशिष्य वदती सर्व । महादेव इत्यादि ॥ ३३ ॥ मग कांहीं कालानंतर । आज्ञा करिती श्रीगुरुवर । हिंडुनिया महीवर । जगदोद्धार करावा ॥ ३४ ॥ वंदुनी सद्गुरुवचनाते । आले जरंड्यावरी कविकाळ संत । तेथें पाहुनी श्रीहनुमंत । रमलें चित्त सहजी तें ॥ ३५ ॥ पाला भक्षुनी द्वादशवर्षें । केले मंत्रपुरश्चरणास । दर्शन दिधलें अयोध्यानिवासें । मारुतिशेषसहित पै ॥ ३६ ॥ आलिंगन देउनी कविकाळभक्ता । वरदहस्त ठेविला माथा । ह्मणती जना लावी पंथा । देउनी अनाथा भक्ति स्वयें ॥ ३७ ॥ भोगून आपुले स्वानंदसुख । दवडी जनाचे अज्ञान दुःख । वाढवुनी भजन देख । निरसे कळंक जीवचंद्राचा ॥ ३८ ॥ इयापरी रविकुळदीप । बोधिले स्वयें वैकुंठाधिपें । कविकाळ संतोष पडपे । लाधले कृपें श्रीहरीचे ॥ ३९ ॥ करुनी अर्चन यथाविधी । नमस्कारिला दयानिधी । अंतरधानपावन ते चि संधि । जो का पायंश्चि-वसणार ॥ ४० ॥ पुढें ऐसेपरी नित्यनेम । कविकाळासी भेटती

मेघःशाम । सर्वोत्तमीं ज्याचें प्रेम । भाग्य परम तें पाही ॥ ४१ ॥ तव तेथें अकस्मात । बैरागी पातले बहुत । मारुतीचें दर्शनार्थ । आले फिरत जरंड्यावरी ॥ ४२ ॥ संगम कृष्णा वेण्येचा । जरंडापर्वत आहे साचा । तेथें हनुमान सत्याचा । हरी जीवाचा ताप सकळ ॥४३॥ तये स्थानीं ते बैरागी । येउनी नमिला बजरंग वेगीं । तेथें पाहाता जवळ योगी । कविकाळ जगीं साधु तो ॥ ४४ ॥ नमस्कारुनी सर्वत्रानीं । सुचविती आह्मी क्षुधिस्त ह्मणुनी । तये काळीं चापपाणी । आठविला मनीं भक्तवछळ ॥ ४५ ॥ कुंड संन्निध दाखविलें । कणीक दाळिनें तात्काळ भरले । बैराग्याते सांगितलें । घ्यावे आपुले भोजनासी ॥ ४६ ॥ जयाची क्षुधा असेल जितुकी । दाळ कणीक घ्यावी तितुकी । पर्वताखाली गंगातटकी । पाक सुखीं करणें तो ॥ ४७ ॥ ऐशा प्रकारें आज्ञा करून । आपण बैसले ध्यानस्थ जाण । इकडे बैरागी समस्त मिळोन । सिधा संपूर्ण घेती ते ॥ ४८ ॥ लोभग्रस्त कलींत प्राणी । सांगितला नेम सांडिला मनीं । कणीकदाळ बहुत घेउनी । मोटा बांधुनी नेहती ते ॥ ४९ ॥ पर्वताखालीं जाउनी पाहाता । शिधा ज्याचा त्याज पुरता । मग आश्चिर्य करुनी चिता । पावले तत्वता अनुताप ॥५०॥ परस्परें वदति सारे । धिःग आमुचा आच्यार विच्यार । पुन्हा मागुती चढोनी डोंगर । वंदिला योगेंद्र कविकाळ ॥५१॥ शरण येउनी जोडिले हात । सांगितला जाला वृत्तांत । म्हणती आम्हासी करा सनाथ । ग्रासिलें चित लोभानें ॥ ५२ ॥ व्यर्थ चि धरिला बैरागीवेश । नाहीं आंगीं वैराग्यलेश । अनन्यभावें प्रार्थितां ऐसें । द्रवले योगेश कृपेनें ॥ ५३ ॥ तात्काळ करुनी स्वरुपोन्मुख । दिधले अखंड स्वानंदसुख । देहबुद्धि निरसुनी दुःख । निजबोधार्क प्रगटविला ॥ ५४ ॥ गौरउनी बैरागीयाते । भोजना घालुनी सर्वांतें । धन्य महाराज कविकाळसंत । केले कृतार्थ निजलीले ॥ ५५ ॥ मग आज्ञा घेउनी ते उदासी । गेले सकळ तीर्थासी । आपण राहिले जरंड्यासी । योगविलासी काळोबा ॥ ५६ ॥ नित्यनेम भजनपूजन ।

प्रत्यही करिती स्वयें कीर्तन । भूतमात्रीं दयाघन समान । अन्नदान करणें तें ॥ ५७ ॥ असो ऐसा काल क्रमोनी । संच्यार कराया निघाले अवनी । स्वामिसमर्थ कविकाळमुनि । हिंडती जनीं स्वईछा ॥ ५८ ॥ क्षेत्रें शहरें ग्रामें नगर । तेथें करिती जीवोद्धार । उपदेश करुनी नारी-नर । वर्तती स्वतंत्र निर्द्वंद ॥ ५९ ॥ नाही मानाची अपेक्षा । देती सहजी स्वात्मदीक्षा । निर्वाह करिती करुनी भिक्षा । श्रीकमलाक्षा आठउनी ॥ ६० ॥ स्नेहपाश न पडतां उर्वी । भ्रमण करिती कविकाळ-गोसावी । धर्मप्रकाशक उगवला रवि । भक्ति लावी सकळीका ॥ ६१ ॥ नाही पुजेची कांहीं चाड । जिव्हेसी कैचें कडु गोड । विरक्त विषई मानस दृढ । निसीम आवड गुरुभजनीं ॥ ६२ ॥ ऐशापरी निरंतर वृत । आले पंढरीक्षेत्रांत । आनंदले रुक्मिणीकांत । आणी क्षेत्रस्थ संतवृंदें ॥ ६३ ॥ पादुकाजवळी येतां कविकाळ । सामोरे पातले घननीळ । भजनकडाका-ध्वनी प्रबळ । मिळाले सकळ वैष्णवजन ॥ ६४ ॥ विणे पताका झल्लारी मृदुंग । टाळ चिपळ्या वाजती सांग । अद्भुत माजला जेथें रंग । पाहाती अंगें देव गगनीं ॥ ६५ ॥ स्वानंदप्रेमें भजन करीत । आले राउळा देवभक्त । रंगशिळेवरी गजर होत । तया सुखाते कोण वर्णी ॥ ६६ ॥ विटेवरी पाहतां ध्यान । भावे वंदिले समचरण । कवि-काळसंतासी आलिंगन । श्रीभगवान देत पै ॥ ६७ ॥ येकात्मता मिळता मिळणी । प्राप्त जाहाली सहज उन्मनी । प्रेमाश्रु गळति नैनीं । दाटले मनीं अष्टभाव ॥ ६८ ॥ भक्तमनोहर घनःशाम । कुरवाळिले निजप्रेम । बिऱ्हाड देउनी आवडी परम । ठेउनी संभ्रम घेतले पै ॥ ६९ ॥ राहुनी सहजी चारमास । कीर्तनीं तोषविला रुक्मिणी-विलास । संतोषोनी पंढरीनिवास । कविकाळास सांगतसे ॥ ७० ॥ मी पुंडरीकासी देउनी वर । उभा राहिलों विटेवर । कराया जगदोद्धार । भीमातीर वसविले ॥ ७१ ॥ तरी हें कार्य करणें तुह्माला । सिध्धीसी लावणे ममव्रताला । भ्रमण करूनि भूमंडळा । प्राणीयाला उध्दरावे ॥ ७२ ॥ आत्मरंग माझे सखे । रामदासादि फिरती देख । स्थापावया

अवस्यक । धर्म चोख अविनाश ॥ ७३ ॥ यालागीं तूं कविकाळ साधावा । भक्तिसी लावावे जडजीव । तीर्थाचे मिसे करूनि बरवा । हिंडुनि सर्वा सुख देई ॥ ७४ ॥ वारंवार येउनी पंढरी । भेट द्यावी झडकरी । ऐसें सांगतां श्रीमुरारी । नमिली सारी संतसभा ॥ ७५ ॥ वंदन करूनी समचरण । गाढ दिधले आलींगन । येकात्मता मूळींची पूर्ण । नाहीं भिन्न देव साधु ॥ ७६ ॥ पुढील अध्याई कविकाळवैष्णव । काशीक्षेत्रासी जाती स्वभावे । ज्याचेसंगे देवाधिदेव । रमाधव भक्तसखा ॥ ७७ ॥ सद्गुरु सिद्धेशकृपेनें । होतसे सहजीं संतस्तवन । राजारामीं रमलें मन । धन्य चरण श्रीस्वामीचे ॥ ७८ ॥ मंदमती दीन अनाथ । परी दयाळु संत समर्थ । मस्तकीं ठेउनी वरदस्तक । केले सनाथ निज-दृष्टी ॥ ७९ ॥ अवतार श्रीरामदासाचा । तो महाराजस्वामी आमुचा । होतसे ग्रंथ आज्ञोक्तीचा । विशेष तयाचा प्रताप पै ॥ ८० ॥ कवि-काळचैतन्य आख्यानाते । प्रथमोध्याय जाला त्याते । पुढे अवधान द्यावें श्रोते । कथा अद्भुत रसाळ पै ॥ ८१ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणे चि पुरती मनोरथ । पठणीं पुण्य घडे अद्भुत । जाहला सकृत अध्याय हा ॥ ८२ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय बेच्याळिसावा ॥ ४२ ॥



## अध्याय ४३

### —काळोबा ऊर्फ कविकाळ चैतन्य—

(पुढें चालू)

॥ श्रीगणेशायनमः ॥ जयजया श्रीसिद्धनाथा । भक्तवत्छळा सीताकांता । भरथशत्रुघ्नलक्ष्मणभ्राता । सहित हनुमंता नमियेले ॥ १ ॥ अठरापद्मे वान्नर । अमरांचे ते अवतार । सेना तयाची अपार । नमस्कार सर्वांसी ॥ २ ॥ ते चि पुढे श्रीकृष्णाजवळ । खेळ खेळती गोपाळ । कळिमाजी भक्त सकळ । ते चि जाहाले वैष्णववीर ॥ ३ ॥ असंख्य

संत असंख्यलीला । मही न पुरे ल्याहावयाला । शेषादिकासी विस्मय जाहाला । इतराला कोण गती ॥ ४ ॥ परि सद्गुरु श्रीहनुमंत । अवतार रामदास सिद्धनाथ । प्रगट होउनी हृदयांत । करविती ग्रंथ कृपाबळें ॥ ५ ॥ कविकाळचैतन्य याचे गुण । सिद्ध दयेनें करितो कथन । श्रोतिये देउनी अवधान । करावे श्रवण निजप्रीती ॥ ६ ॥ पूर्वाध्याई पंढरीस । कविकाळ आले यात्रेस । भेटि होता देवभक्तास । आनंद विशेष जाहाला तो ॥ ७ ॥ कीर्तनीं तोषिला इंदिरावर । कविकाळमाथा ठेविला कर । करावया जगदोद्धार । शिवप्रियकरें आज्ञापिले ॥ ८ ॥ तीर्थावळीचे करुनी निमित्य । पावन करावें सर्वजनातें । ऐसे सांगता रुक्मीणिकांत । पंढरीनाथ नमस्कारिला ॥९॥ उल्हासचैतन्य श्रीगुरुचे । ध्यान करूनी हृदई साचें । नामोच्चार करितां वाचे । निघाले क्षेत्राचे बाहिर पै ॥ १० ॥ संगे ज्याचे श्रीपांडुरंग । भक्तप्रियकर रमारंग । भजनकडाका अद्भुत रंग । ह्मणती अभंग प्रेमळ पै ॥ ११ ॥ ठाई ठाई तीर्थं करीत । गेले श्रीकाशीक्षेत्रांत । आनंद जाहाला विश्वेश्वराते । आले क्षेत्रस्थ सामोरे ॥ १२ ॥ हरिहराची जेथें ऐक्यता । लेखन न करवे ते सुख तत्वता । मना फावे तादात्म्यता । उन्मनी अवस्था वरीतसे ॥ १३ ॥ बळें चि तुर्येचे येउनी घरा । लीहितसे ग्रंथ सारा । जाणती संत आत्मविच्यारा । बहिर्मुख नरा न कळे ते ॥ १४ ॥ आसो यात्रा करुनी सांग । रामेश्वरासी निघाले कविकाळ आंगें । कावडींत भरुनी गंगा सांग । तिष्टे श्रीरंग मागें पुढें ॥ १५ ॥ मार्गीं जना उद्धरीत । देखियेले स्वेतबंधातें । पुज्या करुनी यथोक्त । वाळुकेते घेतले पै ॥ १६ ॥ पुन्हा भागीरथींत टाकून वाळु । येती यात्रेसी आणिक दयाळू । ऐशा प्रकारें तीन वेळु । कविकाळु काशीस गेले ॥ १७ ॥ चवथे वेळेसी यात्रेसी जातां । अपूर्व वर्तली सुंदर कथा । ते कथा श्रवण करिता । जाय सर्वथा ताप त्रिविध ॥ १८ ॥ कर्नाटकांत नवलगुंद नरगुंद । ग्राम आहे थोर प्रसिद्ध । तेथें आले कविकाळ सिद्ध । पातले विविधजन दर्शना ॥१९॥

संत असंख्यलीला । मही न पुरे ल्याहावयाला । शेषादिकासी विस्मय जाहाला । इतराला कोण गती ॥ ४ ॥ परि सद्गुरु श्रीहनुमंत । अवतार रामदास सिद्धनाथ । प्रगट होउनी हृदयांत । करविती ग्रंथ कृपाबळें ॥ ५ ॥ कविकाळचैतन्य याचे गुण । सिद्ध दयेनें करितो कथन । श्रोतिये देउनी अवधान । करावे श्रवण निजप्रीती ॥ ६ ॥ पूर्वाध्याई पंढरीस । कविकाळ आले यात्रेस । भेटि होता देवभक्तास । आनंद विशेष जाहाला तो ॥ ७ ॥ कीर्तनीं तोषिला इंदिरावर । कविकाळमाथा ठेविला कर । करावया जगदोद्धार । शिवप्रियकरें आज्ञापिले ॥ ८ ॥ तीर्थावळीचे करुनी निमित्य । पावन करावें सर्वजनातें । ऐसे सांगता रुक्मीणिकांत । पंढरीनाथ नमस्कारिला ॥९॥ उल्हासचैतन्य श्रीगुरुचे । ध्यान करूनी हृदई साचें । नामोच्चार करितां वाचे । निघाले क्षेत्राचे बाहिर पै ॥ १० ॥ संगे ज्याचे श्रीपांडुरंग । भक्तप्रियकर रमारंग । भजनकडाका अद्भुत रंग । ह्मणती अभंग प्रेमळ पै ॥ ११ ॥ ठाई ठाई तीर्थें करीत । गेले श्रीकाशीक्षेत्रांत । आनंद जाहाला विश्वेश्वरातें । आले क्षेत्रस्थ सामोरे ॥ १२ ॥ हरिहराची जेथें ऐक्यता । लेखन न करवे ते सुख तत्वता । मना फावे तादात्म्यता । उन्मनी अवस्था वरीतसे ॥ १३ ॥ बळें चि तुर्येचे येउनी घरा । लीहितसे ग्रंथ सारा । जाणती संत आत्मविच्यारा । बहिर्मुख नरा न कळे ते ॥ १४ ॥ आसो यात्रा करुनी सांग । रामेश्वरासी निघाले कविकाळ आंगें । कावडींत भरुनी गंगा सांग । तिष्ठे श्रीरंग मागें पुढें ॥ १५ ॥ मार्गीं जना उद्धरीत । देखियेले स्वेतबंधातें । पुज्या करुनी यथोक्त । वाळुकेते घेतले पै ॥ १६ ॥ पुन्हा भागीरथींत टाकून वाळु । येती यात्रेसी आणिक दयाळू । ऐशा प्रकारें तीन वेळु । कविकाळु काशीस गेले ॥ १७ ॥ चवथे वेळेसी यात्रेसी जातां । अपूर्व वर्तली सुंदर कथा । ते कथा श्रवण करिता । जाय सर्वथा ताप त्रिविध ॥ १८ ॥ कर्नाटकांत नवलगुंद नरगुंद । ग्राम आहे थोर प्रसिद्ध । तेथें आले कविकाळ सिद्ध । पातले विविधजन दर्शना ॥१९॥

परापेक्षावेऽहार ज्याचा । नाहीं अग्रह कदा साचा । नामस्मरणीं रंगली वाचा । आत्मज्ञानाचा कळस तो ॥ ३६ ॥ तयाची निंदा ब्राह्मण । नरगुंदांत करिती मिळोन । ह्मणति साधुत्व कैचें जाण । भक्षिति वोदनशर्करा ॥३७॥ संतासी नसे वस्त्र कांहीं । अन्नोदक घेउं नये ते हि । ज्ञानगंगा तया ठाई । गृहादि सोही नसावी ॥ ३८ ॥ कविकाळद्विज कैचा संत । सेवन करिती शर्कराघृत । प्राशन करावे शिसें निश्चित । तरि सत्य साधुत्व पै ॥ ३९ ॥ विष अमृत समान ज्यासी । तेचि संत निश्चयेसी । शरीरलोभ कासयासी । साधुजनासी नसावा ॥ ४० ॥ जरि सवाशेर शिसे कढउनि प्यावें । तरि कविकाळयोगी ह्मणवावे । नातरि येथुनि निघोनी जावें । भोंदिला गांव उगाचि पै ॥ ४१ ॥ ऐशा वल्गना बहुतापरी । करिती ब्राह्मण गावकरी । कविकाळगोसावी समजले अंतरी । समर्थ त्रिपुरारि तैसे ते ॥ ४२ ॥ रुद्र अवतार कविकाळ । ज्याचें स्मरणें मृत्यु पळे । हात जोडुनी माहाकाळ । तिष्टे जवळ शेवकापरी ॥ ४३ ॥ अष्टमासिद्धि लोळति पाई । मोक्ष द्वार झाडितो पाहि । ज्याचा सखा जनकजावाई । तया काई आगाध कृति ॥ ४४ ॥ तात्काळ कढई सांडस आणून । सवाशेर शिसे कढविले पूर्ण । श्रीगुरुचें स्मरण करून । केलें प्राशन ततक्षणीं ॥ ४५ ॥ येकांतीं गुंफेत जाउनी स्वस्थ । निद्रा केली कविकाळ संतें । निर्विकल्प समाधि ते । उन्मनी ते वरिली पै ॥ ४६ ॥ ईकडे सद्भक्त जितुके प्राणी । घाबरे जाहाले तितुके मिळोनि । निंबाळकर ह्मराटे यांनीं । छळक नेहुनी बैसविले ॥ ४७ ॥ ह्मणति जैसि कविकाळाचि । तैसी गति तुह्मा सर्वांचि । ऐसी वार्ता ऐकुनी द्विजाचि । ग्रामस्ताची मने भ्रमलि ॥ ४८ ॥ येकाचि आकांत उसळला । पश्चात्ताप छळकासि जाला । स्त्रियापुरुषमिळोनि मेळा । ह्मगति गोपाळा रक्षि आता ॥ ४९ ॥ तव अग्निसारिखे जाळे शरीर । समाधिस्त श्रीगुरुवर । भरता समग्र दोन प्रहर । देहावर आले पै ॥ ५० ॥ निद्रिस्तापरि उठोन । वंदिले सकळ ब्राह्मण । ह्मणति आपुले आशीर्वादेकरुन । शिसे प्राशन केले पै ॥५१॥ निंबाळकरासि सांगुन । दिधले छळक सोडुन ।

ऐसे माहाराज कृपाघन । आवतार पूर्ण काळरुद्राचा ॥ ५२ ॥ समुद्र-
मथनकाळि । विष प्राशिले चंद्रमौळि । तो हा स्वामि भुतळि ।
आवतारमोळि कविकाळ ॥ ५३ ॥ मग तेथे पाहाणे काय । चमत्कार
अनेक पाहे । सर्वत्र जन वंदिति पाय । श्रीगुरुमाय धन्य ते ॥ ५४ ॥
छळकजन द्विज सारे । अनुतापे तापले अंतर । शरण येउनि जोडिति
कर । पसरीति पदर अनन्य ॥ ५५ ॥ ह्मणति अपराध क्षमा करावा ।
व्यर्थ बोलिलो तुह्मा साधवा । उपदेश देउनि आह्मा जीवा । वेगी
लावा शुद्धपंथा ॥ ५६ ॥ जन्मांतरीचे पापी थोर । घडले दोषाचे
डोंगर । तरि घेउनि कृपावज्र । गिरिवर हा चुर्ण करा ॥ ५७ ॥
कविकाळमानसी सदा शांति । तेथे कैची क्रोधत्पती । शरणभावे वदती
प्रीति । चित्सुख प्राप्ती केली तया ॥५८॥ ठेउनि मस्तकी वरदहस्त । उद्ध-
रिले छळक समस्त । नित्योछाहा भजन होत । ग्राम पुनित नरगुंद ते
॥५९॥ मग तेथुनि कांहीं काळ । निघाले संत कविकाळ । स्वइछा
फिरति भुमंडळ । पाहिलि सकळ देवतीर्थे ॥६०॥ पंढरीसि वारंवार । येत
असावे निर्धार । बहुत दिवस ऐसे विच्यार । वर्तती योगेंद्र स्वत-
सित्ध ॥ ६१ ॥ ठाई ठाई लाउनि भजन । नारिनर केले पावन ।
काळरुद्राचा अवतार पूर्ण । लिहिता महिमान अगाध ॥ ६२ ॥ तव
श्रोति प्रश्न केला । सांप्रदाय सांगा माला । कविकाळासि अनुग्रह केला
पंथ भला कोण त्याचा ॥ ६३ ॥ पुसता ऐसे श्रोति आदरे । वक्ता
वदे जोडुनि कर । यथामति कथितो विच्यार । ठाउक तंत्र आहे
ते ॥ ६४ ॥ आधि ब्रह्म निर्विकार । तेचि जाले साकार । येथुनि
स्फुरण निर्धार । सोहं साचार बिजरूप ॥ ६५ ॥ तया बीजापासुन
अंकुर । निघाले दोन जाण । येक आदिनाथ सदाशीव पूर्ण । श्रीनारायण
दुसरा पै ॥ ६६ ॥ तेथुन पंथ जगत्रई । सांप्रदाय दोन वर्तति पाहि ।
तेथुनि अनेक मठ जाले मही । आत्मसोई सकळिका ॥ ६७ ॥ आता
काविकाळ साधु निका । ऐका तयाचि मालिका । आदिनारायण प्रथम
देखा । चतुर्मुखा उपदेश त्याचा ॥ ६८ ॥ ब्रह्मयाचा अत्रिऋषि ।

उपदेशिले तेणे दत्तासि । दत्तात्रयाचा निश्चयेसि । शिवचैतन्यासि प्रसाद ॥ ६९ ॥ शिवदत्तचैतन्यापासुन । गोपाळचैतन्यासी आत्मज्ञान । अनुग्रह केला तयाने । परिपूर्ण आत्माराम ॥ ७० ॥ आत्मारामाचे शिष्य दोन । राघव चैतन्य कृष्णचैतन्य । आत्मज्योते ज्ञानघन । दोघे निपुण स्वयंज्योति ॥ ७१ ॥ त्या राघवाचि पूर्णस्थिति । केशवचैतंन्या जालि प्राप्ती । तयाचा शीष्य ज्ञानमूर्ति । बावाजी क्षिति विख्यात ॥ ७२ ॥ बाबाजीचा निजठेवा । तुकारामासि लाधला बरवा । उद्धरिले तेणे जीवा । अभंगोक्ति करुनि ॥ ७३ ॥ सांप्रदाई त्याचे बहुत । भुमंडळि चालिला पंथ । धन्य धन्य तुकयासंत । नमन सतत असो तया ॥ ७४ ॥ जे जे तुकारामसांप्रदाई । मस्तक सदा त्याचे पाई । परस्परे ऐक्य ह्रदई । रामदाससाई आणि तुकोबा ॥ ७५ ॥ तया गुरुवर्याजवळी मि पामर । पादुका धरुनि होतो किंकर । आणुनि मनि जन्मांतर । नमितो साचार निजप्रीति ॥ ७६ ॥ असो आता कृष्णचैतन्यापासुन । उपदेश जाला कोणालागुन । ते ऐका सविस्तर जाण । श्रोत्रजन सर्वत्र हो ॥ ७७ ॥ कृष्णाचैतन्याचा सत्‌शिष्य । तुळसिचैतन्य जाला विशेष । तयापासुन अद्वयास । जाला उपदेश निर्मळ तो ॥ ७८ ॥ अद्वयचैतन्याचा पुत्र समर्थ । उद्धवचिद्धन तो विख्यात । जेणे संतचरित्रे केलि बहुत । पंढरित समाधि ॥ ७९ ॥ प्रदक्षणेचे वाटेवरि । वृंदावन आहे निर्धारि । दर्शन घेति नरनारि । नमस्कारी ग्रंथी तया ॥ ८० ॥ ती साधुचरित्रे सकळ गाति । श्री विठल बहु प्रिति । धन्यवंश त्याचा निश्चिति । जे का करिति संतस्तवन ॥ ८१ ॥ त्या अद्वयचैतन्याचा शिष्य । नाम तयाचे जाणा उल्हास । त्याचा सखा रामदास । परळीसि वास दोघाचा ॥ ८२ ॥ तया अद्वयाचा पूर्ण प्रसाद । काविकाळासि चैतन्या प्रसाद । तें हे चरित्र परम शुद्ध । संस्थान सिद्ध उंडवडि ॥ ८३ ॥ तयाचि कृपा बाघोचैतन्यासि । तो सतशिष्य ज्ञानराशि । जन्मले जे तयावंशि । नमन तयासि साष्टांग ॥ ८४ ॥ सांप्रदाई गुरुभक्ताचे ।

ते सर्व जीवलग आमुचे । स्तवन करिता तयाचे । उद्धार वाचे होतसे पै ॥ ८५ ॥ पारंपरा कविकाळ साधुचि । यथामति कथिलि साचि । श्रवणपठणे हरे जीवाचि । दुरिताचि बाधा ते ॥ ८६ ॥ तये उत्सवहीत प्रतिवर्षि । उत्साहा होतसे नेमेसि । जे जे येतिल यात्रेसि । चमत्कार तयासि भाविका ॥ ८७ ॥ तेथील धुणींचि कविता रक्षा । तो आवडे श्रीकमलाक्षा । अज्ञानाचि जळे कांक्षा । मनि अपेक्षा ते सिद्ध ॥८८॥ सद्गुरु सिद्धकृपेकरून । कविकाळचरित्र जाले कथन । दोन अध्याय परिपूर्ण । पुढे अख्यान अंबरनाथाचे ॥ ८९ ॥ राजारामी रमविता । नमन तया सिद्धनाथा । अवघा तो चि श्रोतावक्ता । वदवि कथा संतस्थिति ॥ ९० ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । कविकाळसाधु अख्यानाते । अध्याय समाप्त दुसरा हा ॥ ९१ ॥ ॥ आध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय त्रेचाळिसावा ॥ ॥ संपूर्ण ॥ ४३ ॥



## अध्याय ४४

### —अंबरनाथ—

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय श्रीगुरुअनादिसिद्धा । स्वयंज्योति जगद्वंद्या । परात्परा पंचमवेदा । पुराणप्रसिद्धा भक्तवत्सळा ॥ १ ॥ मत्स्यादिक आवतार । धरिले तुवा रघुविरे । मुख्यकारण हेचि थोर । धर्म स्वतंत्र स्थापावया ॥ २ ॥ साधुचे करावे परित्राण । दुष्टदैत्यनिर्दाळण । दिनदयाळ दयाघन । संतजीवन सर्वेश ॥ ३ ॥ प्रथमयता भुठाई । वैकुंठ रचिले असे पाहि । पंढरिसी तु रामाबाई । समपाई उभी सदा ॥ ४ ॥ मध्यभागी ठेउनि हात । दावियेला निजसंकेत । भाविक राम सिताकांत । मौनोक्ते सांगीतले ॥ ५ ॥ यालागि मारुति सन्मुख पुढा । त्यामागे राहाणे गरुडा । निश्चय जाणुनि हाचि सुहाडा । रामदासा गाढा जवळि तो ॥ ६ ॥ राम अवतारानंतर जाण । कृष्ण

अवतार जाहाला पूर्ण । आलिकडे श्रीहनुमान । हात जोडुन खगेंद्र पाठि ॥ ७ ॥ आसो असे सुंदरराउळ । वानरांश नाचति गोपाळ । संतस्वरूप होउन सकळ । करिति निर्मळ भजन पै ॥ ८ ॥ तयामध्ये मुगुटमणी । रामदास अवतार सिद्ध जनि । हनुमंतस्वरुप पूर्णज्ञानि । प्रगटळे धरणी विश्वोत्धारा ॥ ९ ॥ तेणेस्वामिये चित्समुद्रा । मेळविले निजात्मभद्रा । उदय करुनि मनचंद्रा । संतनरेंद्रा स्तवविति ॥ १० ॥ ते लिळा अतिसुरस । श्रवणद्वारे प्राशन पियुष्य । अमर वांछिति भक्तिरस । दुर्लभ सर्वास साधु ते ॥ ११ ॥ याळागी आदरेंकरून । भक्तकथेसि देईजे मन । पावे सिद्धिसि कामना तेणे । जाय निघोन पातक पै ॥ १२ ॥ चवरंगीनाथाचा अवतार ।अंबरनाथ सिद्धथोर । आख्यान तयाचे अतिपवित्र । ऐका सर्वत्र नरनारी ॥ १३ ॥ स्वरूपांबरि निर्गुणस्थ । असता नाथजी निवांत । होउनि सहजी कायस्थ । भजनसुख इछियेले ॥१४॥ कराडदेशामाजी जाण । कुंभारगाव ह्मणति जन । कायस्थज्ञाती स्वीकारून । केळे अवतरण पवित्रकुळी ॥ १५ ॥ मातापितरा तोषविळे । रोजगारादि करुनी भळे । फिरत फिरत बाळेघाटि गेळे । तेथे केळे सुभेमामलति ॥ १६ ॥ परि अंतरनिष्टयोगीराणा । न कळे स्थिति माईक जना । कोणे येके दिवसि आले मना । आत्मधना प्रगटवावे ॥ १७ ॥ चैतन्यसांप्रदाई । श्रीगुरुपदि ठेउनि डोई । अखंड विनटळे शेवेठाई । वैराग्य ह्रदई परिपूर्ण ॥ १८ ॥ स्वभाव मुळिचा पहिला आंगि । जगदोद्धारि वर्ते योगी । बहुत देश फीरणे जगी । भजनरंगी क्रीडत ॥ १९ ॥ दर्शने ज्याचे पश्चाताप । माहानखळाचे पळे पाप । ब्रह्मस्थिति उजळे दीप । होय सोपे स्वसुख जीवा ॥ २० ॥ ऐशापरि भ्रमण करित । भुतळाचि केळी तीर्थे । चैतन्याचा दाउनि पंथ । असंख्य जनाते उद्धरिळे ॥ २१ ॥ उत्तरमानस समग्र करून । आळे पंढरि जवळि जाण । मग तो अनंद वर्णि कोण । निघाळे भगवान सामोरे ॥ २२ ॥ घेउन संगे संतवृंद । आडवे आळे श्रीमुकुंद । अंबरनाथ धन्य सिद्ध । भाग्य अगाध जयाचे ॥ २३ ॥ भजन प्रेमे स्वानंदासि । प्रवेशळे राउ-

ळासि । नमन करुनि पुंडरीकासि । क्षेत्रस्थासि वंदिले पै ॥ २४ ॥ स्नानविधि सारुन । पुजा द्रव्ये घेतली पूर्ण । अर्चियेळा श्रीरुक्मिणी-रमण । भावे करुन यथोक्त ॥ २५ ॥ प्रदक्षणेसि गजर भरित । निघाले स्वामि अंबरनाथ । दिंड्या पताका झळकत । घोष करिति नामाचा ॥ २६ ॥ तो विलास इंद्रादिक । विमानी पाहाती कौतुक । जाळ घोटिती सकळिक । मृत्युलोक धन्य वदति ॥ २७ ॥ चतुर्थप्रहरीं कीर्तनासी । उमे राहिले योग विलासी । ते वक्तृत्व वर्णावयासि । शारदेसि मौन पै ॥ २८ ॥ उत्थव अक्रूर तये वेळि । पंढरीसि पातले भूतळि । प्रघटे जेथे वनमाळी । सारी मिळाली संतसभा ॥ २९ ॥ पुष्पवृष्टि सुरवर करिति । अबालवृध्दा आत्मस्थिति । अंबरनाथ धन्य जगति । ऐसे वदति हरिहर ॥ ३० ॥ ऐसे प्रकारे बहुत दिवस । श्रीपंढरीत केला वास । इच्छा जाहाली येकांतास । समाधीस बैसा-वया ॥ ३१ ॥ म्हणति आपण सन्निध असोनि । तादात्मता घडवि मनि । ऐसे स्थळ चक्रपाणी । मजलागोनि सांगावे ॥ ३२ ॥ ऐकोनि स्वभक्तवचन । प्रेमभरते देवासि पूर्ण । बोलते जाहाले करुणाघन । प्रसंनवदने सीतापति ॥ ३३ ॥ जे जे मानसी तुम्हि आणावे । ते ते मजला करणे सर्व । संत माझे जीवाचे जीव । नाही भाव दुजा तो ॥ ३४ ॥ साधू आमुचे देवतार्चन । सतत आम्हा करणे ध्यान । पुंडरीकास्तव येथे राहणे । कर ठेवोनि कटीवरी ॥ ३५ ॥ जेथे माझे निजवैष्णव । तेचि कैलासवैकुंठराणीव । भक्तहृदय वसता ठाव । आसो गाव भलता पै ॥ ३६ ॥ तरि अंबरनाथस्वामि । आवडे त्या राहिजे ग्रामि । अखंड जवळि निरंतर मि । टाकिजे उर्मि देह बुद्धिचि ॥ ३७ ॥ ईयापरी भगवद्वाणी । ऐकुनि नाथासि आनंद मनि । मस्तक ठेउनि समचरणी । जोडिले पाणी अनन्य ॥ ३८ ॥ आलिंगन देता शाम-सुंदर । सव्य घातिले पंढरपुर । निघाले नाथभक्त अंबर । करित गजर नामाचा ॥ ३९ ॥ पाहात पाहात अनेक स्थळ । कृष्णातीरासि योगेश्व आले । अमणापुरासि अवलोकिले । राहाते जाहाले तयास्थानी ॥ ४० ॥

आग्य या ग्रामाचे । वास्तव्य घडले संताचे । प्रत्यही श्रवणभजनाचे । कीर्तनाचे दृढवृत ॥ ४१ ॥ पत्नीसहीत नाथ राहाता । संतोष जाहाला या ग्रामस्ता । बांधविला मठ तत्वता । जवळ सरिता ते शोभे ॥ ४२ ॥ प्रत्यक्षता विष्णुतनु । तेथे आत्मा अंबरनाथभानु । भूतमात्री दया समानु । कामधेनु तयापरि ॥ ४३ ॥ रात्रंदिवस दाळपीठ । बाठीत असावे नित्य स्पष्ट । दर्शने ज्याचे हराति कष्ट । टळे नष्ट भवबाधा ॥ ४४ ॥ गौतमीचा फार प्रीति । गाईत्रीचे सेवा करिति । गाई सर्वत्र आणुन देति । छंद चिति तो सारा ॥ ४५ ॥ आलीया अतिथीसि जाण । करवावे दुग्धपान । देउनिया सिधा पूर्ण । समाधान करावे पै ॥ ४६ ॥ योगभ्रष्ट शिष्य पहिला । शिंपिया उदरी जन्मासि आला । भिकाजी ह्मणति तयाला । सेवेसि भला शोभे तो ॥ ४७ ॥ जनार्दनाचा जीवेका । कीं रामदासाचा कल्याण देखा । नातरि मछिंद्र सखा । गोरक्ष निका गुरुभक्ता ॥ ४८ ॥ उपनाम ज्याचे फुगाणे । वासनाभर्जीत ज्ञानाग्निने । भिकाजी साजे नामाभिधान । भिक्षा अर्पण देह सकळ ॥ ४९ ॥ आसो गुरुभक्ताचे न पुरे वर्णन । अंबरनाथ सद्गुरु धन्य । कीर्ति फाकली सर्वत्र जाण । वेधले मन प्रतिनिधीचे ॥ ५० ॥ करुणापर लिहिली पात्रिका । पाठविली सुंदर शिबिका । योजना करुनि भाविका । कारकुनलोका पाठविले ॥ ५१ ॥ मजकुर पाहाता अंबर-नाथ । तात्काळ निघाले भजन करित । संगे चालिले शिष्य बहुत । प्रेमळ त्यात भीकाजी ॥ ५२ ॥ जे जे ग्राम मार्गी लागत । तया दर्शने करिति पुनित । अतिथ्य करिति ते ग्रामस्त । येति बाळबित दुजेग्रामा ॥५३॥ ऐशाप्रकारे आनंदेसि । आले स्वामि कऱ्हाडक्षेत्रासि । हर्ष जाहाला युवराजासि । दर्शनासि निघाले ॥ ५४ ॥ समागमे घेउन ब्राह्मण । अडते गेले नाथासि जाण । समारंभे आले घेउन । आरंभिले पुजन पै ॥ ५५ ॥ खिचडी करुन सोन्यारुप्याचि । न्हाणीलि मूर्ति स्वामिंचि । मर्गरिवल्ले अर्पुनि साचि । घातिली सुमनाचि माळिका ॥ ५६ ॥ नानाप्रकारे धूपदिप । नैवेद्य अर्पिले अमुप । फळतांबुल

दक्षणा माप । मोहरा सुप भरोनि ॥ ५७ ॥ अकरागावाचि लेहुन सनद । ठेविकी पुढे भावार्थशुद्ध । नमन करुनि प्रेमे प्रसिद्ध । प्रार्थिका सिद्धनाथअंबर ॥ ५८ ॥ अनन्युक्ति जोडुनि कर । पसरिला पंतानि स्वामिसि पदर । करा ह्मणति अंगिकार । तुळसीपत्र दिनाचे ॥ ५९ ॥ तये कालि निस्पृहाचा राणा । करिता जाहाला हस्यवदना । ह्मणति अह्मासि नाशिवंत धना । काय सज्ञाना अर्पीसि ॥ ६० ॥ भुक्तिसि भीक्षा मुक्तिसि भजन । दोनि दिधली श्रीगुरुने । नाही कोठे अडचण । पृथ्वी संपूर्ण आमुचि हे ॥ ६१ ॥ तृणासारिखि इंद्रसंपति । अकरागाव तेथे कीति । भाग्यथोर वैराग्य निश्चिति । गर्जति श्रृति चतुर्वेद ॥ ६२ ॥ ऐसे बदुनि तात्काळिक । द्विजाहाति लुटविले कनक । आश्चिर्य करिति सकळिक । डोळा कौतुक पाहुनि ॥ ६३ ॥ सनदपत्रिका घेउन हाति । प्रसाद दिधला पंताप्रति । प्रतिनिधिसि विस्मय चिति । जालि विरक्ती तेचि क्षणि ॥ ६४ ॥ सत्संगाचे येक निमिष्य । तुळनेसि नये वैकुंठवास । बहुतपुण्य पदरि असे । तरि योगेश दर्शन घडे ॥ ६५ ॥ तरि आत्मकार्य करणे जया । तेणे भजावे संतपाया । नातरि तो पडे अपाया । करिता उपाया अनेक ॥ ६६ ॥ दिनत्रय राहुनि कराडात । दर्शनें केले जन पुनित । नंतर निघाले अंबरनाथ । माहासमर्थ ज्ञानराशि ॥ ६७ ॥ निघतेवेळेसि करुनि विज्ञाप्ति । पाघुरविले शाळजोडिप्रति । वारंवार वंदन करिति । प्रेमळमूर्ति युवराज ॥ ६८ ॥ नाथानि ते माहावस्त्र । मार्गी दिधले ब्राह्मणा पवित्र । पहिली छाटि भगवि विचित्र । पांघरले नेत्रे पाहाति सर्व ॥ ६९ ॥ ऐसे माहाराज वैराग्यनिष्ट । सखा ज्याचा श्रीवैकुंठ । उपच्यार त्यासि नावडे स्पष्ट । लागे मिष्ट गुरुभजन ॥ ७० ॥ प्रसाद करुनि पंतासि । आले आपुले स्वस्थानासि । धगधगीत पुण्यराशि । आवतार जगासि तारावया ॥ ७१ ॥ परि अज्ञानी हे जीव । इछिति संतान द्रव्यभाव । उपद्रव देति विषय भाव । नावडे देव परात्पर जो ॥ ७२ ॥ अमणापुरीचा पाटील अंध । नाम त्याचे फिरगु प्रसिद्ध । म्हणति स्वामिसि द्या अवषध । करा सिद्ध साधुत्व पै ॥ ७३ ॥ ऐसे प्राणी नानापरि ।

कंटाळा आणिति नरनारि । तयेकाळी निरंजन विहारि । करि दुरि सकळ पिडा ॥७४॥ सांगुनि सर्वांसि येक साधन । मुख्य कारण भगवतभजन । आपण बैसले ध्यानस्त पूर्ण । संकेत सुचउन सतशीष्या ॥ ७५ ॥ निर्गुणस्थ दाउनि लिळा । स्थिर जाहाले सहस्त्रदळा । हे न कळे कवणाला । समाधिला रचिले पै ॥ ७६ ॥ स्वप्नांत शिष्यासि आज्ञा करुन । शीर मोकळे केले जाण । जैसे ज्ञानदेवे सांगुन । गळयाचि जाळ मुळि काढविलि ॥ ७७ ॥ अजान वृक्षाचि ते मुळि । येकनाथे स्वकरे काढिली । तैसीच येथे गोष्ट घडली । धन्य माउलि अंबरनाथ ॥ ७८ ॥ द्वादशवर्षानंतर । नाथपत्नीशि पडला वीचार । त्रिविध जग बोलति सारे । टाकिले अळंकार कुंकुमादि ॥ ७९ ॥ संशय तमारी योगेश गाढा । केला चमत्कार तेणे सदृढा । कुंकुमाचा भरोनि करंडा । दाविला प्रौढा समाधीवरी ॥ ८० ॥ प्रत्यक्षता देवोनि दर्शन । दूर केला संदेह पूर्ण । ब्रह्मनिष्ट संत सघन । ज्ञाननिधान नाथ अंबर ॥ ८१ ॥ ते कुंकु जन्मपर्यंत । नाथस्त्रियेने लाविले निश्चित । योगलीला ते अद्भुत । आज्ञा ते न कळे पै ॥ ८२ ॥ जगदात्मा स्वयेचि जाले । कालत्रई ब्रह्म अचळ । तयासि म्हणति मेले गेले । तेचि भ्रमले सर्वथा ॥ ८३ ॥ नाही संतासि जन्ममरण । अखंड स्वरूपी रमारमण । लीलामात्रे देह धरणे । किंवा करणे अद्वैत ॥ ८४ ॥ अंबरनाथ स्वामी योगी । सजीव समाधी ज्यालागि । वार्ता प्रसवली जगी । येती वितरागी पाहा-वया ॥ ८५ ॥ गोसावि याचा महंत । हटयोगी आला तेथे । चिरा काढउनि स्वहस्ते । उपडिला निगुते केश शेंडिचा ॥ ८६ ॥ तव रक्ताचा बिंदू आला । गोसावीयाचा संशय गेला । पुन्हा मागुति चिरा लाविला । नैवेद्य केला नाथातें ॥ ८७ ॥ नाक दूराई काढून । होता जाला अनन्यशरण । गेला तयाचा योगाभीमान । गुरुभजन धरिले पै ॥ ८८ ॥ चमत्कार ऐसे अनंत । आत्मवेत्ते अंबरनाथ । समाधीस्थान गंधचर्चित । लिंग शोभत जयाचे ॥ ८९ ॥ पुण्यतिथी प्रतिसंवत्सरि । यात्रा मिळति जेथे भारी । कीर्तन करिति नरनारि । जेवि पंढरी दुसरी

ते ॥ ९० ॥ सर्वत्राते अन्नदान । निरंतर भजन शोभे पुराण । कृष्णा-
तटाक विराजमान । प्रत्यक्ष भगवान उदकस्वरूप ॥ ९१ ॥ ध्वजपताका
मंगळवाद्ये । छबीना मिरवे त्रिकाळ शुध्द । समाधीदर्शन भूतेसमंध ।
पीडा विविध जातसे पै ॥ ९२ ॥ कूष्ठादि अपस्माररोग । प्रदक्षणेने
जाति सांग । दुष्टपातक पळे काग । स्मरता अभंगनाथजी तो ॥ ९३ ॥
कुंभारगावकर शिष्यमंडळी । पुण्यतिथीची याद केली । हे नावडे कदा-
काळी । गोष्टी घडली ऐका ते ॥ ९४ ॥ साहित्याचे जाहाले लवण ।
जेथील तेथे तात्काळ पूर्ण । पाहू जाता आश्चीर्य जाण । बुडाले मन
अनुतापी ॥ ९५ ॥ अघटीत घटणा ज्या स्थळा । रीघ न घडे कदा
स्फीतिला । भिकाजी हाते करविला । भंडारा सगळा झोळि फीरउनि
॥ ९६ ॥ तैसेचि आणीक लिला ऐका । जे कां भवाब्धी तारिणी
नौका । आवर्षणकाळी भक्तसखा । करि कौतुका स्वअंगे
॥ ९७ ॥ पारेचे डोंगरातून । प्रघट जाले जानकीरमण ।
गोसावी याचा वेष घेउन । आले निघून आमरापूरा ॥ ९८ ॥
निजभक्ताचा उत्साह सांग । करिता जाला पांडुरंग । भिक्षा मागोनि
रमारंगे । केली सोंगसंपादणी ॥ ९९ ॥ तेथे अष्टमासिध्दि दासी ।
उणे काय त्या देवाशी । परी उणीव सांप्रदायाशी । आणावी कैसी
साधूचे ॥ १०० ॥ वर्षापेक्षा आधीक । जेवविले जन असंख्य ।
दुर्भिक्ष जाणूनि सकळीक । करिति कौतुक लोक ते ॥ १ ॥
न्युन्यता पडेल संताचि । ह्मणूनि माळा अवताराचि । भगवत्‌गीता
अर्जुना । माउली भक्ताचि वदली ते ॥ २ ॥ विभक्त नाही तो
भक्त । हे जो जाणति स्वरुप व्यक्त । बहिर्मुखाने कळे अर्थ । भ्रमळे
व्यर्थ देहबुध्धी ॥ ३ ॥ असो श्रीरामदासाचा साहाकारी । सकळ
कार्य आपण करी । स्वये बैसोनि ममवैखरि । भक्तमंजरि गुंफवितसे
॥ ४ ॥ स्वतसिध्द माहाराज पंढरीस । भक्तलीला ऐकावयास ।
समपाई उभा असे । आवडे हरीस ते कथा ॥ ५ ॥ राजारागि
प्रसिध्द । हृदयकमळी होउनि सिध्द । अंबरनाथ कथा शुद्ध । असता

मतिमंद करविले ॥ ६ ॥ पुढे गोपाळनाथाचें वर्णन । करवितील स्वामी पूर्ण । श्रोतिये देता अवधान । देइजे दर्शन श्रीहरी ॥ ७ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणेचि पुरती मनोरथ । अंबरनाथचरित्राते । अध्याय समाप्त सकृत पै ॥ १०८ ॥ आध्याय १ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय चवेचाळीसावा ॥ ४४ ॥ समाप्तः ॥

## अध्याय ४५

### —गोपाळनाथ—

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐनमो श्रीआद्या । परात्परा स्वसंवेद्या । चतुर्वेद प्रतिपाद्या । जगद्वंद्या अत्मया ॥ १ ॥ तुजवरि भासलि माया ऐसि । सिंधुवरि लहरि तैसि । किंवा अभ्रे आकाशि । अत्मविळासि तैसे जग ॥ २ ॥ आपण सर्वातित सर्वोतमु । सर्वसाक्षि आत्मारामु । जयाठाई दृश्यक्रमु । न लिंपे नेमु कदा तो ॥ ३ ॥ निर्धर्म निर्विकार । सद्गुरुनाथ सर्वेश्वर । भक्ते तयासि अवयव सारे । समर्पिले खरे देह्यभावा ॥ ४ ॥ ह्मणोनि विदेह्यासि देह धरणे । युगायुगी संभवणे । नातरि ठाईचे निर्गुण । इंद्रिये मन त्या कैचे ॥ ५ ॥ लोकत्रई याळागि । प्रीय नसे श्रीरंगी । सवभावे भक्तरंगी । शारंगी क्रिडतसे ॥ ६ ॥ विभक्त नोव्हे तोचि भक्त । नसेचि काही जेथे द्वैत । कीर्ण आणी जैसा आदित्य । ऐक्यत्वे परिपूर्ण ॥ ७ ॥ आसो तया साधुविणे । आवडि नसे देवासि जाण । भक्तमंजरि गुंफोन । करितो आर्पण याळागी ॥ ८ ॥ आवधान देता येकाग्र श्रोति । सकळसुखे प्राप्त होति । नागनाथ अवतार पुन्हा क्षिती । जाहाला निश्चित ते ऐका ॥ ९ ॥ बहिरंभटासि जेणे काहि । उद्धरिले लवलाहि । शिष्याहाते कुटोनि देहि । पुतळा महि बनाविला ॥ १० ॥ ज्ञानाग्निसि चेतउन । जाळोनि टाकीला अभीमान । तेणे गळाले मीपण । कैचे तुपण मग पाहि ॥ ११ ॥ प्राप्त होता स्वात्मदृष्टि । हारपोनि गेलि सकळसृष्टी । आपी

आप ब्रह्मांड घटि । पडलि मीठि स्वानंदि ॥ १२ ॥
ऐशापरि निर्धारा । उपदेशीला पिसा भैरा । तो नागनाथ जगदोद्धारा । आला खरा मागौता ॥ १३ ॥ भेडाचे करुनि गाडे । जुंपिले तयासि माकोडे । शिळा आणउनि वाडेकोडे । केली प्रौढ गुरुसमाधि ॥ १४ ॥ ईत्यादिककथा सारि । वर्णिलि अन्यग्रंथांतरि । प्रस्तुत सांगणे निर्धारि । जन्म धरि पुन्हा ते ॥ १५ ॥ श्रीगंगेच्चियेतिरि । सलाबतपुर कोसावरि । तेथिल ब्राह्मण साध्यारि । शाखाबारि वाजसनि ॥ १६ ॥ नाम जयाचे गोविंद । माहाभागवत आत्मविद । भार्या तयाचि प्रसिध्ध । अनंदी शुद्ध नाम जिये ॥ १७ ॥ कौंडण्यगोत्रि माहासमर्थ । त्रिपुरुष उभयता पुण्यवंत । जाणुनि तयाचे पूर्व सुकृत । जन्मले नाथ त्याउदरी ॥ १८ ॥ गर्भि संभव होताचि । विस्मृति जाहाली देहासि । वेधली तये सतिच्चि । वृत्ति साचि तत्क्षणी ॥ १९ ॥ प्रपंचभान सांडुनि । मुद्रा लागलि सदा नैनि । गोपाळकृष्ण निशिदिनि । उच्यार वदनी करणे ते ॥ २० ॥ निद्रा आहार कैचे खाणे । तुळसी बुका वाटुनि पिणे । ऐशाप्रकारे नउमास पूर्ण । जाहाले जाण गर्भासी ॥ २१ ॥ गोकुळ अष्टमीस जन्म जाहाला । गोपाळ नाम ठेविले बाळा । वडवाळसिद्धनागेश भला । अवतारला जो तयाते ॥ २२ ॥ जन्मकाळी पितयाने । द्विजासि दिधली अनेक दाने । जेववीले अठरावर्ण । उत्साह पूर्ण केला ते ॥ २३ ॥ गोपाळनाथासि पाहाता द्रिष्टि । उपमा नसे दुजी सृष्टि । जयावरुनि मदन कोटि । टाकिजे निकटि वोवाळुनि ॥२४॥ मौंजीबंधन होताचि पाहि । वैराग्य धारण केले देहि । वैष्णव वंदोनि ठाईठाई । पातले प्रवाहि रामतीर्थी ॥ २५ ॥ स्थान पाहुनि एकांत । तप आरंभिले गोपाळनाथे । काहि दिवस राहुनि तेथे । गेले निश्चित काशिसि ॥ २६ ॥ विश्वेश्वरासि करूनि नमन । आराधिला पंचवदन । मांडिले क्रूर अनुष्टान । आत्मदर्शन व्हावया ॥ २७ ॥ नागनाथ अवतार गोपाळ स्पष्ट । पाहिजे कासया तेथे खटपट । परंतु दाविली जगासि वाट । साधन वरिष्ट ह्मणूनी ॥ २८ ॥ साधक ह्मणविति शिवादिक ।

जीवमानवी काय रंक । मायाजाळि गुंतले लोक । नाही विवेक स्वरूपाचा ॥ २९ ॥ असो प्रत्यक्ष गोपाळनाथाशि । भेटते जाहाले कैलासवाशि । ह्मणति जावे वऱ्हाडदेशाशी । मारकीनगराशि या वेळा ॥ ३० ॥ आत्मरंग तेथे आमुचा । रंगनाथ ज्ञानी आहे साचा । शरण जाउनि तयाचा । लाभ स्थितीचा करूनि घेई ॥ ३१ ॥ गोपाळजीनि आज्ञे-प्रमाणे । मारकीय नगराशी जाऊन । सद्गुरुचे वंदिले चरण । भावें करोनि आनन्य ॥ ३२ ॥ तात्काळ होताचि उपदेश । स्वरूप दाटले स्वयंप्रकाश । पिंडब्रह्मांड करूनि ग्रास । न्याहाळीतसे अप अपणा ॥ ३३ ॥ तेथें कैंचे पाहता पाहणे । सर्वांगाचा जाहाला नैन । सद्गुरु-कृपे बाणली खुण । जाहले मौन वाचेशि ॥ ३४ ॥ कर्पुरवन्ही येक-वटता । काय उरले तेथे पाहतां । तैसे जाहले गोपाळनाथा । निगुरा तत्वता चकित ॥ ३५ ॥ मंत्र तंत्र उपदेशिति । गुरुत्व जगी मिरविति । जळो तयाचि संगति । आत्मास्थिती नसता ते ॥ ३६ ॥ याचिसाटि शाहाणिये । जाणुनि धरावे श्रीगुरुचें पाय । नाहींतरि वाया जाय । शपत वाहे त्रिवाच्या ॥ ३७ ॥ अज्ञानगुरूचा त्याग करणे । ऐसे बोलीले व्यासभगवान । ठाइ ठाइ ग्रंथी वचन । अनेक जाण शास्त्रांतरि ॥ ३८ ॥ भोळाभाव मुर्ख स्वभाव । तेणे नातुडे देवाधिदेव । शोधुनि काही सर्व करावे । तेचि बरवे जनरीति ॥ ३९ ॥ असो गोपाळनाथस्वामीते । श्रीगुरुकृपा जाहाली यथार्थ । हारपोनि गेले द्वैताद्वैत । नाही दृष्टांत द्यावया ॥ ४० ॥ सद्गुरुसेवे तनुमनधन । जीवित्व केले समग्र अर्पण । रंगनाथपदि निशिदिन । जाहले निमग्न अहिर्निशि ॥ ४१ ॥ गोपाळजीस तयेकाळीं । आज्ञा कारि गुरूमाउलि जडजीवाते भूमंडाळे । तारण कलीत करावे ॥ ४२ ॥ आज्ञा वंदूनि गोपाळनाथे । नमन केले साष्टांग पदाते । येऊनिया स्वग्रहाते । वंदिलि निरुते जनकजनानि ॥ ४३ ॥ काहि दिवस राहूनि सदनि । संतोष केला मातेलागुनि । फिरावयासि मग मोदिनि । कैवल्यदानी निघाले ॥ ४४ ॥ प्रथम आले कोडवळेग्रामी । धन्यस्थान तेथील

भूमी । जनालागुनि सुगमनेमि । स्वात्मधर्मि मेळविले ॥ ४५ ॥ नंतर आले शीउरास । काहि दिवस केला वास । तेथे दाविले लोकास। चमत्कारास नाथजीनि ॥ ४६ ॥ वंध्या असतां स्त्रिया वृद्ध । पुत्र प्रसवल्या त्या प्रसिद्ध । वांझगाई देति दुग्ध । वर्तले शुद्ध ययापरि ॥४७॥ आणीक ऐका दुजी गोष्टी । खळासि जाहाली नाथभेटि । तात्काळ तया ज्ञानद्रिष्टी । देउनि सृष्टि निरसिले ॥ ४८ ॥ स्त्रियापुरुष लाहानमुल । भजनि लाविले अज्ञान सकळ । शिउरग्रामी प्रांजळ । भजन स्थापिले श्रीगुरुचे ॥ ४९ ॥ पौष्णितिर्थी अनुष्ठान । काहि दिवस केले जाण । तेथे जाहाले दर्शन । दत्तात्रय पूर्ण भेटले ॥ ५० ॥ दैदिप्यमान षडभुज । मूर्ति ठाकलि सतेज । गोपाळजीनि पाहुनि चोज । पदरज ते वंदियेले ॥ ५१ ॥ मस्तकी ठेउनि वरदकर । अदृश्य जाहाले अत्रिकुमर । नाथजी शोक करिता फार । वाणी स्वतंत्र बदली ते ॥ ५२ ॥ देहत्रय करिता गुरुसि दत्त । सबाह्य भरला सहजी दत्त। यालागि होउनि त्रिगुणातित । स्वरूपसंत पाहि तु ॥ ५३ ॥ ऐसि ध्वनि पडता श्रवणी । मुद्रा लागली नाथासि नैनि । काष्टवत बैसले समाधि लागुनि । नीशिदिनि दीनत्रय ॥ ५४ ॥ मग तो आनंद सांगणे कीति । स्वरूपी रंगोनि गेली वृत्ति । देहभान गोपाळनाथी । निरसिलि वृत्ति ततक्षणी ॥ ५५ ॥ मग सहजस्थिति अपसया । नाथे सोडिले स्थाना तया । बाभुळगावासि येउनिया । राहिले ठाया तेथेचि ॥ ५६ ॥ ग्रामस्तमंडळी भाउक । मठ बांधविला तेथ देख । असन करुनि दिधले सुरेख । गोपाळ सुख पावले मनी ॥ ५७ ॥ भावार्थ शुद्ध जाणुनि । वास्तव्य केले नाथजीनि । ग्रामवासि लाउनि भजनि । भगवतध्यानि निमग्न केले ॥ ५८ ॥ स्त्रीयापुरुष आबाळवृद्ध । मेळविली स्वरूपी शुद्ध । धन्य तयाचे प्रारब्ध । लाधली सिद्ध गोपाळकृपा ॥ ५९ ॥ शिष्य मंडळी करुनि बहुत । बाभुळगावि वसति नाथ । तव तेथे आला पंडित । गर्विष्ट उन्मत्त नानापारे ॥ ६० ॥ क्षेत्रे सकळ जींकोन । दिवसा लाविली दिवटि जेणे । अतिबोलका

विद्वान । आर्जीक ब्राह्मण सर्वांते ॥ ६१ ॥ जन्मांतरिचा योगनिष्ठ । जो का पिसा बहिरंभट । गुरुसेवेसि जयाने स्पष्ट । योग वरिष्ठ जन्म धरिला ॥ ६२ ॥ परि तो स्वभाव पूर्विल । विद्वान आणी वाचाबरळ । हिंडत हिंडत भुमंडळ । आला बामुळगावासि तो ॥६३॥ वडवानळसिद्ध नागनाथ । अवतार तयाचा गोपाळनाथ । पुढे देखोनि तो पंडित । पिसा दिसत जन्मांतरिचा ॥ ६४ ॥ पाहुनि वाच्यांग वित्पति । राग आला स्वामिचीत्ति । वामकरे धरुनि हाति । मुखावरिति चडकण मारिली ॥ ६५ ॥ म्हणति आझोनि वागवाद । करिसि मुर्खा राहे स्तब्ध । तुझा तुचि सच्चिदानंद । पाहे निर्द्वंद भुवनत्रई ॥६६॥ दीर्घ स्वरे ऐसे वदता । समस्त मिळाले तेथे तत्वता । नाथाकडे पाहु जाता । पालट तत्वता जाला रूपा ॥ ६७ ॥ मग तात्काळी तो ब्राह्मण । पूर्वील शीष्य जो बहिरंभट जाण । तयाने घातिले लोटांगण । केले पलायन स्वामिनि ॥ ६८ ॥ तयेकाळी पश्चाताप युक्त । लागला पाठिसि विप्र धांवत । वस्त्र तयाचे होउनि गळित । भुमिवरुते पडले ते ॥ ६९ ॥ दिगंबर दिक्षा तयेवेळी । द्विजे तेणे धारण केली । प्रसन्न जाहाली गुरुमाउलि । शीरकमळी स्पर्शिले कर ॥ ७० ॥ तनुचतुष्टय टाकिता चिरे । जानवे त्रिगुण तोडिले बरे । शिखा तोचि अहंकार । मुंडण खरे वासनेचे ॥ ७१ ॥ षड्विकार ज्ञानानळे । जाळोनि टाकिले तात्काळ । हंसरूप जाणियेले । परमहंस जाहाले तोचि पै ॥ ७२ ॥ सद्गुरुकृपे ऐसेरीति । द्विजासि जाहाली अनुभवप्राप्ती परमहंस होउनि जगति । जडली प्रीति गुरुचरणी ॥ ७३ ॥ पुढे परमहंसासहित । पैठणासि गेले गोपाळनाथ । विचित्र केले असे तेथे । तेहि श्रोते श्रवण करा ॥ ७४ ॥ येकनाथस्वामिचे समाधिवरि । गोपाळनाथ बैसले निर्धारि । तो ईतिहास ऐका चतुरी । संक्षेपविच्यारि अनुक्रमे ॥ ७५ ॥ क्षिरसमुद्रि शेषावरि । पहुडति ज्या सदा श्रीहरि । तोचि आवतार पृथ्वीवरि । भवगज्यारि नागेश तो ॥ ७६ ॥ भक्तिप्रेम भोगावया । जन्म घेणे मागुता तया । गोपाळ नाम धरुनिया । प्रगटले ठाया पुन्हा ते ॥ ७७ ॥

ज्ञानेश भावतार श्रीविष्णुचा । येकनाथ जाहाला तोचि साचा । यालागी प्रेमा उभयताचा । कायावाचामने तो ॥ ७८ ॥ विष्णुमस्तकि शेषफणा । तेणे भुषण त्या जगजीवना । पदि दैवत तेचि जाणा । यालागी चरणा अर्पीयेले ॥ ७९ ॥ शेष आणी नारायण । हे तो ठाईंचे अभिन्न । सूर्या आंगी जैसी कीर्णे । तया संपूर्ण शोभति ॥ ८० ॥ देवभक्तासि कैचा भेद । द्वैतभावना तो विनोद । येकीयेक सहजी प्रसिद्ध । गोपाळसिद्ध येकोबा ॥ ८१ ॥ यास्तव पैठणी समाधी वरुते । बैसते जाले गोपाळनाथ । बाल पिशाच्य उन्मत । स्थिति विलसत ज्या देही ॥ ८२ ॥ असो सर्वानि पाहुनि डोळा । वंदन केले ज्या पाउला । घेउनि गेले श्रीमठाला । अर्चनाला नाथाचे ॥ ८३ ॥ सात दिवसपर्यंत । पैठणी राहिले गोपाळनाथ । अन्नदान केले तेथे । नाहि गणीत तयासि ॥ ८४ तव तेथे येक ब्राह्मण । रणछोडनाईक नामाभिधान । पात्र धरूनि गेला निघुनि । घरासि जाण पुत्र आणावया ॥ ८५ ॥ तया पात्रि अगांतुक । दुसरा बैसला विप्र देख । लगबगे धाउनि तो नाईक । उठवि नेटके त्या द्विजासि ॥ ८६ ॥ हे पाहुनि गोपाळनाथे । सांगितले स्पष्ट सर्वांते । उत्पत्तीसि पितृरेत । कदा नव्हते सर्वथा ॥ ८७ ॥ ब्राम्हणासि आपमानी । उठविल जो पात्रावरुनि । तयाचि पवित्र नसे जननि । निश्चय पुराणी बोलिला ॥ ८८ ॥ जे जे सत्कर्म उछेदिति । विप्र धेनुसि पीडा करिति । ते ते खरवाप्रति जाति । हि शास्त्रोक्ति सकळीक ॥ ८९ ॥ रणछोड नाईक ऐकता ऐसे । पश्चाताप जाहाला मनास । तात्काळ जाउनि स्वमातेस । घालुनि शफतीस विच्यारिले ॥ ९० ॥ वास्तविक जैसे जाहाले । तैसे तियेने सांगीतले । ऐकुनि घेताचि घाबरले । उद्विग्न जाहाले नाईक ते ॥९१॥ ततक्षणी वंदुनि जननी । गोपाळनाथाचे जडला चरणी । वैराग्य आंगी धारण करूनि । लागला भजनि रणछोड तो ॥ ९२ ॥ धनधान्य सकळ लुटउन । सद्गुरुसी निघाला शरण । घेतले प्रायश्चितार्थ ज्ञान । जाहाला पावन सहजी तो ॥ ९३ ॥ विप्र होउनि जीवन्मुक्त । श्रीगुरुसेवे जाहाला रत । पुढे स्वामि गोपाळनाथ ।

सातान्यात आले पै ।।९४।। समागमे परमहंस । आणीक येक गोसावि असे । अलक्षगीरि नाम तयास । उभयता शीष्य जवळी ते ।। ९५ ।। दरिडिमाजी कृष्णातिरि । गुव्हा सुंदर पाहुनि बरि । वसित केलि तया विवरि । वदे वैखरि गुरुनाम ।। ९६ ।। आलक्षबावागोसावियाने । कणीक आणावी गावातुन । पानगे तयाचे करुन । करिति भोजन प्रतिदिवसि ।। ९७ ।। ऐशा प्रकारे षण्मास । गुप्तरुपे केला वास । पुढे प्रगट व्हावयास । वर्तले जनास ते ऐका ।। ९८ ।। आज्ञा घेउन परमहंस । गेला भिक्षा करावयास । करिता जाहाला प्रवेश । सातारि-यास स्वछंदे ।। ९९ ।। अनुभवसिद्ध अभंग गाता । श्रवण जाहाले नृपनाथा । शाहुचीये तात्काळ चिता । उद्वीग्नता जाहाली पै ।। १०० ।। परमहंसाजवळ जाउनि । भावे मस्तक ठेविला चरणी । ह्मणे मजला दावा नैनि । अभंग वचनी गाता ते ।। १ ।। अनन्यभक्ति भाकिता करुणा । कृपा आली परमहंसमना । राजीया तो सांगुनि स्थाना । सद्गुरुचरणा निवेदिले ।। २ ।। ईकडे सैन्यासहीत कारभारि । राजेश्री निघाले घेउनि स्वारि । अनेक वाद्ये वाजति भेरि । कृष्णातिरि पातले ।। ३ ।। तो स्नान करुनि गोपाळनाथ । बैसले होते संध्या करित । मुर्ति पाहुनि राजीयाते । उल्हास बहुत जाहाला मनि ।। ४ ।। साष्टांगेसी करुनि नमन । उभा ठाकला कर जोडुन । ह्मणे स्वामिया मागा पूर्ण । ईछित मन असेल ते ।। ५ ।। शाहुराज बोलता ऐसे । गोपाळनाथासि आले हासे । जयाचे ह्रदई भगवान वसे । उणे नसे तेथे पै ।। ६ ।। स्वर्गादिक सुखे सारि । वाटति जया वमनापरि । राजीयाची कोण थोरि । नव्हे भिकारि गोपाळनाथ ।। ७ ।। कल्याणार्थ जगाचिया । साधुसी धरणे लागे देह्या । यताद्विषई मागावया । आरंभिले तया स्वामिनि ।। ८ ।। ह्मणति ब्रंह्म संपादुन । भिक्षा घालि ज्ञानप्रद जाण । तयावेगळे पदार्थ आन । तृणासमान आह्मासि ।। ९ ।। सकळ ऐश्वर्याचा स्वामि । ऐसे वाटले राजअंतर्यामि । आह्मे पंडित समागमि । ज्ञानधर्मी सहजी तो ।। ११० ।। ऐशा विच्यारे

नाथाप्रति । वचन देता आह्माला नृपासी । ह्मणे निवेदन होईल आत्मस्थिति । कसा किति भरवसा हा ॥ ११ ॥ परि नाथजी कृपाकरून । आश्रमा याचे स्वये आपण । लागता पवित्र स्वामिचरण । केला पावन होईजे पै ॥ १२ ॥ वचनि पडोनि ऐशा प्रकारे । सातारियासी गेला नृपवर । बोलाउनि पंडित सारे । ज्ञानविच्यार पुसिला तया ॥ १३ ॥ ह्मणे राजा ब्राह्मणासि । सांगा मजला आत्मज्ञानासि । न सांगता ब्रह्मविद्येसि । आग्रहासि मुकाल तुह्मि ॥ १४ ॥ मुमुक्षु राजा जयत्पाळ जैसा । छळण करि पाहुनि संत वेशा । शाहुचिये तैसे मानसा । रात्रदिवसा चैन न पडे ॥ १५ ॥ विच्यारिता पंडितासि । वाच्यांशज्ञान कथिति तयासि । उपनिषधभाग बोलावयासि । सामर्थ्य तयासि कैचे ते ॥ १६ ॥ जैसा चंदन गर्दभ भार वाहि । सुगंधसौख्य तया ठाउके नाही । तयापरि पढोनि काई । शास्त्रे साही वेदादिक ॥ १७ ॥ ऐसे बोलिले वसिष्ठादिक । काय करूनि साधने अनेक । विषयजाळी गुंतले लोक । नाही विवेक स्वरूपाचा ॥ १८ ॥ नाना तपे नाना दाने । तीर्थे वृते देवता अर्चन । जव न पाहे आत्मज्ञान । धिगः जीणे तयाचे ॥ १९ ॥ वेद पूर्वपक्ष बोलिला । पूर्वपक्ष म्हणावे अज्ञानाला । पुन्हा वेद तोचि वदला । सिद्धांत भला उत्तरपक्षि ॥ १२० ॥ हे न जाणुनि मुर्खजन । वेद आज्ञा म्हणति प्रमाण । न पाहाति वाक्यार्थ पूर्ण । नाडिले स्फितिने देहबुद्धि ॥ २१ ॥ असो शाहुराजाप्रति । पंडित कारिति शब्द वित्पति । सांगावया आत्मस्थिति । ज्ञान संपति नसे कवणा ॥ २२ ॥ तेव्हा चिन्ताक्रांत राजा मनि । होउनि बैसला सिंहासनि । म्हणे सापडलो नाथासि वचनि । देईन म्हणोनि ब्रह्मभिक्षा ॥ २३ ॥ तव इतुकीयात नाथगोपाळ । सातारियासि येते जाले । राजद्वारि उभे ठाकले । गर्जीनले दिलि अरोळी ॥ २४ ॥ शाहुसी म्हणति झडकर येउनि । ब्रह्मभीक्षा घाली श्रवणी । बोलाविलेसि आलो म्हणोनि । सत्यवाणि करि आता ॥ २५ ॥ ऐसे ऐकुनि त्या भुपाळा । घळघळा आले अश्रु डोळा । बोलवेना दाटला गळा । पदकमळा वंदियेले ॥ २५ ॥

म्हणे वेघळी करुनि ब्रह्मस्थिति । आमुचे घरि सकळसंपत्ति । क्षमा करून घेणे चिति । ईच्छा कोणति असेल ते ॥ २७ ॥ निराकरण करिता राजियाने । अवकाश दिधला नाथजीने । येक महिन्यांत संपादुन । भीक्षा ज्ञान घाली तु ॥ २८ ॥ सांगुनि ऐसे ततक्षणी । निघोनि गेले तीर्थाटणी । महिना होताचि मागुतेनि । राजभुवनि प्रवेशले ॥ २९ ॥ पुन्हा तैसाचि राजीयासि । प्रश्न केला ब्रह्म-भीक्षेसि । वारंवार उपद्रवासि । निश्चयेसि आरंभिले ॥ १३० ॥ तये काळिं कांटाळून । राजा बोले दुतासि जाण । गोपाळनाथासि घालउन । यावे निघोन घाटाखाली ॥ ३१ ॥ आज्ञेप्रमाणे सेवकानि । नेहुनि बोळविले नाथालागुनि । मग कैसी केली कार्णि । तेहि श्रवणी अवधारिजे ॥ ३२ ॥ दोन प्रहर जाहाली निशि । निद्रा लागली राजीयाशी । तो अकस्मात येउन उश्यासी । कृपाराशी बैसले ते ॥ १३३ ॥ बंदोबस्त चौकि पाहारा । कड्याकुलपे तैसिच द्वारा । सावध असता किल्ला सारा । घडले विच्यारा ऐसे ते ॥ ३४ ॥ येका-येकी आश्चिर्य पाहाता । मुर्छा आलि नृपनाथा । सावध होउनि चरणी माथा । ठेवियेला तत्वता स्वामिचे ॥ ३५ ॥ जयाचे सत्ते पंचभूते । वर्तति आपुल्या स्वधर्माते । तो हा माहाराज गोपाळनाथ ! अटक तेथे कैंचि तया ॥ ३६ ॥ गोनाम इंद्रिये सर्वांचि । तया पाळक प्रभु हाचि । वित्पति गोपाळनामाचि । यालागी साचि शोभतसे ॥ ३७ ॥ आसो गोपाळनाथस्वामिनी । मस्तकी ठेविला वरदपाणी । शाह्य राजासि ततक्षणी । स्वरूपी मीळणि मेळविले ॥ ३८ ॥ पुढील अध्याई कथा सुरस । नाथजी येतिल त्रिपुटिस । करूनि चित्तासि अवकाश । आख्यान सुरस श्रवण करा ॥ ३९ ॥ सिद्धस्वामि समर्थ माझा । लोकत्रई तयाचि ध्वजा । राजारामि ग्रंथबीजा । वर्षिले सहजा कृपोदक ॥ १४० ॥ भक्तमंजरिमालाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । गोपाळ-नाथचरित्राते । आध्याय होत प्रथमः ॥ १४१ ॥ आध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय पंचेचाळिसावा ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



# अध्याय ४६

## — गोपाळनाथ —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः श्रीरामसमर्थ ॥ नमो सद्गुरु निर्विकारा । निर्गुण निश्चळ परात्परा । भक्तजनाच्या निजमाहेरा । अखंड अपारा श्रीगुरुमूर्ति ॥ १ ॥ तुजमाजि सर्व काहि । चराचर साठवले पाहि । रिता ठाव कोठे नाहि । ही नवाई तव निजकृपे ॥ २ ॥ वेगळेपण नुरे पाहतां । सबाह्य जालाशि तूंचि अनंता । स्तुती कैशी करू आता । बरी स्थिरता वाचेशि ॥ ३ ॥ तरी स्वामीया ऐसे करावे । दास्यत्व काही मज घडावे । वरप्रदान हेचि द्यावे । मन उरावे भक्तीशी ॥ ४ ॥ गंगा सिंधूशि मिळोनि मिळणी । प्रवाहा वाहतसे निशिदिनी । तयापरी अनन्यचरणी । निशिदीनि तव प्रीती ॥ ५ ॥ नातरी उदकी उदक मिळता । काय सुख तया तत्वता । मत्छालागी क्रिडो जाता । आनंद आईता सहजी तो ॥६॥ यालागि संत स्तवावया । स्फूर्ति द्यावी करुणाळया । ताटस्तता असता ठाया । श्रीगुरुराया हेचि भले ॥ ७ ॥ प्रार्थना परिसोनि श्रीसिद्धेश । चेईरे केले इंद्रियास । बोलविति चरित्रास । तो कथारस अनुपम्य ॥ ८ ॥ अवधान देता येकाग्रभक्ती । सकळ अर्थ पाविजे मुक्ती । दत्तचित्त यालागि श्रोति । होता स्थिति लाभे तया ॥ ९ ॥ अनुसंधान कथा मागील । शाहुराजासि उद्धारिले । नंतर श्रीनाथगोपाळ । चमत्कार केले ते ऐका ॥ १० ॥ माहुली सन्निध कृष्णातिरी । त्रिपुटिग्राम कोशावरी । तेथे राहातसे शूद्रकुमारि । जन्मांतरी योगभ्रष्ठ ती ॥ ११ ॥ राणुबाई नाम तयेचे । केशरकर उपनाम साचे । ग्रामाधीपत्य नेमाचे । राजयाचे शरीरसमंधी ॥ १२ ॥ नाथजीची ऐकोनि कीर्ति । धावत आली सत्वरगती । दर्शन होता जाली विरक्ती । त्रिपुटिप्रति घेउनि गेली ॥ १३ ॥ अनन्यभावे होउनि शरण । उभी ठाकली जोडून कर । ह्मणे मजला कृपा करून । आत्मज्ञानं

द्यावे पै ॥ १४ ॥ भावार्थ पाहूनी तयेचा । करुणामेघ बोळला साचा । वाक्योदके ते सतिचा । कुंभ हृदयाचा उचंबळला ॥ १५ ॥ श्रवण-भूमीशि पडता बीज । नेत्रकमळी ते उगवले निज । गुरुकृपे उचंबळले सहज । ते गुज अनुपम्य ॥ १६ ॥ असो राणूस अनुग्रह जाला । देहभाव तयेचा गळला । अर्पण केले वैभवाला । गुरुपदाला आश्चिर्य ॥ १७ ॥ सर्वकाळ शेवेठाइ । निमग्न जाली गोपाळपाई । दैवत जीयेशि दुजे नाहि । भक्ति हृदई नाथजीचि ॥ १८ ॥ कोणीयेके समई गोपाळनाथ । अन्नदान करावे ह्मणत । माहुलीक्षेत्रिचे द्विज समस्त । आणविले त्वरित बोलाउनि ॥ १९ ॥ कृष्णातिरीं अरंण्यात । मंडप घातला परमयुक्त । ब्राह्मण पातले असंख्यात । थोर विख्यात वेदज्ञ पै ॥ २० ॥ राणूबाई केशरकरीण । साहित्य पुरविले सकळ तयेन । वरी पडिले घृतासि नून्य । करिति ब्राह्मण गळबला ॥ २१ ॥ तये काळी रामाजीपंत । केसरकराचा कार्कुन निश्चित । नाथ बैसले होते तेथे । आला सांगत धावोनि ॥ २२ ॥ गोपाळनाथस्वामी थोर । वडवाळसिद्ध जो नागेश अवतार । ऋद्धी सिद्धि जोडूनी कर । तिष्ठती सादर त्यापाशि ॥ २३ ॥ वाणीतूनि जे निघावे । ते ते तात्काळ सिद्धचि व्हावे । ऐसा समर्थ श्रीगुरुराव । कोण लाघव वर्णी ते ॥ २४ ॥ ह्मणती घागरी भरल्या असता । मिथ्या जल्पसी रामाजीपंता । विस्मय आला ऐकुनि चित्ता । ज्याचि सता चराचरी ॥ २५ ॥ प्रत्युत्तर कल्पासि । सामर्थ्य नाही द्यावयासि । आज्ञा वंदुनि घागरीपासि । वाढणारासि धाडिले पै ॥ २६ ॥ पाहु जाता भरले बट । सध्यस्तस आच्य कोवट । श्रीगुरुकृपेचे नवल मोटे । सारे भट आनंदले ॥ २७ ॥ वाढिता बहुत न सरे काहि । भरली पात्रे तैसिच ठाई । असंख्य ब्राह्मण जेविले पाहि । जाहाल्या नाही घागरी रित्या ॥ २८ ॥ आणीक ऐसा चमत्कार । बोळला मेघ तेथे फार । वृष्टि होतसे अपार । उठति सारे भोजन करिता ॥ २९ ॥ तात्काळ उठुनि नाथजीनि । रेषा ओढोनि सभोवतेनि । प्रार्थना करिताचि ततक्षणी । मेघ गगनि स्थिरा-

मळा ॥ ३० ॥ घरासारिखे रेखे आत । ब्राह्मण जेविति स्वस्थचित्ते । रेषेबाहीर घन अद्भुत । उदक वाहात चहुकडुनि ॥ ३१ ॥ अनेक पाहाता ऐशा गोष्टि । वर्णिता आनंद न समाय पोटि । नाथजीनी लिला मोटि । केलि गोमटि ते परियेसा ॥ ३२ ॥ रात्रो येऊनि अरंण्यात । शाहुने लोक पाठविले बहुत । मागावया प्रसादाते । पसरिति हात नाथजीशि ॥ ३३ ॥ तये काळी स्वामीनि । आज्ञा केली तयालागूनी । भोजन करूनि सकळिकानि । राजालागुनी प्रसाद न्यावा ॥ ३४ ॥ दुराग्रही ते राजदुत । ह्मणती रागासी येईल नृपनाथ । तयाविणे आह्मी येथे । अन्न भक्षीत नाही पै ॥ ३५ ॥ बळात्कारेकरूनि । अन्न लुटिले त्या लोकानि । वर्जिले असतां शिष्यानि । शपथ घालूनि नाथजीचि ॥ ३६ ॥ मोठा बांधोनि राजाजवळ । घेवोनि गेले अन्न सकळ । सोडोनि पाहता जाहली फुले । आश्चिर्य केले नृपवरे ॥ ३७ ॥ मग अनन्यभावे राजीयाने । येवोनि वंदिले स्वामीचे चरण । अपराध क्षमा करा ह्मणून । पसरिले जाण पदरासि ॥ ३८ ॥ असो ऐशा अनेक लीला । मति न पुरे ल्याहावयाला । वडवानळ सिद्धनागेश भला । गोपाळ जाहला अवतार तो ॥ ३९ ॥ कोणीयेक समई तीर्थाटणा । नाथ गेले सहजी जाणा । गंगातीरी पवित्र स्थाना । देखोनि नैनि सुखावले ॥ ४० ॥ तव तेथे अकस्मात । ब्राह्मण मिळाले शाक्त बहूत । आरंभ केला श्रीयज्ञाते । मंडपाते घातिले पै ॥ ४१ ॥ गोपाळनाथाशि विप्रानि । पुशिले आहेशि कोण ह्मणुनी । शाक्त किंवा वैष्णव जनी । सांग वचनी आह्माते ॥ ४२ ॥ नाथजीनि ऐकूनि ऐसे । सांगितले मी वैष्णव असे । तये काळी सर्वत्रास । आला त्रास स्वामीचा ॥ ४३ ॥ ह्मणति आमुचा शाक्तपंथ । आपण नसावे सर्वथा येथे । करणे आहे मुख्य यज्ञाते । जावे त्वरित निघोनि ॥ ४४ ॥ अवश्य ह्मणोनि नाथजीनी । निघते जाले स्थान सोडुनी । गेले पुढे तीर्था लागोनि । फिरले मेदिनि बहुत ते ॥ ४५ ॥ तव इकडे समाप्तीशि । यज्ञ आला पूर्णाहुतीशि । तये वेळी आले मानशि । चिद्विलाशि गोपाळनाथ ॥ ४६ ॥ प्रसादसमई जाता

आपण । विलास दृष्टीस पडेल पूर्ण । नाथसाहेब आले निघोन । यालागी जाण त्या स्थानी ।। ४७ ।। यज्ञ मंडपी करिता प्रवेश । आरंभीले पूर्णाहुतीस । द्विज करिती मंत्र घोष । आटाहास्ये दीर्घध्वनी ।। ४८ ।। शाक्तमंडळी सकळीक । द्रव्ये घेतली अनेक । माहावस्त्र पाटावादिक । अर्पिले निके अग्निशी ।। ४९ ।। असो यज्ञ समाप्त केला । प्रसाद सर्वांलागी दीधला । गोपाळनाथाशि वंचिला । शाक्त भला नोहे म्हणोनि ।। ५० ।। मग नाथासि येउनि क्रोध । प्रगट देवी केली प्रसिध्ध । तये काळीं ब्रह्मवृंदे । मूर्छा शुध्ध आली तया ।। ५१ ।। ।। प्रेतवत जाली काया । शुध्दी नसे शाक्ताशि तया । अनंतभुजा माहंमाया । खवळली यज्ञमंडपी ।। ५२ ।। जैसा हिरण्यकश्यपूनि प्रल्हाद छाळिला । मग स्तंभी नृसिंव्ह प्रघटला । तये काळीच क्रोध आला । लोकत्रयाला उपमा नसे ।। ५३ ।। तयापरी येथे जाहले । यज्ञातूनि दैवत निघाले । विशाळतोंड पसरिले । भक्षीन बोले यज्ञकर्त्याशि ।।५४।। तये काळी त्वरा करोनि । गोपाळनाथ लागले चरणी । ह्मणती अंबे शांत होउनी । पाहावे नयनी निजदासा ।।५५।। प्रल्हाद पाहूनि हरी डोळा । तात्काळ क्रोध शांतवला । तैसाचि येथे विचार घडला । अंबिकेला आला द्रव ।। ५६ ।। गोपाळनाथे करिता ध्यान । लहान होउनी देवि जाण । कृपादृष्टी अवलोकून । पाटाववसन दिधले ते ।। ५७ ।। आलिंगन देऊनि नाथजीस । जाहली जगदंबा अदृश्य । पुढे नवल वर्तले कैसे । येकाग्र मनेशि अवधारा ।। ५८ ।। मंडपी सकळ अस्ताव्यस्त । पडले होते ब्राह्मण शाक्त । तयाशि उठवोनि गोपाळनाथे । सावध त्वरित केले पै ।। ५९ ।। पश्चाताप होउनि सर्वी । वंदिला जगद्गुरुनाथ गोसावि । ह्मणती स्वामिया दाविली देवी । प्रतापरवी धन्य तूं ।। ६० ।। अग्नीत जळाले माहावस्त्र । काढिले तुह्मि ते पवित्र । न कळता निंदिले अपवित्र । अपराधी खरे आह्मी सकळ ।।६१।। आता स्वामिनि कृपा करावी । अज्ञान दीना वाट लावावी । समूळ भ्रांति समूळ हरावी । मुख्य दावी उपासना ।। ६२ ।। अनन्यभावे

करुणा भाकिता । दया आली गोपाळनाथा । उपदेश केला तया शाक्ता । परमार्थी मेळविले ॥ ६३ ॥ अर्धमात्रा जे का जननी । मूळमाया स्फुरद्रूपिणि । पराशक्ती ते भवानी । दाविली नैनि जगदंबा ॥ ६४ ॥ हरीहराचि जे का माता । तूर्या चवथी शुद्ध अवस्था । वाच्यांश नाहीं तयेपरता । परात्पर तत्वता श्रुती ह्मणती ॥ ६५ ॥ सोहंभावें बाणता खूण । अनुभव जाहाला शाक्ताशि पूर्ण । सांप्रदाय दीधला तयालागुन । धन्य दयाघन नाथजी ते ॥ ६६ ॥ करूनि विप्रउत्धार । उत्तरमानस केले सारे । मग परतले माघारे । त्रिपुटीनगर तये स्थाना ॥ ६७ ॥ राणूबाई केसरकरीण । निष्टा जीयेचि गुरुपदी पूर्ण । अहिर्निशी निशिदिन । आठवी चरण स्वामींचे ॥ ६८ ॥ संतु पाटील विसोबा कुळकर्णी । वर्तति सदा नाथभजनि । दुसरे दैवत नाही कोणि । अंतःकर्णि श्रीगुरु ते ॥ ६९ ॥ कोणी येके समई ग्रामलेखक । विश्वनाथ जो पूर्ण भाविक । ठेवोनि चरणी निजमस्तक । गुरुनायक स्वगृहाशि नेले ॥ ७० ॥ आसन करूनि प्रशस्त । बैसविले वरी गोपाळनाथ । पूजा केलि यथोक्त । जोडोनि हात ठाकला उभा ॥७१॥ प्रार्थना करोनि प्रश्न केला । उदक नाहीं या ग्रामाला । याशि उपाय सांगा वहिला । दीनदयाळा गुरुराया ॥७२॥ ऐकूनि ऐसे नाथजीनि । कृपेनें द्रवलें अंतःकर्णि । उठोनिया ततक्षणिं । केली करणी अभिनव ते ॥७३॥ ग्रामसंन्निध पाहुनि स्थळ । स्वकरें तेथें काही उकरिले । गोपाळनाथें भरली वोंजळ । घेउन धुळ ते काळीं ॥ ७४ ॥ तीन वोंझळी टाकुन माती । मूहुर्त केला सहजस्थिति । त्रिगुणरहित साधुनि युक्ति । त्रिपुटी क्षीति धन्य नगर ॥ ७५ ॥ उदक असावे या अर्थे । भुमिसि स्पर्शिला स्वामिनि हस्त । काय उशिर मग तयाते । श्रीगंगेते प्रगट व्हावया ॥ ७६ ॥ कोलिंबराजयोगीयानें । भागीरथीसि काढिले जटेतुन । तयापरि श्रीनाथजीनें । कौतुक जनिं केले पै ॥ ७७ ॥ कीर्ति फाकता भूमंडळिं । आले भार्गव ते वेळीं ।

धावडसी भली स्वस्थान ज्याचे ॥ ७८ ॥ गोपाळनाथाचि आज्ञा घेउन ।

तळें बांधिले भार्गवरामानें । गोपाळतीर्थ ह्मणति जन । होति पावन ज्या स्नानें ॥ ७९ ॥ कुसुंब्यासारिखें दिसावें जळ । परि ठाईंचें स्वच्छ निर्मळ । याचें कारण मूळ परिसिले । पाहिजे सकळ चतुरज्ञे ॥ ८० ॥ नागेंद्रसर्प तयाचा हार । घालिति सदा गिरिजावर । नागनाथ तोचि अवतार । साधु थोर भूमंडळीं ॥ ८१ ॥ पुन्हा अणखि जगदोद्धारा । नागेश जाहाला गोपाळ खरा । आंगीं चिन्हें तो निर्धारा । नाहिं थारा द्वैतासि ॥ ८२ ॥ भांग प्राशन उमाधवा । आवडि बहुत सदाशिवा । तेणें अभ्यास सहजी बरवा । धरि स्वभावा नागेंद्र तो ॥ ८३ ॥ तो स्वभाव गोपाळनाथासी । भांग घ्यावी दिननिशी । घोटा करूनि प्राशनाशि । देति गुरुसि शिष्य सकळ ॥ ८४ ॥ उचिष्टप्रसाद धुवेनि प्याला । तळयामाजि टाकियेला । तो रंग अद्यापि जळाला । पाहाति डोळा जन सर्व ॥ ८५ ॥ असो जे जे करिति समर्थ । भूषण तयासि ते निश्चित । कळयुगीं गोपाळनाथ । अनुभवऱ्येते भूठाईं ॥ ८६ ॥ कोणीयेक समईं प्रतिनिधि । श्रीपतराय जो धर्मबुद्धि । भुमीदान जयानें त्रिशुद्धि । केलें नदिप्रवाह जैसा ॥ ८७ ॥ सकळ द्विजानि तयासि । सुचविलें यज्ञ करावयासि । ते वेळिचे समारंभासि । नये वाणीसी वर्णावया ॥ ८८ ॥ असंख्य मिळाले विप्रोत्तम । देशोदेशिचे पंडित निशिम । उत्छाहा होतसे अनोपम्य । भाग्य परम त्या द्विजाचें ॥८९॥ तव तेथें अकस्मात । सहजी पातले गोपाळनाथ । बाळपिशाच उन्मत । स्थिति विलसत ज्या आंगीं ॥ ९० ॥ पशुहिंसा दृष्टिस पडतां । विस्मय जाहाला नाथजीचित्ता । बोलते जाहाले समस्ता । शिष्ट दीक्षिता ते काळीं ॥ ९१ ॥ ह्मणति पापाचें नाम ठेउन पूण्य । वर्तता तुह्मी निलाजीरेपण । गति कर्माचि अत्यंत गहन । न कळे अज्ञान बाहिर्मुखा ॥ ९२ ॥ हृत्कुंडि ज्ञानहुतांशु । प्रगटुनि विषयद्रव्य तुरवा लेशु । मीपण मेंढा मारिता पशु । यज्ञ सौरसु तरिच पै ॥ ९३ ॥ आतां बकरें मारिलें तें उठवावें । तरिच याज्ञिक समास करावें । नातरि तैसे चि बसावें । न चळावें सर्वथा ॥ ९४ ॥ ऐसें वदोनि गोपाळनाथें । घातिलि शफत

ब्राह्मणाते । तये काळि जोडुनि हात । शरण समस्त द्विज आले ॥ ९५ ॥ अनन्यभावें प्रतिनिधिनि । मिठि घातली स्वामिचरणी । तेणे कृपा नाथजीमनि । अंतःकरणीं उचंबळली ॥९६॥ पशुप्रेतावरूनि हात । फिरविता स्वामि गोपाळनाथ । सजीव होउनि तात्काळ बस्त । गेला वनात चरावया ॥९७॥ नंतर यज्ञविसर्जन । करिते जाहाले सकळब्राह्मण । जयजयकार जाहाला पूर्ण । गाति जन येशासि ॥९८॥ श्रीपतरायप्रतिनिधिनी । स्वहस्तें आसन करूनि । गोपाळनाथासि बैसउनि । केला अर्चानि प्रारंभ ॥ ९९ ॥ प्रेमोदकें चरण क्षाळण । निज आत्माभावें घातिले स्नान । पीतांबर करविला परिधान । उपवित जाण शुद्धभक्ति ॥१००॥ त्रिगुणातीत जाणुनि बरवे । अर्पियले ते जानवे । गंध रेखिले सोहंभावें । सुमन स्वभावे माला ते ॥ १ ॥ सुढाळ अक्षता बुका परिमळ । अर्पण केले तुळसीदळ । अहंबुद्धिसि जाळियेले । धूप सोज्वळ जाहाला तो ॥ २ ॥ अद्वयप्रकाश दीप उजळिला । सर्वात्मता नैवेद्य केला । त्रयोदश गुणी तांबुल दिधला । नाथगोपाळा श्रीगुरुसि ॥ ३ ॥ स्वरूपानुसंधान लक्ष लागतां । दक्षणा जाहाली तीच तत्वता । सुकृत फळासि निवेदिता । मंगळ सर्वथा आरती ते ॥ ४ ॥ अखंडाकार मंत्रपुष्प । वाहिले निरंतर आमुप । प्रदक्षणा करितां लोपे । दृश्य सर्परज्जु तो ॥ ५ ॥ आत्मनिवेदन तोचि नमन । साष्टांगेसी जाहाले पूर्ण । जेथें पूज्यपुजकपण । गेले विरोन नाथपदिं ॥ ६ ॥ ऐशा प्रकारें पूजा होता । संतोष जाहाला गोपाळनाथा । चरणावरि ठेविला माथा । श्रीपतरायपंतप्रतिनिधिनि ॥ ७ ॥ पुढें कथा अति रसाळ । परिसोत पंडित श्रोते प्रेमळ । राजारामी वदवी प्रांजळ । सिद्ध दयाळ स्वामि तो ॥ ८ ॥ भक्तमंजरिमालाग्रंथ । श्रवणेंचि पुरति मनोरथ । गोपाळनाथचरित्राते । अध्याय होत द्वितीय पै ॥१०९॥ अध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमें अध्याय शेचाळिसावा ॥ ४६ ॥ समाप्तः ॥



## अध्याय ४७

## — गोपाळनाथ —

( पुढें चालू )

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजि सद्गुरुनाथा । आदिपुरुषा त्रिगुण रहिता । स्फुरद्रूपीणि तुझी सत्ता । चेष्टवी तत्वता जडदेह्या ॥ १ ॥ गोनाम इंद्रिया पालन । करितां स्वामिया तूंचि जाण । यालागी नाम गोपाळ सघन । वित्पत्ति पूर्ण ते साजीरि ॥ २ ॥ नातरि ठाईचे अरुप अनाम । निर्विकार जे परब्रह्म । तेथे कैचा द्वैतभ्रम । अनिर्वाच्य परम श्रृति ह्मणती ॥ ३ ॥ परि जयाचा सहज विलास । निर्गुणी सगुण भासतसे । जेवि आकाशी स्फुरतसे । वायुविलास तेथेंचि तो ॥ ४ ॥ आसो ती खूण बोलू जातां । मना होतसे तादात्म्यता । यास्तव चरणीं ठेविला माथा । येकाग्र चित्ता करूनी ॥ ५ ॥ मागील अध्याई गोपाळनाथें । पशुप्रेत उठविले यज्ञाते । पुढे लीला जाहाली श्रोते । अनुक्रमें ते श्रवण करा ॥ ६ ॥ त्रीपुटिसी असता नाथगोपाळ । अपूर्व वर्तलें तेथें नवल । जळकें काष्टपल्लव फुटले । कैसें जाहाले परिसिजे तें ॥ ७ ॥ कोणीयेकसमई शैत्यकाळीं । नाथजी अंगि हुडहुडि भरली । शेकावयासी धुणी केली । प्रज्वाळली अगटी ते ॥ ८ ॥ तये वेळीं शिष्य सर्व । घालीत होते द्राक्षासी मांडव । चवकाष्ट बरव । सांगती सर्व नाहीं ह्मणूनी ॥ ९ ॥ तेव्हा गोपाळनाथानीं कौतुकें । हातीं घेतले लाकुड जळकें । मंडपासी उभे करितां निके । पल्लव सडक फुटले तयासी ॥ १० ॥ तो वृक्षा अश्वत्थ जाला । नाव चिंतामणि ठेविले तयाला । पुर्वीतसे चिंतिले अर्थाला । पाहाती लीला जन सर्व ॥ ११ ॥ ऐसा स्वामीमाहासमर्थ । नागनाथ अवतार गोपाळनाथ । प्रताप जयाचा अद्भुत । ध्यान शोभत अनोपम्य ॥ १२ ॥ नवविधमेखळा आंगीं साजे । फेटा मस्तकीं ज्ञान विराजे । कौपीन सदृढ पाहुनी लाजे । ब्रह्मचर्य सहज तिष्ठतसे ॥ १३ ॥

देहबुद्धीची करूनी राख । भस्म चर्चिलें तें सुरेख । वरी रेखिला सुंदर टिळक । जेवी शशांक उजळिला ॥ १४ ॥ सोहं अग्नी चेतउनि । कर्मकाळाची जाळिती धुणी । पवित्रक्षेत्र त्रिपुटिस्थानीं । चिन्मय खाणी गोपाळ ते ॥ १५ ॥ भगटींतील तये काष्ठ । ज्ञानानळें पेटलें जें स्पष्ट । अनुभव कोंभ तया चोखट । ज्ञाननिष्ठ वृक्ष तो ॥ १६ ॥ भग(व)द्विभूति पिंपळ भला । कीर्तिरूपें विस्तीर्ण जाला । चिंतामणी नाम पावला । अचिंत्य ययाला नेहतसे ॥ १७ ॥ त्रिगुणातित जे का त्रिपुटी । गुरु-भक्त पाहाती सदादृष्टि । गोपाळनाथी सहजी भेटी । न पडे तुटी कदापि ॥ १८ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता आणि ध्यान । पाहातां पाहाणें सारुन । उर्वरित सघन जे कां पै ॥ १९ ॥ स्थूळसूक्ष्म देह कारण । आकार उकार मकार जाण । रक्त श्वेत श्याम पूर्ण । रंगातीत निर्गुण निरंजन जो ॥ २० ॥ ईडापिंगला सुशुम्ना । भेदुनी जाती योगी जाणा । गोपाळनाथ तये स्थाना । बैसले आसना त्रिपुटिसी ॥ २१ ॥ त्वंपद तत्पद असिपद । जीवशिव ऐक्य प्रसिद्ध । शुद्धस्वरूप सच्चिदानंद । उत्तम शुद्ध पुरूष तो ॥ २२ ॥ असो जें जें बोलावें तें । त्रिपुटि-स्वरूप स्वयंभ निरुते । तद्विलक्षण गोपाळनाथ । पाहाती संत त्रिपुटिसी ॥ २३ ॥ अनुभवसिद्ध शिरोमणी । ग्रंथ केला स्वामीनीं । श्रवणमात्रें जाय गळोनी । अहंकार जनीं तात्काळ ॥ २४ ॥ जगदोध्दारार्थ अनेक । अभंग पदें केलीं सुरेख । ऐकतां स्वात्मसुख । प्राप्त निके होय जीवा ॥ २५ ॥ गोपाळनाथ गुरुमाउली । जगदोध्दारार्थ प्रगट जाहली । दोषी मार्गाते लावियेली । ऐका भली कथा ते ॥ २६ ॥ दशनामसंन्यास कलीठाई । भ्रष्ट जाले सकळ गोसाई । दुराचरण करिती पाही । आचार देही बुडविला ॥ २७ ॥ टाकोनी संसार धर्म-पत्नी । भगवे घेती शिखा मुंडोनी । सेखी अधर्म पाळिती जनीं । करिती निशिदिनीं व्यापार ॥ २८ ॥ आचारविचाररहित । जाहले गोसावी विषई उन्मत्त । एतद्विषई गोपाळनाथ । शिक्षा करित तयाशी ॥ २९ ॥ उपदेश देउनी बहुतेकाते । मेळविले निजपदाते । सांप्रदाय

शुद्धपंथ । गोसावियाते दाखविला ॥ ३० ॥ आणिक येक गोष्टी नवल । समुद्रांतील झाज काढिले । ऐकतांचि संकट वितुळे । होय सकळकार्यसिद्धी ॥ ३१ ॥ खानदेशांतील सावकार । नाथजीचा शिष्य साचार । जिनस भरावया निर्धार । गेला समुद्रतीराशी ॥ ३२ ॥ बहुत द्रव्य खर्चोनी जाणा । गलबतांत भरला जिनसाना । वाहावले बंदरीं लागतांना । सागरजीवनामाजि पै ॥ ३३ ॥ तेव्हा येकचि आरोळी जाहली । सकळ मनुष्यें घाबरलीं । चित्तीं स्मरली गुरुमाउली । हृदयकमळीं अनन्य ॥ ३४ ॥ तव इकडे गोपाळनाथ । पूजासनीं बैसले होते । शिष्यमंडळीसमवेत । त्रिपुटिस्थानांत संध्येशी ॥ ३५ ॥ प्राणायाम करितेसमई । नाथजीस समजले हृदई । घेतलें वस्त्र मुखावरी पाही । वरीली देही तटस्तता ॥ ३६ ॥ माहाराज बैसले चित्रवत । आंगावरी घेतली बुंथ । घाबरले शिष्य समस्त । करीत श्रवणांत पांचजन्य ॥ ३७ ॥ न होये नाथ सावध परी । काष्ठवत जाहलीं इंद्रिये सारी । झाज काढूनी देह्यावरी । भवतमारी मग आले ॥ ३८ ॥ वर्तमान पूशितां सर्वांनीं । वस्त्र पिळूनि दाविले नाथजीनीं । शिष्यमंडळी घालितां वदनी । क्षारत्व जीवनीं सहजी ते ॥ ३९ ॥ ह्मणती झाज काढावयाते । गेलों होतों समुद्रांत । याचा प्रत्यय तुह्माते । कळेल सत्य दीडमहिन्यानें ॥ ४० ॥ गोपाळनाथ सांगतां ऐसें । विस्मय जाहाला सर्वत्रांस । तो सावकार आला त्रिपुटीस । दीडमास होतांचि ॥ ४१ ॥ वस्त्रभूषणें अमोल्यरत्नें । श्रीगुरुराया केली अर्पण । जेवविले असंख्य ब्राह्मण । उत्साह जाण केला बहु ॥ ४२ ॥ धन्य स्वामी गोपाळनाथ । अगाधलीला ज्याची समर्थ । न वर्णवे वाचेहाते । केले कृत्य अमानुषी ॥ ४३ ॥ आज्ञा घेवोनी मग तो शिष्य । गेला आपुल्या स्वदेशास । नाथसाहेब आषाढीस । पंढरीस आले पै ॥ ४४ ॥ सकळ संतांशीं आनंद जाहला । प्रेमें दाटला घनसावळा । आलिंगन दिधले नाथगोपाळा । वर्णितां सुखाला अनुपम्य ॥ ४५ ॥ वडवाळसिद्धनागेश । जो कां अवतार पूर्णशेष । पुन्हां जन्म भक्तिमिसें । गोपाळ

विलसे तो चि पै ॥ ४६ ॥ तेथें पाहतां कैचें द्वैत । मूळी येक शेष
अनंत । जो का जाहला विभक्त । भिन्न दिसत तयाशीं ॥ ४७ ॥
असो पंढरीनाथ गोपाळा । ह्मणती करा गोपाळकाला । उभे केले
कीर्तनाला । नाथजींला देवानीं ॥ ४८ ॥ मग ते वक्तृत्व सांगणें
किती । भगवान स्वयें नवल करिती । निंबलोण उतरिती । रुक्मिणी
शक्ति आदिमाया ॥ ४९ ॥ सांग होता गोपाळकाला । प्रसाद सर्वां
प्राप्त जाहला । घालवीत आले नाथगोपाळा । स्वस्थानाला पांडुरंग ॥५०॥
देवभक्त येकपणीं । वास केला त्रिपुटिस्थानी । नित्य उत्साह सदा जनीं ।
चक्रपाणी जवळी त्या ॥ ५१ ॥ कीर्तनभजन पुराणश्रवण । त्रिपुटीक्षेत्रीं
होतसे जाण । नित्यनेम अन्नदान । आतिथ्य करणें सर्वांचें ॥ ५२ ॥
गुरुवार येता आनंदाने । नाथ करिती गुरुपूजन । रात्रौ होतसे
जागरण । शिष्य मिळोनी सर्वत्र ॥ ५३ ॥ तव तेथें ब्राह्मण येक ।
येतां जाहला रात्रौ छळक । गोपाळनाथस्वामी देख । बैसले सुखें
ध्यानस्त ॥ ५४ ॥ मूळमाया स्फुरद्रुपिणी । प्रघट करूनि हृदयभूवनीं ।
सत्राविचे मध्य काढुनी । नैवेद्य भवानी होतसे तो ॥ ५५ ॥ वध करूनी
मीपण पशूस । ताटीं भरिले शुध्यमांस । सोहंबीज मंत्र घोष । सदा
होतसे आराधना तें ॥ ५६ ॥ विप्र पातला ऐशीयांत । ह्मणे पूजा
द्रव्य दाखवा माते । भ्रष्टाकार दिसतो येथें । ऐसें वदत स्वामिते ॥५७॥
गोपाळनाथ ब्रह्मचारी । सिध्दिशुद्धि ठाउकी निर्धारी । बीजमंत्र पदार्थां-
वरी । सिंचन करी उदकाते ॥ ५८ ॥ तात्काळीक मांसाचीं फुलें ।
मद्याचें दुग्ध जाहलें । उघडोनी पात्र तया दाविलें । ब्राह्मण भ्याले
तात्काळ ॥ ५९ ॥ पश्चात्ताप होवोनी मनीं । विप्र लागले स्वामी-
चरणीं । निसंशय होता जनीं । निर्गुणसदनीं पावला तो ॥ ६० ॥
परि हे योग्य गोपाळनाथाशी । अनुचित गोष्टी इतर जनाशी ।
मद्यमांस देती शिष्याशी । निश्चयेंशी नर्क तया ॥ ६१ ॥ मागील
ऐकोनी पुढें भ्रमली । भ्रष्ट जाहली सकळमंडळी । यालागीं मजला
आज्ञा केली । गुरुमाउली सिध्दनाथें ॥ ६२ ॥ अहिंसा तो धर्म शुध्द ।

मद्यपान हें निषिध्ध । ऐसें बोलती आत्मविद । स्वमुखें गोविंद गीतेशी ॥ ६३ ॥ उगीच करिती भगवी वस्त्रें । मुद्रा रेखिती अपवित्रें । गोविती शिष्य देउनी मंत्र । ज्ञानविच्यार कैंचा तो ॥ ६४ ॥ घेउनी तुळसीच्या काष्टमाळा । भुषण मिरविती आपुले गळा । भूतदयेच्या नामे बोंब सोहळा । भिक्षुक मेला द्वारीं तरी ॥ ६५ ॥ येकंकार करोनि देखा । कवळ घालिती येकमेका । काय ह्मणावें ऐसें मुर्खा । गुरुशिष्य लोका घरोघरीं ॥ ६६ ॥ आच्यारविच्यार नाहीं जेथें । भगवत्प्राप्ति कैंची तेथें । येतद्विषई श्रीगोपाळनाथ । देह्य धरीत पुन्ह पुन्हां ॥ ६७ ॥ ते ते कथा प्रथक चरित्र । वर्णवितील स्वामी पवित्र । सांप्रत ऐका हे चि श्रोत्र । अद्ध्यान क्षेत्र त्रिपुटिचें ॥ ६८ ॥ कोणी येके दिवसी निरेचे तीरीं । बैसले होते गोपाळ निर्धारीं । येकांतवासी ब्रह्मच्यारीं । स्थिति अंतरी भजन करित ॥ ६९ ॥ छळण करावयासी तेथें । अप्सरा पाठविली अमरनाथें । हावभाव दाउनी समस्त । नेत्रे न्याहाळीत कामकटाक्षें ॥ ७० ॥ नानाविध भाषण करूनी । उभी ठाकली जैसी मोहीनी । परि नाथजी स्वस्थ मनी । उत्तरवाणी न बोलती ॥ ७१ ॥ निर्विकार शुकापरी । गोपाळनाथ आसनावरी । पाहुनी ऐसें नमस्कारी । चरण धरी देवांगना ॥ ७२ ॥ अनन्यभावें होतां शरण । उपदेश दिधला तयेसी जाण । श्रीगुरुकृपें जाहली पावन । उद्धरोन गेली ते ॥ ७३ ॥ तव इतुकीयात पर्जन्य । बहुत वर्षला तेथें जाण । तये काळी त्रिपुटिहून । यात्रा जन आले होते ॥ ७४ ॥ केशरकरीण राणुबाई । शिष्यमंडळी समुच्यई । अंतःकर्ण वेधले पाईं । उद्विग्न हृदईं भेटिसी ॥ ७५ ॥ तो असंभाव्य आले जळ । गंगेत बैसले श्रीगोपाळ । जावया तेथे उपाय न चले । देती सकळ आरोळया ॥ ७६ ॥ मेघासाठीं जैसा च्यातक । कृपा भाकी दीन रंक । त्रिपुटीचे तैसे लोक । स्तवन निके करिती पै ॥ ७७ ॥ दीनदयाळ नाथजी समर्थ । उदकावरूनि आले चालत । अद्भुत जयाचें सामर्थ्य । सरस्वतीते न वर्णवे ॥ ७८ ॥ जयजयकार शिष्यें केला । मिठी घातली दृढ

चरणाला । घेउनि आले त्रिपुटीला । दीनदयाळा श्रीगुरुतें ॥ ७९ ॥ सत्‌शिष्य महाभाविक । ज्ञातीचा यवन होता येक । येकविध जो उपासक । सुलतानशक नाम तया ॥ ८० ॥ गोपाळनाथस्वामिपाइं । निशीम भक्ती ज्याची पाही । माळावरी कृष्णाबाइ । प्रगटविलि ठाइ जयानें ॥ ८१ ॥ परिसा तयाचें कारण । संक्षेपयुक्ति होईल कथन । आयुष्य सारिलें सेवेंत जेणें । नवविधभजन सद्गुरुचें ॥ ८२ ॥ सेवटीं देहावसानसमय आला । संतसमुच्चय भोवता मिळाला । कृष्णातीरीं समाधीला । प्रश्न केला शकसुलताना ॥ ८३ ॥ तये काळीं शेकसुलतान । सर्वत्रासी बोलती वचन । सकळतीर्थें वसती जाण । नाथचरण ते त्या ठाया ॥ ८४ ॥ तैसीयांत कोण्ही छळक । बैसला होता अभाविक । म्हणे येथें कृष्णोदक । प्रगटवा निके यास्थानीं ॥ ८५ ॥ तात्काळ तेथे शेक सुलतान । माळावरी करी खनन । कृष्णाबाई आली जाण । यवन धन्य गुरुभक्त तो ॥ ८६ ॥ अद्यापि तेथें त्रिपुटीसी । कुंड पाहाती जन दृष्टीसी । खडुळपाणी येता कृष्णेसी । कृति तैसी होय तेथें ॥ ८७ ॥ अनेक असे पाहातां शिष्य । वर्णितां मती न पुरे ग्रंथास । ठाइं ठाइं करून वास । उध्दरिले जगास नाथानीं ॥ ८८ ॥ लोकत्रई धन्य समर्थ । जो का स्वामी गोपाळनाथ । सांप्रदाय जयाचा पंथ । जगीं विख्यात भूठाइ ॥ ८९ ॥ अनेक लीला करूनी । समाधिस्त जाहाले त्रीपुटिस्थानी । पुण्यतीथि कोण ते दिनीं । ऐका श्रवणी ते सकळ ॥ ९० ॥ सोळाशे शके शालिवाहान । अठ्याऐंशी वरुति संख्या पूर्ण । व्ययनाम संवत्सर जाण । वद्यश्रावण अमावास्या ॥ ९१ ॥ शुक्रवार प्रात:काळीं । जाहाली समाधी त्रीपुटिस्थळीं । पुष्पवृष्टी तयेकाळीं । बहुत केली सुरवरानीं ॥ ९२ ॥ प्रत्यक्ष पाहिले संत डोळा । माहानप्रकाश पडला उजेला । मूर्छा पातली ईतर जनाला । समाधि वेळा नाथाचे ॥ ९३ ॥ घणघणा वाजती स्वर्गी घंटा । गोपाळ गेले निज वैकुंठा । वारा सुटला तेव्हा मोठा । धन्य निष्ठा गुरुभाक्ति ॥ ९४ ॥ ऐशापरी चमत्कार ।

पाहाते जाले नारीनर । सेविले जेंव्हा निर्गुणमंदिर । श्रीगुरुवर गोपाळ-
नाथें ॥ ९५ ॥ उत्छाहा होतसे नेमेसी । प्रतिवर्षी श्रावणमासीं ।
अन्नदान सर्वत्रासी । अठरावर्णासी समसाम्य ॥ ९६ ॥ देशोदेशींचे
मिळती संत । अहोरात्र कीर्तन होत । गोपाळकाला अत्याद्भुत । प्रगट
होत भगवान पै ॥ ९७ ॥ जे जे अर्थ जयाचे मनीं । ते ते पुरवीं
कैवल्यदानी । पावन होती समाधी दर्शनीं । माहात्म प्राणी कृतघ्न ते
॥९८॥ प्रदक्षणा अनुष्ठान । तेणें पळती समंध जाण । सकळ कामना
होती पूर्ण । सद्गुरुचरण पाहाती ते ॥ ९९ ॥ तीन अध्याय त्रिपुटी
कथन । यथामति केलें वर्णन । सांप्रदाइ तया नमन । अनुक्रम पूर्ण
सर्वासी ॥ १०० ॥ आत्मानुभवि जे जे जाहाले । अथवा होणार जे
कां पुढील । गोपाळनाथी अनुसरले । वंदन केले तयासी ॥ १ ॥
सिद्धस्वामि कृपा पूर्ण । तेणें ग्रंथासी जाहाले स्फुरण । राजारामी
अंतःकर्ण । वेधिलें मन गुरुरायें ॥ २ ॥ गोपाळनाथचरित्रासी ।
आख्यान आले पूर्णतेसी । पुढे अवधान संतकथेसी । येकाग्रमानसीं
श्रोते पै ॥ ३ ॥ तीन अध्याय हेचि त्रिपुटि । ज्ञानी पाहाती दृष्टी ।
पुढे भार्गवसंतगोष्टी । कथा गोमटी ते ऐका ॥ ४ ॥ भक्तमंजरी-
मालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । गोपाळनाथचरित्राते । कथा
समाप्त तीन अध्याई ॥ १०५ ॥ अध्याय ॥ ३ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे
अध्याय सतेचाळिसावा ॥ ४७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ राजारामी सिद्धनाथ
प्रसन्न ॥ ४७ ॥

---

## अध्याय ४८

### — भार्गवस्वामी —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजी सकळ
आद्या । पुराणपुरुषा वेदवंद्या । निज आत्मया सद्गुरुसिद्धा । परमपद
दावि तूं ॥ १ ॥ तव कृपेचें महिमान । काय वर्णूं मी दुर्बळ दीन ।

सिविध्व मेळें हारपोव । शिवित्व जाण मज कैचे ॥ २ ॥ क्षरक्षरातीत । उत्तम पुरुष निभ्रांत । अपीआप ब्रह्म सनाथ । केले निश्चित निजलीळे ॥ ३ ॥ तेथें काय उत्तीर्णता । अनन्य चरणीं ठेविजे माथा । मुकावल्या शृति बोलतां । तें तत्वता स्वरूप तुझें ॥ ४ ॥ नाशिवंत उपच्चार । काय अर्पिजे हे पामर । वोवाळावे शरीर । हेंचि बरं पायावरुनि ॥ ५ ॥ माझेपणा करूनि दुरी । अवघाचि नटला श्रीहरि । काय वदूं मी वैखरी । नाहीं सरी दुजी ते ॥ ६ ॥ उमस खाउ नेदी स्थिति । विरोनि जातसे स्वरूपीं वृत्ति । परी मनीं आवडे भक्ति । कृपामूर्ति स्वामिया ॥ ७ ॥ यालागी तुर्यस्त मज करावें । दास्यत्व कांहीं तें घडावें । कडिबाळ मुळींचा स्वभाव । ठाईं पाहावे गुरुमाये ॥ ८ ॥ प्रार्थना परिसोनि श्रीसिद्धेश । चेईरे केले इंद्रियास । वदविती संतलीळेस । सच्चिदविलास जगद्गुरु ॥ ९ ॥ ते कथा अनुभवनिष्ठ । ऐकतां हरती जीवाचे कष्ट । श्रवणेंद्रिया लागे मिष्ट । पातक नष्ट होती पै ॥ १० ॥ चिरंजीवामाजी मुगुटमणी । भार्गवराम जो सातवा जनीं । संतस्वरुप तेणें धरुनी । सकळ प्राणी उद्धरिले ॥ ११ ॥ ते गाथा परम चोखडी । नाशी आद्य सकळ उतरंडि । श्रवणमात्रें पैलथडी । तेचि घडी पावती जीव ॥ १२ ॥ घ्यावयाते तया जन्मा । कारण हेंचि पै तया रामा । सद्गुरुभक्ति अगाध महिमा । थोर प्रेमा हृदईं तो ॥ १३ ॥ आणीक हेतु भार्गवमनीं । अवतार घ्यावया मेदिनी । ऐकावें तें शिष्ट जनीं । विचक्षणी सकळीके ॥ १४ ॥ पितृ आज्ञेवरुन । मातृवध घडला जाण । प्रायश्चित्त तें कराया जाण । कळींत घेणें जन्म पै ॥ १५ ॥ सातवी चिरंजीवपदवीचा । दवडावया अभिमान साचा । समागम कराया संताचा । जन्म तयाचा भूठाईं ॥ १६ ॥ कीं चिरंजीव असतां श्रीमारुति । रामदासनामें अवतार क्षिती । यालागी भार्गव आले जगतीं । आपणहि भक्ति करावया ॥ १७ ॥ किंबहुना संतपदवी । दुर्लभ देवी आसुर मानवी । म्हणुनी सेविली रामें उर्वी । ज्ञानरवि उगवला ॥ १८ ॥ असो भार्गवाचा अवतार । कळींत जाहाला साचार ।

ऐकता ते चरित्र थोर । दोष सारे जाती पै ॥ १९ ॥ वऱ्हाडदेश-
माझारी । दुधेवाडी नाम नगरी । तेथील ब्राह्मण साचारी । अश्वलायन
वरी शाखा ते ॥ २० ॥ तपोनिधि तो ऋषि पवित्र । जमदग्नि जयाचें
गोत्र । आरक्त दिसती सदा नेत्र । रेणुका कलत्र नाम्नी ते ॥ २१ ॥
प्रत्यहि मागोनी कोरान्न । करावे सांग पंचमहायज्ञ । ऐशापरी तो
ब्राह्मण । जामदग्न्यमुनि पै ॥ २२ ॥ जन्मांतर जाणुनी तयाचें परम ।
उदरा आले परशराम । ठेविते जाहालें तें चि नाम । अतिप्रेमें मायबापें
॥ २३ ॥ उदय पावल्या तमांतक । चढे प्रकाश अधिका अधिक ।
दिवसोदिवस वाढतां देख । बुद्धि सुरेख त्याभार्गवा ॥ २४ ॥ अष्टमवर्षी
व्रतबंध । करितां जाहाला पिता शुद्ध । प्राप्त जाहाले च्यारवेद । न करी
प्रसिद्ध अभ्यास तो ॥ २५ ॥ चतुर्विध वाचेचा भार्गव ईश । तेथे कासया
पाहिजे अभ्यास । पुराणें तीं अष्टादश । शास्त्र विशेष सकळहि ॥ २६ ॥
मातापितृसेवा करणे । हे तो वांछा मुळीची जाण । भार्गवमनीं हेतु
पूर्ण । जननी भजन करावया ॥ २७ ॥ रात्रंदिवस जवळी तिष्ठती ।
आज्ञा कदा नुलंघिती । मायबापे जें मागती । तें तें देती तात्काळ
॥२८॥ पादसंवाहनादि धर्म । करिती आवडी भार्गवराम । ब्रह्मचर्य ज्याचा
नेम । जेवि भीष्म तयापरी ॥ २९ ॥ वैराग्यभाग्य जेवि संपदा । तेथे
कैंचि दैन्य आपदा । शांतिक्षमा लागती पदा । निजआत्मपदा रमले जे
॥ ३० ॥ ऐशाप्रकारें द्वादशवर्षे । वय वेचलें पितृसेवेस । मग उभयता
निजधामास । गेली संतोष पावोनी ॥ ३१ ॥ तयेकाळीं भार्गवराम ।
शोकाकुळीत जाहाले परम । उत्तरविधान केला धर्म । यथोक्त नेम
जनरीती ॥ ३२ ॥ सहज वैराग्य भक्तिचे आंगीं । चईन न पडे कोठें
जगीं । निघते जाहाले तीर्थालागीं । अनुतापरंगी धगधगीत ॥ ३३ ॥
नाना क्षेत्रें नाना स्थानें । पर्वत दऱ्या निबिडवनें । ठाईठाई देवता
नमोन । साधुदर्शनें घेतलीं पै ॥ ३४ ॥ परी ह्रदईं न पडे स्वस्थ ।
वांछितसे स्वरूप प्राप्त । पश्चात्तापें तापलें चित्त । धन्य संत भार्गव ते
॥ ३५ ॥ राजोरी नामें पवित्र नगर । उत्तमस्थळ पाहुनी त्वरें ।

मांडिलें ते आचोर । अनुष्ठान साचार ते ॥ ३६ ॥ मिरशांगाचा करुनि कुंटा । तोचि खावा मटमटा । गोमुत्र प्यावें घटघटा । आराधिला चोखटा ईश्वर पै ॥ ३७ ॥ द्वादशवर्षे पाशुपत । आचरिला तो भार्गवसमर्थ । भार्गवशिवा कैचें द्वैत । भक्तिपंथ दाविला परी ॥ ३८ ॥ असो श्रीसांबानी । प्रत्यक्षता दर्शन देउनी वरंब्रूही ह्मणूनी । वरदपाणी ठेविला शीरी ॥ ३९ ॥ तयेकाळीं फरशुधर । न लगे ह्मणती कांहीं वर । आत्मज्ञान पाहिजे प्रखर । हें चि खरें देणें मज ॥ ४० ॥ ऐसें वदतांचि श्रीभार्गवें । प्रसन्न जाहाले सदाशिव । ज्ञानेंद्रस्वामि यति बरवे । शरण जावे ह्मणती तया ॥ ४१ ॥ ऐसे सांगुनी शुळपाणी । अदृश्य जाले तये स्थानीं । भार्गवे तया आज्ञा वंदुनी । राजोरीहुनी निघाले ॥ ४२ ॥ भजन करीत आनंदेसि । गेले ज्ञानेंद्रस्वामीपासी । अनन्यभावें नमनासि । प्रार्थनेसी करिती पै ॥ ४३ ॥ ह्मणती मजला सनाथ करावे । पदरी दीनासी तुह्मि घ्यावे । सस्वरूपीं मेळवावे । दास्यत्व घडावें परमप्रिती ॥ ४४ ॥ भवार्णव हा दारुण । कामादी जळचरें ग्रासिती जाण । विषयमुखाते पसरोन । बळेंचि धरून बोढिति पै ॥ ४५ ॥ वाहावले या मायाजीवनीं । धाव पाव कैवल्यदानी । ज्ञाननौकेंत बैसउनी । आत्मभुवनी पाववी मज ॥ ४६ ॥ दया भाकितां ऐसेरितीं । कृपेनें द्रवली श्रीगुरुमूर्ति । हास्य करुनि परमप्रिती । भार्गवाप्रति अवलोकिले ॥ ४७ ॥ ह्मणती भवभयापासून । आतांचि मुक्त करितों जाण । कायसें तम आज्ञान । होतां ज्ञानसूर्योदय ॥ ४८ ॥ मग सांप्रदायानुसारें । उपदेशिला तो भार्गव त्वरें । मस्तकीं ठेवितां कृपाकर । अनुभव प्रखर जाहाला पै ॥ ४९ ॥ तत्वमसि माहावाक्य । दक्षणकर्णीं सांगतां निके । ज्ञानेंद्रस्वामि समर्थ देख । लाधले सौख्य शाश्वत तें ॥ ५० ॥ आधींच सुवर्ण बावन्नकशी । वरी रत्नें जडलीं त्यासी । मग तया अळंकारासी । काय उपमेसी देणें तें ॥ ५१ ॥ कीं उत्तम कण सुभूमिके । सहजीं उत्कृष्ट तेथीक पिक ।

भार्गवराम सत्शीष्य देख । सद्गुरु सुरेख ज्ञानेंद्र तो ॥ ५२ ॥ पद्मकर ठेवितांचि शीरीं । प्रगटला तेथें ज्ञानकेशरी । निर्दाळिला तो भ्रमकरी । येकसरी तात्काळ ॥ ५३ ॥ कीं बोध अगस्ति भेटला । भवाब्धीचा घोट केला । कीं ज्ञानवन्हि प्रज्वाळिला । द्वैतवनाला जाळीं तूं ॥ ५४ ॥ असो भार्गवरामासी अनुग्रह होतां । पातली तेथें उन्मनी अवस्था । उमस खाउ नेदी तत्वतां । व्यापिलें चित्ता निजचैतन्य ॥ ५५ ॥ सप्तदीनपर्यंत । राम जाहाले समाधिस्त । मग आणिले देहावरते । सद्गुरुनाथ ज्ञानेंद्र ॥ ५६ ॥ स्वरूपीं असतां संलग्न । तुर्य अवस्थेसी काविलें लग्न । जाग्रती पावला इंद्रियगण । राहाटती तेथें स्वधर्मी पै ॥ ५७ ॥ येकात्मता पिंडब्रह्मांड । करुनी दावितां सद्गुरु प्रचंड । माये अविद्येचे थोतांड । गेले बंड वितळोनी ॥ ५८ ॥ परमहंस तेचि दिक्षा । अहंकृतीची केली रक्षा । ज्ञानामृत सेउनी भिक्षा । पुरवी कांक्षा जीवाची ॥ ५९ ॥ निर्गुण निरंजनवनी । विचरे सदा तो भार्गवमुनि । विवेक कौपीन धारण करूनी । अज्ञान जनी वसन टाकिलें ॥ ६० ॥ वासनाशिखेचे मुंडण जाहाले । यज्ञोपवित त्रिगुण तोडिले । भजनवस्त्र भगवें केलें । आंगीं शोभलें भार्गवाचे ॥ ६१ ॥ ज्ञानाग्नीमाजीं जाळुनी कर्म । चर्चन केलें तेंचि भस्म । येकवटता इंद्रियप्रेम । गोपीचंदन परम तें रेखिलें ॥ ६२ ॥ ययापरी सद्गुरुजवळी । भार्गवें दीक्षा धारण केली । दास्यभक्ति अवलंबिली । गुरुमाउली धन्य ते ॥ ६३ ॥ ज्ञानेंद्रस्वामीचे सेवेठाईं । बहुत वय वेचिलें पाही । संतोषोनी श्रीगुरु आई । कृतार्थ होई ह्मणतसे ॥ ६४ ॥ मग अष्टमासिद्धि जोडुनी कर । सदा तिष्ठती रामासमोर । होउनिया मोक्ष किंकर । पायावर लोळतसे ॥ ६५ ॥ ऐसें जाणुनी सद्गुरुनाथें । आज्ञापिले श्रीभार्गवाते । हिंडुनिया भूमंडळाते । जनोद्धाराते करावया ॥ ६६ ॥ मग आज्ञा वंदुनी आपप्राणि । भार्गवमहाराज आत्मदानि । फिरावयासी निघाले अवनी । विराजीत मनीं भूतदया ॥ ६७ ॥ दत्तात्रयासारिखी मूर्ति । कीं वातात्मज श्रीमारुति । कीं गंगातनय प्रगटलें जगतीं । तैसें दिसती भार्गव ते

॥ ६८ ॥ नातरी परिक्षितीची निर्वाणा । शुकाचार्य निघाले जाणा । तथापरी दीनजना । उद्धरीत नैना पाहातांचि ॥ ६९ ॥ अनाधिकारी श्वपच्यादिक । पावन केले भार्गवें देख । परोपकार सकौतुक । आलौ-किक पाहातां जनीं ॥ ७० ॥ ज्या ज्या स्थळीं जळावीण । प्राणी पावती दुःख शीण । तेथें तलाव बांधिले पूर्ण । वापिका जाण असंख्य पै ॥ ७१ ॥ सिद्धि कोळती रामापाईं । द्रव्यासी तेथें उणीव कांहिं । कोट्यावधी व्यय पाही । गणीत नाहीं खर्चासी त्या ॥ ७२ ॥ सरोवरें तीं असंख्यात । ठाई ठाई भार्गवतीर्थें । वंदनपानेस्नाने जगाते । मुक्ति होत ततक्षणीं ॥ ७३ ॥ धर्मशाला विप्रमंदिरें । देवालयें बांधिलीं शिखरें । वाढविला कीर्तिगजर । इहपरत्र भुवनत्रईं ॥ ७४ ॥ जो जो जयासी पदार्थ व्हावा । तो तो तयासी तात्काळ द्यावा । संतोष करणें सदा जीवा । मनीं भार्गव हेंचि पै ॥ ७५ ॥ भूतमात्रीं अन्नदान । संतसेवा श्रीगुरुभजन । पंढरीसी जावे प्रीति करून । घोष कीर्तन नामाचा ॥ ७६ ॥ भार्गवकथेची अगाध प्रौढी । देवची केला जेणें बराडी । कीर्तनरंगीं घाली उडी । लवडसवडी पांडुरंगें ॥ ७७ ॥ मग तेथें काय पाहाणें । सनकादिक डोलती जाण । पंढरपुरीं तो कीर्तनयज्ञ । दुर्लभ श्रवण देवादिका ॥ ७८ ॥ भार्गवरामस्वामीचा । प्रताप आगळा वक्तृत्वाचा । मौनावल्या चारी वाचा । विवेक ज्याचा अद्भुत पै ॥ ७९ ॥ असो त्रिपुटीसी असतां गोपाळनाथ । तेथें आले हे भार्गवसंत । समागमीं ज्याचे महंत । गोसावी बहुत नम्र ते ॥ ८० ॥ परस्परें होतां भेटी । जेवि मिळाले हरि धुर्जेटी । आत्म-चर्चा बोलती गोष्टी । पडली मिठी स्वानंदीं ॥ ८१ ॥ अनिर्वाच्य तो संवाद । कोण वर्णील तेथिल शब्द । स्वसुखमेळी क्रिडती छंदें । उभय सिद्ध मूर्ति त्या ॥ ८२ ॥ मग त्रीपुटिसी नाथजींनी । ठेउनी घेतले भार्गवमुनि । धन्यस्थान तें मेदिनी । रत भजनीं जीव केले ॥ ८३ ॥ कोणे येके दिनीं गोपाळनाथ । वदती स्वये श्रीभार्गवाते । उदक नाहीं या गांवाते । पावती दुःख बहुत प्राणी ॥ ८४ ॥ यालागी तलाव

करावा । तेणें संतोष सकळ जीवा । तये काळीं तो प्रियशिवा । आले भार्गवा प्रेमभरते ॥ ८५ ॥ ह्मणे नाथजी प्रतापमूर्ति । प्रगटुकरी उदक जगती । मग सहजी करणें निश्चिती । सरोवराप्रति अह्माकडे ॥८६॥ ऐसें वदतांचि श्रीभार्गव । करिते जाहाले नाथ अपूर्व । हृदई स्मरोनी सद्गुरुराव । प्रार्थीले भावें तीर्थासी ॥ ८७ ॥ नमन करुनि क्षितितळीं । माति काढिता तीन वोंझळी । येकायेकी प्रगट जाहाली । जगमाउली श्रीगंगा ॥८८॥ जळप्रवाह देखुनी सर्व । आनंदले सकळजीव । टाळी पिटिली श्रीभार्गवें । गुरुवैभव धन्य तें ॥८९॥ तयातीर्थी स्नानपानें । अथवा कोणी करो मार्जन । तेणें होईजे नर पावन । अघ संपूर्ण लया जाये ॥९०॥ आसो भार्गवरामस्वामियानि । तलाव बांधिला तयेस्थानीं । सुख होतसे पाहाता नैनीं । क्षेत्रमेदिनी धंन्य तें ॥ ९१ ॥ मग कांहींकाळ राहुनी तेथें । निघते जाहाले भार्गवसमर्थ । दक्षणउत्तरमानसतीर्थें । फिरती करीत भूमंडळीं ॥ ९२ ॥ ठाईठाई जीर्णोद्धार । बांधीलीं असंख्य सरोवरें । सुखी केले नारीनर । दर्शनमात्रें करुनी ॥ ९३ ॥ परमहंस-दीक्षा जयाचे आंगीं । धन्य महाराज भार्गवयोगी । वैराग्यप्रौढी दाउनी जगीं । स्वरूपरंगीं मेळवी जीवा ॥ ९४ ॥ दशनामेंसंन्यास गोसावी । भ्रष्टता पावले पाहातां सर्वीं । तयाते शिक्षा करुनी बरवी । आच्यारखी दाविला तो ॥ ९५ ॥ ऐशापरी धर्म स्थापित । मार्गीं दिनें उद्धरित । काशीस गेले श्रीसमर्थ । सद्गुरुनाथ भार्गउ तो ॥ ९६ ॥ संन्यासादिक शिष्टजन । हर्ष जाहाला तयालागून । ठेऊन घेतले प्रीतिकरुन । करुणाघन भार्गवासी ॥ ९७ ॥ तेन्हां कांहीं दिवस ते वरदकर । राहिले काशींत निर्धार । दर्शना येती नारीनर । मुमुक्षु सर्वत्र बद्धादि ॥ ९८ ॥ नामोपदेश आबालवृद्ध । अधिकारीया ज्ञान शुद्ध । करुनि प्रखर आत्मबोधा । ब्रह्मपदा मेळाविती ॥ ९९ ॥ यथाप्रकारें बहुत वर्षें । भार्गवें केला काशींत वास । मग गेले बद्रिकाश्रमास । बहुत दिवस राहिले तेथें ॥ १०० ॥ आसो स्वामि ऐशापरि । हिंडती सदा पृथ्वीवरी । जगदोद्धार करणें अंतरीं । हे चि खरी भूतदया

॥ १ ॥ नाहीं मनीं दुजी हाव । परोपकारीं सदा भाव । धन्य स्वामि श्रीगुरुराव । राम भार्गव बावा ते ॥ २ ॥ सहजस्थिति भ्रमण करीत । गेले परशराम क्षेत्रांत । लीला केली तेथें अद्भुत । ऐका श्रोते ते सकळ ॥ ३ ॥ क्षेत्राजवळ त्या निबिड अरण्य । तेथें चि बैसले भार्गवनिधान । शब्दें करितीं वनचरें जाण । शुकादिक संपूर्ण मयुरें तीं ॥ ४ ॥ व्याघ्र सिंव्ह भयानक । तेहि असती तेथें देख । परी तया दर्शनीं विवेक । लागती मूक पायासी ॥ ५ ॥ ऐसें प्रकारें तया कानना । गुप्तरुपें राहिले वना । तव तेथें पातला जाणा । बाळा सुलक्षणा गौळी ते ॥ ६ ॥ जन्मांतरीचा योगभ्रष्ट। स्वभाव ज्याचा भजननिष्ठ । भार्गवरामाजवळी स्पष्ट । आला सुष्ट सहजी तो ॥ ७ ॥ समागमें गाईचें खिल्लार । आणीक मोठे दोन कुतरे । बोळखी नसतां देखिल्या नर । चावती त्वरें तयासी ॥ ८ ॥ तो अवचिता देखिला श्रीगुरुराणा । भार्गवरामबावा जाणा । अवलोकुनी त्वानें नैना । ठेविली चरणावरि डोई ॥ ९ ॥ बाळागौळी मनीं दचकला । ह्मणे वृत्तांत अघटित घडला। कोण पुरुष न कळे वहिला । ज्याची लीला अद्भुत पै ॥ ११० ॥ मूढयोनी श्वान शुकर। तीहि बोधिली दर्शनी त्वरें । आतां कासया करणें उशीर । भव दुस्तर तरावया ॥ ११ ॥ मग तत्काळीक अनन्यभावें । प्रार्थियेला श्रीगुरुदेव । म्हणे अनाथा पदरीं घ्यावें । उद्धरावे सर्वेशा ॥ १२ ॥ ऐशापरी भाकितां करुणा । कृपा आली सद्गुरुनिधाना । उपदेशिला तेथें चि जाणा । बाळानाम्ना गौळी तो ॥ १३ ॥ पुढील अध्याई चमत्कार । हेचि कथा भार्गवचरित्र । वदविती स्वामि सिद्ध पवित्र । असावें श्रोत्र सिद्ध श्रवणा ॥ १४ ॥ रामदास अवतार सिद्धनाथ । लोकत्रै जो कां समर्थ । राजारामी करुनी कृतार्थ । संतकथे योजिले पै ॥ १५ ॥ ते प्रेमळ आख्यान ऐकावया । आवडी बहुत पंढरीराया । साधुअवतार कारणकार्या । सुचवी हृदया सर्वेचि तो ॥ १६ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । भार्गव-

स्वामी चरित्राते । आध्याय समाप्त प्रथम हा ॥ ११७ ॥ ॥ आध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ श्री ॥ अनुक्रमे आध्याय अठेच्याळीसावा ॥ ४८ ॥ ॥ समाप्तिमगमत् ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ४९
## —भार्गव स्वामी—
( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु पूर्णपरेशा । आत्मयारामा श्रीसिद्धेशा । अजअव्यया अविनाशा। मायाविलासा तुज नमो ॥ १ ॥ चराचरि येकात्मता । व्यापुनि ठेला तु अनंता । नाहीं च कांहीं दुजे पाहतां । काय वृथा बोलणें तें ॥ २ ॥ जेथे शद्बचि होती निशद्ब । सरो गेला द्वैतवाद । आपि आप सच्चिदानंद । श्रीगुरु सिद्ध स्वामि तूं ॥ ३ ॥ तेथें शिष्यत्व पारुषलें । सस्वरुप उचंबळलें । अहं सोहं मावळले । सोलीव भरले चिद्गगन ॥ ४ ॥ कर्मउपासनाज्ञान । येकीयेक मिळालें पूर्ण । निज आत्मता बाणली खूण । मीतूंपण कैचें तें ॥ ५ ॥ परी भक्ति हेचि आवडे । सेव्यसेवकपणा गोड । जन्मोजन्मीं धरुनि चाड । भजन घडे सद्गुरुचें ॥ ६ ॥ जयाभजनें सार्थकता । निजात्मपदीं जाहालो रमतां। तया विसरु कैसा आतां । फावली समता येकसरे ॥ ७ ॥ ऐसा स्वामी सिद्धनाथ । जो का अवतार श्रीहनुमंत । कृपादृष्टि करुनी सनाथ । स्वरूपीं रत पै केलें ॥ ८ ॥ मेळवितां कल्याणपदीं । संतस्तवना प्रसवली बुद्धि । ते चि ऐका श्रोते आधीं । तुटे व्याधी द्वैताची ॥९॥ साधुलीला श्रवणपठणें । प्रत्यक्ष भेटे रघुनंदन । सकळ कामना होती पूर्ण । भाव प्राधान्य येक तया ॥ १० ॥ श्रीभार्गव अवतार संतकथा । वदतसे चरणीं ठेउनी माथा । उद्धरिला जेणें तत्वता । बाळा पाहातां गौळी तो ॥ ११ ॥ मग तयानें गुरुसेवेते । अवलंबिले असें निरुते । वैराग्यशील जाहाला विरक्त । नित्य येत दर्शना ॥ १२ ॥

कंदमूळें उत्तम आणूनी । अर्पण करावी स्वामीचरणीं । झाड लोट तेथें करूनी । जाय सदनीं माघारा ॥ १३ ॥ कायावाचामनोभावें । येक सद्गुरु भार्गव देव । नाहीं दैवत दुजें ठावें । धन्य दैव तयाचें ॥ १४ ॥ असो कोणे येके दिनीं । गौळी आला तो आंबे घेउनी । भार्गवरामें पाहुनी नैनीं । गर्ता खाणुनी ठेव ह्मणती ॥ १५ ॥ परिपक्व जालिया फळें भक्षण । येक दोन दिवसा करु जाणा । ऐसें बोलतांचि केलें नमन । गेला निघोन घरासी ॥ १६ ॥ मग नित्यापरि तो येतां पुन्हा । सुचाविले स्वामीसी फळसेवना । तव तेथें वर्तलें जाणा । भुजंग नैना दिसला तो ॥ १७ ॥ येकायेकी येउनी जवळा । भार्गवामस्तकीं फणा धरिल्या । अंगावरी खेळूं लागला । भयंकर दिसला तो शेष ॥ १८ ॥ हें पाहुनी गौळिये नयनी । भयाभीत जाला मनीं । गांवांत गेला पळुनी । सांगत जनीं सर्वांला ॥ १९ ॥ म्हणे माझा भार्गवसखा । सर्पे भाक्षिले तया देखा । कोण्ही मांत्रिकी हुडकुनी निका । आणितां पैका देईन तया ॥ २० ॥ अटाहास्यें हाका फोडीत । घाबरा जाला असे बहुत । आवजी बल्लाळ हाकीम तेथें । ऐकिली मात तयानें ॥ २१ ॥ लगबगेसी धाउनी त्वरें । मामलत आणि ग्रामस्त नर । पातले जेथें श्रीगुरुवर । भार्गव वीर तया वना ॥ २२ ॥ तव आसनावर श्रीगुरुमूर्त । आंगावरी सर्प खेळत । मस्तकीं फणा दिव्य शोभत । दचकले मनांत सर्वत्र ते ॥ २३ ॥ ह्मणती अपूर्व पाहिलें आजी । मानवी नव्हे हा देव सहजी । अवतरलासे दिनकाजीं । कर्णी ताजी पाहाताहे ॥ २४ ॥ परस्परें आपुल्यांत । बोलती मन ते क्षेत्रस्थ । आवजी बल्लाळ द्विज तेथें । तन्मय चित्तें जाहाला तो ॥ २५ ॥ तात्काळ नमोनी साष्टांग चरणा । पदर पसरिला स्वामिसि जाणा । ह्मणे मजला निजआत्मभुवना । सच्चिदघना मेळवी तू ॥ २६ ॥ अनन्यभावें भाकितां दया । कृपेनें द्रवले श्रीगुरुहृदया । अनुग्रह देउनि तया ठाया । निर्विकिळ काया ततक्षणीं ॥ १७ ॥ द्रिष्टित पडतां निज-द्रिष्टि । हारपोनि गेली असतां सृष्टि । परमपदासी पडली मिठी ।

काय गोष्टी बोलूं ते ॥ २८ ॥ मग जडसमाधी विसर्जून । सहजस्थिति बाणली खूण । अन्वयव्यतिरेक लाधला पूर्ण । देहावरी जाण आणितां पै ॥ २९ ॥ तूर्य अवस्था उद्भवली । आत्मस्थितीं प्राप्त जाहाली । धन्य कृपाळु गुरुमाउली । बाणोनी गेली निजात्मता ॥ ३० ॥ आवजी बल्लाळ जो का विप्र । आज्ञापिती तया सकृपें । ह्मणती आम्हां हे चि पडप । देशाधिप ते चालवी तूं ॥ ३१ ॥ प्राप्त होतां स्वरूपस्थिति । मग तो असो भलतेरितीं । शुभ्रपटाचि काय भिती । सर्वा भूतीं तो जाहाला ॥ ३२ ॥ नातरी उगेचि करुनि ढोंग । बहिरमुख धरिती साधुचें सोंग । व्यर्थचि काय खचोंनी जग । मिरविती अंगें वस्त्र भगवें ॥ ३३ ॥ येक नग्नचि हिंडतीं । वरते हात करुनी राहाती । कोण्ही तीर्था जाउनी येती । किती मिरविति जगामाजीं ॥ ३४ ॥ कोण्ही दाउनि चमत्कार । उपदेशिति रांडापोरें । करुनिया भ्रष्टाकार । करिती अविच्यार विषयाचा ॥ ३५ ॥ असो मूर्खांची काय वित्पती । साधुत्व मुख्य आत्मप्राचिति । भार्गवराम ऐसें बोधिती । आवजीप्रती कृपेनें ॥ ३६ ॥ आज्ञा वंदुनी मग तो विप्र । घरासि गेला निर्धार । परि मनीं सदा विच्यार । स्वरूप सुंदर भोगावया ॥ ३७ ॥ गुरुदर्शना प्रत्यहीं यावे । दास्यत्व सकळ तेथील करावे । कायावाच्यामनोभावे । येक भार्गवस्वामी तो ॥ ३८ ॥ तये काळीं त्या देशाचे । अधिपत्य त्या हापशाचेकडे साचे । आवजी बल्लाळ तयाचें । मामलतीचे विश्वासुक ॥ ३९ ॥ तेणें कोणी येके दिनी सहज्यात । वाचे स्मरला सद्गुरुनाथ । हापशाकडील ऐकुनी दूत । पुसती द्विजाते कोण गुरु ॥ ४० ॥ वदती तेंव्हा सुनिश्चित । सुभेदार आवजीपंत । भार्गवबावा समर्थ । सद्गुरुनाथ आमुचा तो ॥ ४१ ॥ सांप्रत आहे तयाचे क्षेत्री । माहात्म अद्भुत ज्याचे धरत्री । आवलोकितां सहजी नेत्रीं । स्वतंत्री करिती जीवा ॥ ४२ ॥ तया दूते ऐकुनी ऐसें । सांगितले जाउनी हापशास । तये काळी त्याचे मनास । चटपट विशेष लागली ॥ ४३ ॥ ह्मणे आणवा सत्वरगती । पाहू कैसी भार्गवमूर्ति । अवलीया जन बोलती । नवल युक्ति चमत्कार ॥ ४४ ॥

आवजीपंतासी आज्ञा होता । संकट वाटलें बहुतचित्ता । परि उपाय न चले सर्वथा । तया उन्मत्ताप्रभूपुढें ।। ४५ ॥ आवजी विप्र तये वेळी । प्रार्थीतां जाहाला गुरुमाउली । ठेउनी मस्तक दृढ पाउलीं । विनंति केली निजभावें ।। ४६ ॥ ह्मणे स्वामीया संकट हारावें । हपशासी स्वयें दर्शन द्यावें । तरीच माझा वाचेल जीव । नातरी सर्व ब्रीद जाईल ।। ४७ ॥ शिष्यवछळ सद्गुरुनाथ । भार्गवस्वामीसमर्थ । निघते जाहाले तेथुनी त्वरित । जळचरातें भेटि द्यावया ॥ ४८ ॥ समुद्रामधील जे कां बेट । तेथें असे तो हपसी नष्ट । तयासी पावन कराया स्पष्ट । भार्गवशिष्ट पातले ॥ ४९ ॥ भजन करीत कैवल्यराशी । गेले सागरतीरासी । तेथें केलें अपूर्व लीलेसी । चमत्कारासी ऐका ते ॥ ५० ॥ शिष्याहातें केळीचें पान । आणविलें रामें तात्काळ जाण । सागरोदकांत ठेऊन । वरी आपण बैसलेती ॥ ५१ ॥ मग ते पर्णासन नौकेपरी । शोभते जाहाले समुद्रोदरिं । अतिप्रचंड येती लहरी । चालिले परि सरळ तें ॥ ५२ ॥ ऐसे पाहूनि सर्वत्रांनीं । सांगत गेले हपशालागुनी । येतात स्वामी हे जाणुनी । आला निघोन सामोरा ॥ ५३ ॥ मग उदकामाजी परस्परें । नेत्रें पाहिले निर्धारें । दर्शनमात्रें बोधिला त्वरें । आत्ममंदिर पावला तो ॥ ५४ ॥ भार्गवरामाचे अवलोकनें । हपसी जाहाला पावन । विदेहस्थिती बाणली खूण । कुश्चित जाण असतां पै ॥ ५५ ॥ मग तयानें अग्रहार । करूनि दिधलीं ग्रामें फार । तये काळीं भार्गव थोर । अंगीकार न करिती पै ॥ ५६ ॥ म्हणती आम्ही उदासीन । ग्रामासी तुझ्या काय करणें । ऐसें बोलतां श्रीगुरुपूर्ण । हपसी यानें पदर पसरिला ॥ ५७ ॥ तेव्हां मनोभंग न होण्यास्तव । ज्याहागीर घेतली श्रीभार्गवें । भार्गवराम जो क्षेत्रींचा देव । अर्पिली भावें तयासि ॥ ५८ ॥ ती आद्यापि आहे चालत । अन्नछत्र तेथे विख्यात । फरशराम क्षेत्र तें शोभत । पाहाती समस्त जन डोळा ॥ ५९ ॥ ऐसें माहाराज भार्गवराम । अवतारीपुरुष माहान परम । संतवेश धरुन प्रेम । अनुभवधर्म स्थापियेला ॥ ६० ॥ वय पाहाता सारीखे सदा ।

तारुण्य न सरे पाहातां कदा । परब्रह्म वंद्य जें कां वेदा । मुर्ति आद्या तीच भार्गव ।। ६१ ।। जे जे प्राणी द्रिष्टीस पडती । तात्काळ तया उद्धरिती । ऐशापरी हिंडता क्षिती । आले प्रीतीं कृष्णातीरा ।। ६२ ।। तये काळीं राजा शाहु । चित्तासी जाहाला त्याचा आठउ । ह्मणे भार्गवराम पाहू । बोलती बहु जन कीर्ती ।। ६३ ।। ह्मणोनि स्वारी सिद्ध करून । निघाले शाहुछत्रपति जाण । संगे घेतले कारभारीजन । ईछित दर्शन हिंडती पै ।। ६४ ।। तव माहाराज भार्गवस्वामी । रम्य पाहुनी वनांत भुमी । लक्ष ज्याचा निर्धर्मी । बैसले नेमी कृष्णातीरीं ।। ६५ ।। तेथें जाऊनि तो नृपति । दंडवत घालितां जाहाला क्षीति । म्हणे मजला कृपामूर्ति । उद्धरा युक्ति निजलीले ।। ६६ ।। पदर पसरुनि दीनवदनें । उभा ठाकला कर जोडून । तयेकाळीं करुणाघन । बोळला पूर्ण नृपख्यातका ।। ६७ ।। तात्काळीक क्षणामाजी । उद्धरिला तो भूपाळ सहजीं । भार्गवराम भक्तकाजी । उदेला आजी ज्ञानसूर्य ।। ६८ ।। छत्रपतीचें हृदयावरी । बोधप्रकाश दाटला भारी । अज्ञानतमा कैचि उरी । न सुचे वैखरी दृष्टांत त्या ।। ६९ ।। येकायेकी निज्यात्मखूण । बाणोनी जाहाले समाधान । अंतरबाह्य श्रीगुरुचरण । ठेले व्यापून चराचरी ।। ७० ।। धन्य तयाचे जन्मांतर । भक्तिसुखा लाधला नृपवर । चैन न पडे क्षणभर । श्रीगुरुवर पाहिल्याविण ।। ७१ ।। जेथें जेथें जातील स्वामी । दर्शना जावें तेथें नेमीं । छंद अवघा अंतर्यामी । धन्यभूमि गुरुभक्त ।। ७२ ।। मग तेथें काय उणें । मोक्ष घाली लोटांगणीं । जयासी नाहीं सद्गुरुस्मरण । काय ज्ञान तयाचें ।। ७३ ।। भक्तिवीण मिरविती प्रतिष्ठा । ती तो जाणे शुकरिविष्टा । हें तो नावडे कदा शिष्टा । आत्मनिष्टालागीं पै ।। ७४ ।। जया नरा स्वहीत करणे । तेणे धरावे संतचरण । नाहितरि वृथा शीण । सकळ साधन वृतादि ।। ७५ ।। आसो भार्गवरामस्वामिपाईं । राजा शाहु विनटला पाहि । अनन्यभाव संताठाईं । नाहि हृदईं देव दुजा ।। ७६ ।। जे जे साधु दृष्टिस पडति । ते ते मानी श्रीगुरुमूर्तीं ।

विसाउ पातली तेथे भक्ति । धन्य नृपति शाहु तो ॥ ७७ ॥ आधीच राज्य धार्मिक । तयात भेटले भार्गव देख । काय पाहाणे तो विवेक । निष्टा अतर्क्य जयाचि ॥ ७८ ॥ आसो पुढे काळेकरून । भार्गवराज माहाराज पूर्ण । सेविते जाहाले निर्गुणभुवन । ते संपूर्ण ऐकीजे पै ॥ ७९ ॥ तदउछाहा निधनोक्ति । भावे ऐका येकाग्रवृत्ति । वृद्धि होय आयुष्याप्रति । लाहे मुक्ति सहजी त्या ॥ ८० ॥ श्रीकृष्णातिर विरमोडे । ग्राम जे का परमचोखडे । तेथे असता ज्ञानमार्तंड । भार्गव प्रौढ श्रीगुरु तो ॥ ८१ ॥ घालोनि निर्याणयोगासन । बैसले वरि करुणाघन । तव चिति जाह्माली आठवण । घ्यावे दर्शन राज्यास ह्मणोनि ॥ ८२ ॥ तात्काळ शिष्य पाठविला । समयसेवट पत्रिके लिहिला । लगबगेसि तो आला । साताऱ्याला तेचि क्षणि ॥ ८३ ॥ राजमंदिरात जाउन । अभंग केला शिष्ये अर्पण । राजीयाने वंदन करून । अवलोकन केले पत्र ॥ ८४ ॥ मजकुर वाचिता समस्तासी । अश्रु दाटले नयनासि । तयारि करुन त्वरेसि । दर्शनासि निघाले ॥ ८५ ॥ विरवाडग्रामासि येता । अवलोकिले सद्गुरुनाथा । तव देहासि काहि तत्वता । दुखणे सर्वथा नाहिचि ॥ ८६ ॥ स्वथ शरीर पूर्ववत । बैसले आहेत आसनावरुते । ऐसे देखोनि राजा वदत । जोडुन हात भार्गवरामा ॥ ८७ ॥ दिनदयाळ गुरुमाउली । मज अनाथा तु साउली । पत्रीका ऐसि कां लिहिलि । हे तनु भली स्वस्थ असता ॥ ८८ ॥ तयेकाळी श्रीगुरुवर । बोलति वैष्णव भार्गव वीर । करा अवघे भगवतस्मर । मुहुर्तमात्र अवकाश तो ॥ ८९ ॥ ऐसे वदोनि तेचवेळि । वृत्ति योजिली सहस्त्रदाळि । काउनि स्वरूपी स्वानंद टाळि । विसर्जिलि जडकाया ॥ ९० ॥ अनुहतध्वनि येकसरा । वाद्ये वाजति निर्धारा । जाहाला सहजी निर्याण नगरा । परात्परा निर्गुणपुरि ॥ ९१ ॥ जनक सनंदन सनत्कुमार । दर्शना पातले गीरज्यावर । करिति गायन नारद तुंबर । वर्षति अमर पुष्पते ॥ ९२ ॥ विमानि बैसले भार्गवराम । घणघणा घंटा वाजति परम । श्रवण करिति ध्वनि परम । जाणीले वर्म राज्यादि ॥ ९३ ॥

असो जडतनु विरमोड्यात । ठेविते जाहाले भार्गवसमर्थ । शाहुमाहाराज खेदग्रस्त । अष्टौ प्राप्त भाव आंगी ते ॥ ९४ ॥ मग छत्रपतियानि । आरंभिला विच्यार मनि । ह्मणति शिखर दिसावे नैनि । ऐसी मेदिनि पाहावी ति ॥ ९५ ॥ यालागी पवित्र प्रसिद्धगाव । धावडसीनामे साताऱ्यासंन्निध । संस्थान कराया तेथे शुद्ध । राजा सिद्ध जाहाला तो ॥ ९६ ॥ समारंभे भजन करित । आणीलि धावडसीस श्रीचि मूर्ति । समाधि करविलि तेथे अद्भुत । पाहाता दुरित जाय लया ॥ ९७ ॥ धन्य राजा छत्रपति । जया लाधली श्रीगुरुभक्ति । विसर न पडे दिन राति । सदा चिंतिति गुरुनाम ॥ ९८ ॥ अतिथीस अन्नदान । कराया उछाहा पुजन । ग्राम दिधले सनद करून । येकाग्र मने स्वामिते ॥ ९९ ॥ पुण्यतिथिचा तोचि दिवस । शुद्धनवमी श्रावणमास । संवत्सरा नाम असे । सोळाशे शकशालीवान ॥ १०० ॥ द्वादशघटिका आलिया दिन । भार्गव स्वामिचे जाहाले प्रयाण । विरमोडे ते ग्राम धन्य । सन्निध जाण कृष्णातिरि ॥ १ ॥ पुण्यभूमीका धावडसी । जडसमाधि तयेचे कुशि । जगी विख्यात तेजोराशि । करि जनासी पावन ते ॥ २ ॥ जेवि देवकीउदरी वाढिनला । यशोदे ग्रहीं सुखाडला । तैसा येथे विच्यार घडला । कृष्णलीला तैसी हे ॥ ३ ॥ विरमोडे नामे पवित्रग्रामी । जडतनु त्यजिलि भार्गवरामी । समाधिस्थान धावडसिभुमि । कीर्तनधर्मि शोभतसे ॥ ४ ॥ आसो श्रीविष्णुचा अवतार सातवा । स्तविति निगम ज्या भार्गवा । तोचि ध्यावया प्रेमानुभवा । संत बरवा कलीमाजी ॥ ५ ॥ यालागी भार्गवजयंति । धावडि उत्छाह करिति । वैशाखमास तो निश्चिति । त्रीतियातिथी साजिरि ति ॥ ६ ॥ पुण्यतिथी नवमी दिवस । पुण्यप्रद श्रावणमास । धावडसीग्राम धन्यदेश । येति यात्रेस सुरवरादि ॥ ७ ॥ बहुदेशिचे मिळति संत । रात्रंदिवस कीर्तन होत । वेदघोष आपर्मित । जेथे बहुत अन्नदान ॥ ८ ॥ अभीषेक पुजा पुराणे । ठाई ठाई भगवद्भजन । छबिना मिरवतसे जाण । चौघडा पूर्ण अनुहतध्वनि ॥ ९ ॥

प्रदक्षणा करिता भक्ति । समंधादि भुते पळति । ऐसे स्थान धन्य जगति । क्षेत्र ह्मणति धावडसी तया ॥ ११० ॥ जे जे भाउक नारीनर । तयासि दर्शनसाक्षात्कार । प्रत्यक्ष भेटति श्रीगुरुवर । भार्गव थोर स्वामि त्या ॥ ११ ॥ साधुसी कैचे मरणजन्म । तशांत चिरंजीव फरशराम । मग तेथें काय दुर्गम । दर्शनकाम पुरवावया ॥ १२ ॥ मुख्य प्राधान्य येक भाव । तेणे जवळी सहजी देव । काय करावें तें वैभव । नाहीं जाणीव स्वरूपाची ॥ १३ ॥ असंख्य लीळा न पुरे मति । धावडसीक्षेत्र पावन जगति । अचरात्रया श्रीगुरुभक्ति । अवतार संतीं भार्गव तो ॥ १४ ॥ असो चीमणाजीपंत जयाचा शिष्य । उपनाम भागवत ज्यास विलसे । निशीम भागवत तो असे । भागवत जयास करतळामळ ॥ १५ ॥ निस्पृह वृत्ति उदासीन । येक दैवत भार्गव पूर्ण । द्रव्य ज्यासी तृणासमान । अन्नदान आवडे बहु ॥ १६ ॥ ऐसा जाणुनि अधिकार । संस्थान धावडसी त्यासी निर्धार । दिधली करूनी थोर नृपवर । छत्रपति साच्यार शाहुनें ॥ १७ ॥ नातरी उगेच विषयासक्त । संस्थानीं असोनी काय महंत । द्रव्य दारा हाचि स्वार्थ । कैचा भगवंत तयासि ॥ १८ ॥ नाहीं ज्ञान आत्मचर्च्या । तेथें न घडे पुज्य अर्च्या । उगाचि ताठा धरुनि वाच्या । न करि कोणाचा सत्कार ॥ १९ ॥ याळागी पुरुष स्वइच्छानि । तेणे असावे आत्मचिंतनीं । सकळ अभिमान सांडुनि । संतचरणी धरा निष्ठा ॥ १२० ॥ आसो जे जे सांप्रदाई । भार्गवपदि विनटले पाहि । अखंडित तयापाई । ठेविली डोई अनन्य ॥ २१ ॥ श्रीसिद्धनाथस्वामिसमर्थ । लोकत्रई जो विख्यात । राजारामी करूनि आज्ञेत । वर्णवीत संतकथा ॥ २२ ॥ नातरि मी मतिमंद । नाहीं विरचित्ति अक्षरभेद । येक साचा सद्गुरुपद । तेणे सिद्ध सरस्वति ॥ २३ ॥ पुढे दिनानाथआनंदप्रल्हाद-कथन । करवितिल स्वामि सिद्ध पूर्ण । श्रोतिये करुनि येकाग्रमन । चरित्र पावन श्रवण करा ॥ २४ ॥ भक्तमंजरिमालाग्रंथ । श्रवणेचि पुरती मनोरथ । भार्गवस्वामिचरित्राते । आध्याय होत द्वितीय हा ॥ १२५ ॥

॥ आध्याय २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय येकुणपन्नास ॥ ४९ ॥
॥ छ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ५०

### — दिनानाथ चरित्र —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ । जय सद्गुरु कृपाकरा । भक्तजनाच्या निजमाहेरा । दीनदयाळा सर्वेश्वरा । निर्विकारा सिद्धमुर्ती ॥ १ ॥ सत्तामात्रे तुमचिये । पंचभूते वर्तति पाहे । पिंडब्रह्मांड चालताहे । वर्णु काय तव लीला ॥ २ ॥ व्यापकपणे आकाश । सर्वत्र ठाई आपण विळसे । स्थुलसूक्ष्मकार्यास । राहटी वायूस करणे पै ॥ ३ ॥ सूर्यादि तेजि तपनता । उदकामाजी रसु तत्वता । पृथ्वीसी भार वाहाकता । हे तो सत्ता तुम्ही प्रभू ॥ ४ ॥ तैसेचि शरीरी सकळ धर्म । इंद्रिये आचरती आपुली कर्मे । तया चाळक आत्माराम । सित्व परम द्रगघन ते ॥ ५ ॥ अनुमात्र पाहाता दुजे कांहीं । रिताठाव कोठेचि नाही । तवकृपेचि हि नवाई । न स्फुरे कांहीं अन दुजे ॥ ६ ॥ नानाविध संतस्वरूप । नटोनि लीला केल्या अमुप । वर्णावया तेचि पडप । घातली झडप या जन्मीं ॥ ७ ॥ तरी तो संकल्प लावणे सिध्दि । आपणाकडे स्वामिया त्रिशुध्दी । परिसोनि विज्ञप्ति चेववि बुद्धि । दयानिधी श्रीगुरु ॥ ८ ॥ ऐकता ते श्रोतिये कथन । तात्काळ होय आत्मज्ञान । साधुमाहात्म परमगहन । करी पावन सकळीका ॥ ९ ॥ ज्ञानेश्वरस्वरूपे श्रीहरि । प्रत्यक्ष प्रगटोनि निजवैखरि । उद्धरिला ऋषि निर्धारि । शौनक अवतारि उपदेशुनि ॥ १० ॥ ते हे कथा परममंगळ । नाशी अघाते समुळ । यथामती वर्णीजेल । आवधान पघळ द्यावे तुम्ही ॥ ११ ॥ वऱ्हाड देशामाझारी । अळजपुरनाम नगरी ।

तेथील विप्र साच्यारि । शाखा बरि वाजसनि ॥ १२ ॥
दिनकरपंडित विद्यात । शास्त्रव्येता माहासमर्थ । गायनकळा ज्या विलासत । ज्ञान जेथ सकळ पै ॥ १३ ॥ यवनजन तेथे बहुत । याकारणे ह्मणति भाइजी समस्त । नित्यनेमे पुराण सांगत । श्रवण करित नरनारि ॥ १४ ॥ पुढे काहीकाळेकरुन । यात्रा निघाली काशीस जाण । दिनकरपंडितासि न पडे चैन । जाहाले मन उद्विग्न पै ॥ १५ ॥ आधीच वृत्ति उदास । ब्रह्मच्यर्य आंगी दढ आसे । वारि माहायात्रेचा उल्हास । मग तयास काय पाहाणे ॥ १६ ॥ भजन करित आनंदेसि । गेले भाइजी काशीयात्रेसि । नमन करुनि विश्वेश्वरासि । तीर्थविधिसि सकळ केले ॥ १७ ॥ विद्वज्जन आत्मविद । भेटले सहजी तेथे प्रसिद्ध । पंडितासि त्या ज्ञानप्रद । प्रश्न विषद केले ॥ १८ ॥ वित्पतीचे बळे-करुनी । वाच्यांश केला भाईजिनि । लक्षांश विच्यारिता शिष्टानि । पश्चाताप मनि जाहाला बहु ॥ १९ ॥ ह्मणती व्यर्थ मी आजीपर्यंत । जगी धन्य ह्मणविले आपणाते । पारि न जाणेचि गुह्यार्थ । कोठील सत्य कोण मी ॥ २० ॥ नैश्वर्य देह्याचि श्लाघ्यता । शास्त्र पढोनि मेळविली मान्यता । मुख्य जीवेश्वर नकळे ऐक्यता । काय वृथा जन्मोनि ॥ २१ ॥ ऐशाप्रकारे तो दिनकरपंडित । भाइजी ऐसे जन ज्या बोलत । वैराग्य जाहाले जयासि प्राप्त । तयासि दृष्टांत न दिसे पै ॥ २२ ॥ स्वरूपानुभवासाठि जाण । मांडिले जेणे अनुष्ठान । निराहार करुनि उपोषण । आराधिला पूर्ण ज्ञानेशगुरु ॥ २३ ॥ ज्ञानेश्वर आवतार श्रीविष्णूचा । पूर्वी जाहाला समर्थ साचा । तेथे लक्ष या द्विजाचा । कायावाचामनेसहित ॥ २४ ॥ तयेकाळी श्रीभगवान । ज्ञानदेवाचा वेश धरुन । उद्धरिला तो ब्राह्मण । अनुग्रह देउन काशींत ॥ २५ ॥ ज्ञानांजन घालिता नैनीं । चिन्मयाचि उघडली खाणी । अंतरबाह्य उगवला तरणी । चिद्गगनी दशदिशा ॥ २६ ॥ तेथे पाहाता पाहाणे काई । वृत्ति मुराली ठाईचे ठाई । निर्वि-कल्प समाधि पाहि । दीनत्रई सुलीनता ॥ २७ ॥ मग सहजी येता

देह्यावरि । विस्मय जाहाला ऋषिअंतरि । न दिसे जवळी मूर्ति गोजिरि । भवतमारि अदृश्य जाले ॥ २८ ॥ तयेकाळी त्या दिनोपंता । चैन न पडे कोठें चित्ता । लोळण घातली तेथें तत्वता । मंदिरीं सर्वथा ॥ २९ ॥ करुणा भाकिता दिनवचने । कृपेने द्रवले ज्ञानघन । पुन्हा होऊनि प्रगटयमान । दीधले दर्शन शौनक अवतारा ॥ ३० ॥ माधिक आपली परंपरा । सांगोनि उपदेश केला पुरा । पाहता सकळदृश्यपसारा । जाणला खरा अनुभव तो ॥ ३१ ॥ अन्वयव्यतिरेकज्ञान । करतळामळ जाहले जाण । सहजस्थिति बाणली खुण । न करवे लेखन ग्रंथी ते ॥ ३२ ॥ आज्ञापोनि दिनोद्धारातें । नाम ठेविले दिनानाथ । ज्ञानेश्वर श्रीसद्गुरुनाथ । जाहाले गुप्त तेथेंचि ॥ ३३ ॥ दिनानाथ नाम जपाला । दिनकर पंडित जो का भला । भाइजी बदती जन तयाला । धन्य लीला सुकृत ते ॥ ३४ ॥ ज्ञानेश्वर अवतार श्रीकमलाक्ष । भेटला जयासि प्रत्यक्ष । ज्ञान देउनि अपरोक्ष । स्वरूपी दक्ष पै केले ॥ ३५ ॥ पुढे कैसी जाहाली लीला । तो हि वृतांत पाहिजे परिसिला । दिनानाथ तो ब्राह्मण भला । काशींत राहिला कांहीं दिवस ॥ ३६ ॥ भगवंत पित्यर्थ पुराण । सांगती सुस्वरगायन करून । बहुत मिळति विद्वज्जन । घेति दर्शन नरनारि ॥ ३७ ॥ बद्धमुमुक्षु साधक सिद्ध । श्रवण कराया येति प्रसिद्ध । सांगणे जयाचे परम शुद्ध । ऐकुनि बोध सुखावति ॥ ३८ ॥ पंडित आणि निस्पृहता । भजक आणी ब्रह्मव्येत्ता । तरुण आणी नेमकर्ता । हेहि पाहाता अपूर्व पै ॥ ३९ ॥ धनीक आणी उदास । राजा आणी निर्दोष । मुक्त आणी कर्माश । वर्तितसे यथासांग ॥ ४० ॥ असो निरापेक्ष पुराण । काशीक्षेत्रि होतसे जाण । दिनानाथ बावासि म्हणति धन्य । करिति नमन सकळीक ॥ ४१ ॥ भाविकब्राह्मण यजुर्वेदि । पतिव्रता स्त्री तयाचि आनंदी । उभयतासि जाहाली बुद्धि । कन्या त्रिशुद्धि द्यावया ॥ ४२ ॥ पुराण समाप्तिसि जोडुनि हात । दिनानाथबावासि तो द्विज प्रार्थीत । म्हणे माहाराज दिनाचा हेत । सद्गुरुनाथ पुर्वी तुम्हि ॥ ४३ ॥ कन्यादान करणे आम्हा ।

अंगीकारावे गृहस्थाश्रमा । ऐसे वदुनि पादपद्मा । द्विजोत्तमा त्या विख-वितसे ॥ ४४ ॥ आणीक मंडळी माहान श्रेष्ठ । तेहि बैसले होते निकट । तेही जोडुनि करसंपुष्ट । प्रार्थिती स्पष्ट बावासी ॥ ४५ ॥ काशीक्षेत्रीचे विद्वानब्राह्मण । भीड न तुटे तयाची जाण । तयेकाळीं दिधलें वचन । लग्न करणे ह्मणुनि ॥ ४६ ॥ मग ब्रह्मवृंदासि हर्ष जाहाला । मंडप सुंदर तेथेचि घातला । उत्कृष्ट केला लग्नसोहळा । तेहि किळा अनोपम्य ॥ ४७ ॥ स्वतासिद्ध आश्रम बांधवोनि । ठेउनि घेतले क्षेत्रस्थानि । भगवतईछा जाणुनि । राहिले भजनी काशीत ॥ ४८ ॥ गृहस्ताश्रमी वर्तता जाण । जाहाले सहजी प्रजोत्पादन । पुत्र जन्मले सुलक्षण । नामाभीधान ती ऐका ॥ ४९ ॥ बाबाजी नामे प्रथम जाहाला । नानाजी तो दुसरा भला । उभयतांचा वृतबंध केला । भीक्षा सर्वाला मागुनी ॥ ५० ॥ निरिछपणे देवाल‍ई । पुराण सांगति प्रत्यही । आबाळवृद्ध मीळति पाहि । लक्ष पाई बावाचे ॥ ५१ ॥ पातशाहाचा दिवाण । नारायणराव नामाभिधान । माहात्म केले तेणे श्रवण । जनवंदने बावाचे त्या ॥ ५२ ॥ दर्शनासि कवकाहि । निघोन आला सत्वर पाही । अनन्य भावेकरुनि ह्रदई । बैसला ठाई श्रवणासी ॥ ५३ ॥ कंठमाधुर्य वग्‍त्रुत्व सुंदर । बोधक शक्ति अध्यात्मविच्यार । ऐकुनि बोधले त्याचे अंतर । वैराग्यसागर उचंबळला ॥ ५४ ॥ मग सारुनि तेणे सकळकार्या । यावे नित्य श्रवण कराया । ठसोवि गेले ज्याचे ह्रदया । स्वात्मठाया लीन व्हावे ॥५५॥ सहजी बैसल्या पुराणा । अष्टहि भाव येति जाणा । वृत्ति रंगली श्रीगुरुचरणा । अनुग्रह मना ईछितसे ॥ ५६ ॥ ऐसे भरता वैराग्य आंगी । नारायणराव तयाळागी । अपूर्व जाहाली गोष्टि जगी । मोक्ष विभागी ते ऐका ॥ ५७ ॥ सन्यासि तेथे कोणीयेक । बैसला होता श्रवणासि देख । नसे ह्रदई त्या विवेक । केवळ मुर्ख वेशधारि ॥ ५८ ॥ लोभग्रस्त ज्याचे मन । चित्तीं आठवले तयाचे जाण । शीष्य करावा तो ब्राह्मण । जो का दिवाण पातशाचा ॥ ५९ ॥ तयेकरूनि उपच्यार । मिळेल सहजी पैका फार ।

याळागी केला विच्यार । सुचवि त्वरे पुराणीका ॥ ६० ॥ समाप्त जाहाले पुस्तक । घरासि गेले सकळलोक । तव आला यति देख । मनात नीके धरुनि ते ॥ ६१ ॥ संन्यासि देखता द्रिष्टिसि । आनंद जाहाला भाईजीसि । घेउन पुज्याद्रव्यासि । अर्चनासि केले पै ॥ ६२ ॥ वंदन भावे करून । पुनित जाहाले वदति जाण । घरासि लागले आजि चरण । तेणे धन्य कृतार्थ मी ॥ ६३ ॥ संन्यासि ह्मणे तु भाविकपुरुष । याळागि सांगतो तुज युक्तिस । येतो तुझ्या दर्शनास । लागला भक्तिस दिवाण जो ॥ ६४ ॥ तयाने उपदेश माझा घ्यावा । ऐसे करिसि जरि साधवा । तरि माझा हेत बरवा । होईल जीवा संतोष ॥ ६५ ॥ ऐसे बोलता संन्यासी । अवस्य ह्मणति ज्ञानराशि । करून साष्टांगनमनासि । आत्यादरेसि बोलविले ॥ ६६ ॥ विषयभोगी जो का यति । मठासि पावला सत्वरगति । आनंदला बहुत चित्तीं । द्रव्यप्रिति धरुनि ॥ ६७ ॥ दुसरेदिवसि तो नारायणराव । पुराणासि आला नित्यापरि भावे । दिनानाथबावानि करूनि गौरव । सांगीतले बरवे स्पष्ट तया ॥ ६८ ॥ ह्मणति सन्यासीबावाचे मनि हेत । तुह्मासि करावे अनुग्रहीत । याळागि तु वेगि जाउनि मठित । उपदेश त्वरित घ्यावा तयाचा ॥ ६९ ॥ तेणे यतिसि होईल संतोष । नारायणराया ऐक गोष्टिस । आमुचे ठाई आधिक नसे । जगन्निवास सर्वाघटि ॥ ७० ॥ दिनानाथबावा ऐसे ह्मणता । दुःख वाटले बहुत चित्ता । चरणावरि ठेविला माथा । जोडुनि हाता काय वदे ॥ ७१ ॥ म्हणे स्वामिया तुज वांचुन । उपदेश न घेई कवणाचा जाण । मिथ्या असेल तरि आण । अंतःकरण जाणतसा ॥ ७२ ॥ सर्वसाक्षी करुणामूर्ति । उपेक्षा धरिली केवि चित्तीं । पदरी घ्यावे सत्वरगति । मजप्रति अंगीकारा ॥ ७३ ॥ संन्यासाकडे जा जरि ह्मणाल । तरि सर्वथा देह्य न राहील । श्रीगुरुपदाचे ब्रिद जाईल । हासे होईल स्वामिया ॥ ७४ ॥ ऐसे वदोनि शुद्धह्रदय । भुमिसि पडला दंडप्राय । धन्य शिष्य तो नारायणराय । जाणिला निश्चय सद्गुरुनि

॥ ७५ ॥ मग तात्काळीक दिनानाथबावानि । उपदेश केला तया लागुनि । ज्ञानदृष्टि उघडिली नैनीं । अबोलणी दशा ते ॥७६॥ परेहुनि जें कां परतें । निजस्वरूप स्वयंभ आइते । दशवेद्वार तयास्थानाते । बोलती संत सकळीक ॥ ७७ ॥ अंतरबाह्य लखलखाट । निजनिर्गुण भरले निघोट । ह्मणता नये पाठपोट । भरला घोट दृश्याचा ॥ ७८ ॥ अपि आप सर्वत्र आघवा । उरि न उरे द्वैतभावा । उदय जाहाला निज आत्म दैवा । लाधला ठेवा स्वात्मधन ॥ ७९ ॥ सद्गुरु दिनानाथ नाम साजे । दीनजनाचे करिति काज । भाइजी वदति जन त्या सहज । अद्भुत चोज ज्या कृपेचे ॥ ८० ॥ असो पातशाहाचा दिवाण । नारायणनामे जो ब्राह्मण । अनुग्रहीत जाहाला पूर्ण । समस्तजन आनंदले ॥ ८१ ॥ वर्तमान कळता हे संन्यासा । क्रोधावला जमदग्नी जैसा । वल्गना करि भ्रामका ऐसे । माहापुरुषा भाईजीसि ॥ ८२ ॥ घरासि येउन त्याचे तातडि । मुर्ख यति तो काय बडबडि । पुराण सांगुनि केली वेडि । धरिली गोडि विषयाचि ॥ ८३ ॥ पातशाहाचा दिवाण । शिष्य केलासि मिळाया धन । लोभाविष्ट जाहाले मन । मोडिले वचन माझें त्वा ॥ ८४ ॥ गृहस्थाश्रम्या तुह्मा लोका । मार्ग मोकळे च्यारि देखा । संन्यासि न मिळे रुका । मिळविता पैका जनि बहु ॥ ८५ ॥ श्रीमंत शिष्य तो जरि आमुचा होता । द्रव्य अह्मा तरि देता । व्याजबटा करिन आईता । मठित बैसता वृधाप्यकाळी ॥ ८६ ॥ घात करुनि सर्वस्वे । ह्मणवितोसि जगी माहापुरुष । ऐशापरि विशेष । गांजितसे तो यति ॥ ८७ ॥ शौनक अवतार क्षमानिधि । क्रोधासि कैचि तेथे संधि । आपि आप जाहाले त्रिशुद्धि । ज्ञानसिद्धि ज्यापासि ॥ ८८ ॥ इतुके करुनि काय भगवे । भगभग करि सदा आंग । दवडिला नाहि जेणे राग । सदा मांग ज्या ह्रदई ॥ ८९ ॥ नाहि मुंडिले वासनेसि । शेंडी काढुन जाहाला संन्यासि । जीव्हा सोकलि मिष्टान्नासि । स्तुति वंदनासि आवडे बहु ॥ ९० ॥ वैराग्याचा लेश नाहि । ज्ञान तेथे कैचे काई ।

उगेचि स्वर्गे मिरउनी देही। भोगीति पाहि नरकाते ॥ ९१ ॥ याच्यागी पाहाणे आपण कोण । देहचतुष्टय निरशन करून । सद्गुरुकृपे जाहाता खूण । सन्यास पूर्ण सहजी तो ॥ ९२ ॥ वळगे तेथे सांडिमांडि । तुटली असता संदेहवेडि । आत्मनिवेदनभक्ति चोखडि । स्वसुखपरवडि तो सेवि ॥ ९३ ॥ हंससोहं जे का स्फुरण । जेथिल तेथे विराले पूर्ण । परमहंस तोचि जाण । द्वैतभान कैचे त्या ॥ ९४ ॥ षड्रिपु तो संन्यास । उगाचि पालटोनि काय वेश । अंतरला तो स्वहितास । केला नाश परत्राचा ॥ ९५ ॥ अज्ञान जनाचे सकळ कर्म । ते तो अवघा वृथाचि श्रम । धर्म आचरिता जोडे अधर्म । आत्माराम न कळता पै ॥ ९६ ॥ जैसे मयुराअांगी सर्वत्र डोळे । परि नेत्र नसता ते आंधळे । तैसे जगीं आचरण भले । जाहाले निर्फळ ज्ञानविणे ॥ ९७ ॥ असो मुर्खाचि काय वित्पति । दिनानाथबावा धन्य जगति । सन्यासि बोलता दुरोक्ति । जाहाली विरक्ती तेचि क्षणीं ॥ ९८ ॥ ह्मणति जनि बाधक प्रतिष्ठा । केवळ जाणावि शुकरिविष्टा । क्लेश जाहाले यतिशिष्टा । जळो निष्टा थोरपण ते ॥ ९९ ॥ आता पुराणचि सांगणे नाहीं । ऐसा निश्चय करुनि ह्रदई । मौनस्थिति अंतरग्रही । वैसले पाही ते योगी ॥ १०० ॥ गीतापठण प्रत्यही करून । आराधिला श्रीभगवान । योगाभ्यासीं लाउनि मन । सदा चिंतन नामाचे ॥ १ ॥ पशु-पक्षादि मानवप्राणी । नमन करावे तयालागुनि । जडोनी ठेली प्रिति नैनीं । व्यापपाणी सर्वाभुति ॥ १ ॥ ऐशापरि कांहीं दिवस । काशीक्षेत्रीं केला वास । पुढे लिला जाहाली विशेष । तेहि सुरस श्रवण करा ॥ १ ॥ धन्य सद्गुरुनाथ । करविती संतमंजरीग्रंथ । राजारामी रंगलें चित्त । वरदहस्त कृपादृष्टि ॥ ४ ॥ भक्तमंजरि-मालाग्रंथ । श्रवणेचि पुरती मनोरथ । दीनानाथस्वामि चरित्राते । आध्याय होत प्रथम हा ॥ १०५ ॥ आध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय पन्नास ॥ ५० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# अध्याय ५१

## — दिनानाथ चरित्र —

( पुढे चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरुसिद्धस्वरूपा । शिष्यवत्छळ पूर्णप्रतापा । भक्तिपंथ दाउनी सोपा । ज्ञानदिपा लाविसि स्वये ॥ १ ॥ श्रवण मननादि घालुनि लेणे । निजअंकी खेळविसी पूर्ण । सत्राविचे पाजितां स्तन । पुष्टता येउन तुष्टि ते ॥२॥ अनुहताचा हल्लर गाईला । आत्मशेजेसी तेणे लागला डोळा । समाधिबोधे जीव सुखावला । पुर्विला लळा गुरुमाये ॥ ३ ॥ चतुर्विधमुक्तिवरुते । संत भजन जे का निरूते । भातुके देउनि तोचि आईते । बुझावि कृत कृपे करूनि ॥ ४ ॥ यालागी अवधान सर्वाभुतीं । देणे स्वामिया आपणाप्रति । तरीच प्रसवे माझी मति । लीलेप्रति साधुचे ॥ ५ ॥ अभय होता सिद्धदयेचे । गाउ चरित्र संताचें । श्रोती श्रवण करूनि साचे । हृदयाचे कुंभ भरा ॥ ६ ॥ मागील कथाइतिहास । दिनानाथ-बावा माहापुरुष । करूनिया काशीवास । बहु जनास उद्धरिले ॥ ७ ॥ पुढे कथा कैसी जाहाली । तीही पाहिजे सकळीं ऐकिली । उदासीनता अंगीकारिलि । विरक्त जाहाली यतिवचने ॥ ८ ॥ काशीक्षेत्रांत जाहाली किर्ति । यालागी सांडिली तेथील वास्ति । पुत्रकलत्रसहित निगुति । अळजपुराप्रति निघाले ॥ ९ ॥ ग्रामासन्निध येता पाही । सामोरे गेले ग्रामस्थ सकळहि । समारंभे लवलाही । आणीले स्वगृही बावासि त्या ॥ १० ॥ धन धान्य अळंकार । अर्पण करीति नारीनर । अनन्यभावे जोडुनी कर । पदार्थ पवित्र वोपिती ॥ ११ ॥ गाई हैसी आदिकरून । दिधली बळेचि आग्रह करून । तयेकाळी विच्यार जाण । केला स्वामिने तो ऐका ॥ १२ ॥ अळजपुरातिल ब्राह्मण सारे । बोलाउनि आणीले येकसरे । लुटविले समग्र घर । होउनि उदार तेचि क्षणी ॥ १३ ॥ स्त्रीपुरुषासहित आपण ।

सेविते जाहाले कानन । दिनानाथ विरक्त पूर्ण । वैराग्य धन्य जयाचें ॥ १४ ॥ पुन्हा मागुती मंदिर करूनी । साहित्य सकळ आत भरूनि । अर्पण केलें ग्रामस्थप्रभुनि । कैवल्य दानी भाईजीते ॥ १५ ॥ तेहि मागुती पूर्ववत । दान केले ब्राह्मणाते । आपण गेले वनांत । कुटुंब-सहित निघोनि ॥ १६ ॥ दाहावेळ ऐशापरी । आणीले ग्रामस्थें ग्रामांतरीं । साहित्य घालुनि संकळ मंदिरी । गृहाभीतरीं वास करविला ॥ १७ ॥ परि तो विरक्तिचा पुतळा । जो का वैराग्यें शोभला । काय आस होईल घराला । वन जयाला आवडे पै ॥ १८ ॥ द्विजासि देउनि तितुकी सदने । वसविले तेणे निबिड आरण्य । त्रीकाळ करूनि गीता पठण । करिती भजन श्रीहरिचे ॥१९॥ नाही देहाचि जया स्मृति । पुत्र-कळत्र तैसेचि रितीं । रंगुनि गेली चित्तवृत्ति । मुक्ति तिष्ठति ज्यापाई ॥ २० ॥ ध्यानधारणा समाधि । तेथे कैचि आधिव्याधि । लाधली पूर्ण आत्मासिद्धि । अष्टमासीद्धिस कोण पुसे ॥ २१ ॥ भक्तियेवढे नाहीं साधन । वैराग्यापरते कैचे धन । लोभ हेचि दरिद्र जाण । जाणती पुर्ण योगी ते ॥ २२ ॥ असो दिनानाथमाहाराज तेचि भाईजी-बावा । सकळसंताचा जो विसावा । रूणी केले जेणे रमाधवा । श्रीगुरुदेवा भजुनि ॥ २३ ॥ झाडाखालीं वनांत राहाती । शुष्कपर्णे भक्षण करिति । कीर्तनी प्रेमा अहोराति । वाचे स्मरती गोविंद ॥ २४ ॥ दिनानाथ-स्वामिचे दर्शन । घडे प्राणीया आपारपुण्य । कीतेक जाहाले पावन । उपदेश घेउन असंख्य ॥ २५ ॥ आपार यात्रा मिळाली । दिगंतरासि कीर्ति वाढली । जगदोद्धारार्थ उद्भली । गुरुमाउली भाइजी ते ॥ २६ ॥ तयाचे सुपुत्र बावाजी । दुसरा पवित्र नानाजी । ज्यासि देव सदा राजी । निरंतर काजी तिष्ठतसे ॥ २७ ॥ जनकजननीची सेवा । आराधिति श्रीगुरुदेवा । प्रपंच्याचा नसेचि हेवा । विच्यार बरवा ज्या ह्रदई ॥ २८ ॥ निरंतर गाती नाचती । सर्वोतमासि आळविती । निमग्न जाहाली ज्याची वृत्ति । सदा भजती पांडुरंगा ॥ २९ ॥ विरपति सुंदर गायन । वेदाभ्यासीं जाहाले निपुण । व्हावया बावाजींचें लग्न । साहित्य

पूर्ण केले जनीं ॥ ३० ॥ वधु आदिकरून विच्यार जाहाला । तीर्थी-निश्चय तो हि केला । पुढे प्रसंग कैसा घडला । तेहि लीला ऐकीजे पै ॥ ३१ ॥ आळजपुरातील येक ब्राह्मण । अग्नहोत्री तो असे जाण । दिनानाथबावा भाविक पूर्ण । हे आणिले तेणे मानसीं ॥ ३२ ॥ तयानें येउन प्रातःकाळीं । भाईजीबावासी विनंति केली । ह्मणे तुझी कीर्ती भली । भुमंडळी प्रशस्त ॥३३॥ दिनानाथ माहाराज बोलिला । कोणता पदार्थ पाहिजे आपणाला । तयेकाळीं आरंभीला । वृतांत सगळा जन सांगे ॥ ३४ ॥ वदे पुत्राचे आहे लग्न घरीं । तिथी योजना पाहीली नवरी । ईतर साहित्य नाहि सामुग्री । वस्त्रे अळंकारी न्युन सकळीक ॥ ३५ ॥ तरी आपणाजवळ जे असेल । तितुके पाहिजे अवश्य दिधले । तेणे कार्य सिद्धिसि जाईल । यऱ्हवि सकळ खोळंबा ॥ ३६ ॥ ऐसें ऐकुनि दिनानाथस्वामि । सद्गद जाहाले अंतर्यामीं । खुशाल ह्मणुनि शिष्य नामी । तयासि नेमी खुणाविति ॥ ३७ ॥ ह्मणती सुवर्णरुप्याचे सकळ नग । सोवळे आदिकरूनि वस्त्रें सांग । आपण जाउनि सत्वर अंगे । अर्पु दे निःसंग या ब्राह्मणा ॥ ३८ ॥ दाळ तांदूळ तुप गुळ । हाळदिकुंकुमादि पदार्थ अखिल । विवाहा उपयोगी जे जे असेल । ते ते सकळ देणे तया ॥ ३९ ॥ आज्ञा वंदुनि मग तो शिष्य । खुशालजी नाम जया असे । तेणे आणीले साहित्यास । कोठींत निशेष जाउनि ॥ ४० ॥ दिनानाथस्वामि पुढे साचा । ढीग केला वस्त्र अळंकाराचा । श्रीकृष्णार्पण ह्मणुनि वाच्या । सोडिला नेमाचा संकल्प वो ॥ ४१ ॥ अन्नसामुग्री आदिकरून । सकळ अर्पिले पूर्ण । संतोषला बहु तेणें । सद्ब्राह्मण अग्निहोत्रि ॥ ४२ ॥ शीषिण स्वामिची ठमाबाई । लोभ आला तयाचे हृदई । सांडगे पापड वळवट पाही । समग्र तेहि लपविले ॥ ४३ ॥ ह्मणे तांतडिने हे पदार्थ । वेळेसी होणार नाहींत । यालागी ठेउनि घरांत गुप्त । देवालयांत आपण गेली ॥ ४४ ॥ दिनानानाथस्वामिस हे कळतां । निषेध करुनि सर्वथा ।

कडाक्याध्वनि सघन । कोंदले गगन तेणे पै ॥ ७७ ॥ न वर्णवे तो आनंद । भक्तवच्छळ श्रीगोविंद । दिनानाथबावासि मुकुंद । आणिले शुद्ध पंढरिसि ॥ ७८ ॥ अनिर्वाच्य तो सोहळा । कीर्तनरंग बहुत जाहाला । पौर्णिमेसी गोपाळकाला । सांग केला यथोक्त ॥ ७९ ॥ यात्रा सकळ सांग करून । घरासी आले देवभक्त जाण । येकात्मता परिपूर्ण । वास अभिन्न भळजपुरीं ॥ ८० ॥ आनंदबावा तयाचा शिष्य । कथा तयाची फारसुरस । वदविती स्वये श्रीसिद्धेश । कृपाविलास जगद्गुरु ॥ ८१ ॥ राजारामी रमता मन । तेणें सहजी समाधान । संतस्तवनी जाहाले स्फुरण । सद्गुरुचरण धन्य ते ॥ ८२ ॥ भक्तमंजरिमालाग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । दिनानाथस्वामि अख्यानाते । आध्याय समाप्त दुसरा हा ॥ ८३ ॥ आध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे आध्याय येकावन्नावा ॥ ५१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ५२

## — आनंदबावा —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरु कृपासमुद्रा । भक्तमानसचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । अक्षै भद्रासन तुज ॥ १ ॥ सत्शीष्य मयुरदयाघना । अज्ञानदरिद्रमोचना । भ्रांति निबिड विपिनि दहना । ज्ञानहुताशना तू सिद्ध ॥ २ ॥ हृदयकमळ विकाश सूर्या । प्रबोधवनवसंत आर्या । स्वात्मधर्म स्थापन कार्या । गुरुवर्या प्रगटसी तूं ॥ ३ ॥ धरूनि स्वये संत स्वरूप । उद्धवसी तू अनाम अरूप । वर्णू जाता लीला अमुप । परि पडप प्रेमाचे ॥ ४ ॥ मागील अध्याई पंढरिसि । भाईजी गेले यात्रेसी । घालवित आले रुक्मीणीविलासि । भळजपुरासी निजअंग ॥ ५ ॥ तयाचे शीष्य आनंदबावा । कथाभाग तयाचा परिसावा । तेणें आवडता होय देवा । मुक्ति जीवा तात्काळ ॥ ६ ॥ कुरोलीक्षेत्री श्रीसिद्धेश्वरदैवत । ऋग्वेदिब्राह्मण तेथीळ निश्चित ।

कुळकर्णवृत्ति जगविख्यात । बहुविपत्य ज्याचे गृही ॥ ७ ॥ चतुर्विध बंधु स्नेहेकरून । केली मातेने दोघांची लग्नें । दोघे राहिले विवाहाविणे दरिद्रेकरून ते जाणा ॥ ८ ॥ तयामाजी अंदोपंत । योगभ्रष्ट जो का निश्चित । ह्मणे प्रपंच ना परमार्थ । राहाणे व्यर्थ कासया घरीं ॥ ९ ॥ ऐसा विच्यार करूनी मनीं । मातुश्रीची आज्ञा घेउनी । प्रयाण केलें कुरोलीहूनि । आले निघोनि कराडासी ॥ १० ॥ तेथे दैत्यनिवारणी जगदंबा । पुराणप्रसिद्ध जे आवडति सांबा । जयेने वधिले शुंभ निशुंभा । सकळ शोभा जीचेनि ॥११॥ तयेस्थळी आनंदब्राह्मण । कुरोलीकर जो का जाण । मांडिले तेणे अनुष्ठान । व्हावे दर्शन यालागी ॥ १२ ॥ निश्चय धरूनि येकविध । उपोषणें केली शुद्ध । येकवीसदिवस होता प्रसिद्ध । जाहाली सिद्ध आदिमाया ॥ १३ ॥ मुल्याचे स्वरूप धारण करून । आनंदबावाचे सन्मुख येउन । ह्मणे कासया येथें धरणें घेऊन । बैसलासि जाण सांग मज ॥ १४ ॥ ऐसे ऐकुन द्विज तो वदे । जाणतसे देवि सकळ हद्गद । समक्ष दाविल जेव्हा पद । करीन विषद निवेदन ॥ १५ ॥ भीक्षा मागावया जाय गांवांत । तुजसि सांगोनिया काय वृत्तांत । ऐसे बोलताचि जाहाला गुप्त । मुल्या तेथें ततक्षणी ॥ १६ ॥ मग देवी मुर्तिमंत । प्रगट जाहाली देवालयांत । प्रकाश दाटला अद्भुत । मुर्छा प्राप्त त्या ब्राह्मणा ॥ १७ ॥ निचेष्टित भूमिसि पडला । सहस्त्रदळी वायु विरला । अवघाची जाहाला बंबाळ । घनवटला प्रकाश तो ॥ १८ ॥ कृपांबुसरिताजगन्माता । उचंबळली प्रेमे तत्वता । उचलुनि घेतले सर्वथा । अंदोपंता निजअंकीं ॥ १९ ॥ अमृतदृष्टि न्याहाळुन । तात्काळ केले सावध जाण । सत्राविचें स्तन देउन । पियुषपान कराविले ते ॥ २० ॥ अभयकर ठेउन शीरीं । प्रसन्न वदने बोले वैखरी । ह्मणे आनंदा जावे अळजपुरी । चरण धरी तुं भाईजीचे ॥२१॥ अनुग्रह घेता तयाचा । लाभ होईल परमार्थाचा । हेतु न धरि प्रपंच्याचा । स्वात्मभजनाचा तुज योग ॥ २२ ॥ ऐशाप्रकारें सांगुन । अमृतकरे कुरवाळुन । अदृष्य जाहाली तेथेचि जाण । स्फुरद्रूपिण

मूळमाया ॥ २३ ॥ मग आनंदबावा हर्षभरे । देवीसि करुनि नमस्कार । श्रीकरहाटक सांडुनि त्वरे । आळजपुर पाहावे ह्मणती ॥ २४ ॥ मार्गी चालता भजन करित । सद्गुरुनाथ वाचे वदत । करुणापर अभंग गात । आळजपुरांत आले पै ॥ २५ ॥ भाईजीबावा जे दिनानाथ । नाम तयासि शोभे निश्चित । दिनजनासि करिति कृतार्थ । सदना त्वरित गेले त्याचे ॥ २६ ॥ तव भाईजी ह्मणति यावे आनंदा । कृतकार्य समजले विषदा । दैत्यनिवारणी जगदंबा आद्या । सांगीतले सद्या तयेने ॥ २७ ॥ परस्परे उभयता गुरुशिष्य । खुणेसि पोहचता परमहर्ष । दिनानाथस्वामिनि उपदेश । आनंदबावास दिधला पै ॥ २८ ॥ कर्णशिंपल्यात पडतांचि मंत्रस्वात्योदक । उद्भवले अमोल्य सहजा मौक्तिक । ढाळ देतसे अत्यंतसुरेख । जाय भवदुःख पाहाताचि ॥ २९ ॥ नातरी आनंदहृदयभुमिका अरुवार । भाईजीनि मंत्रबीज पेरिले तेथे निर्धार । तयासि फुटले अनुभवअंकुर । कृपानिर वर्षता पै ॥ ३० ॥ ज्ञानवृक्ष तो वाढला विस्तिर्ण । स्वसुखफळे दाटली पूर्ण । सेविति सदा मुमुक्षजन । विबुधगणपक्षी ते ॥ ३१ ॥ कींबहुना शिष्यहृदय ते धातु तांबे । गुरुमंत्र तो रस वनस्पति स्वयंमेव । ऐक्य होताचि हेम बरवे । लक्षलखित सर्व बावन्नकशी ॥ ३२ ॥ असो अनुग्रहकाळीं समाधि । प्राप्त जाहाली तेचिसंधी । आनंदबावा आनंदाब्धि । क्रीडति सिद्धि ज्यामाजि ॥ ३३ ॥ ते सुख केतुले वर्णावे । बोलु जाता मौन फावे । येकछत्रि राणीव । ते आत्मत्व चराचरि ॥ ३४ ॥ मग गुरुसेवेविण जया कांहीं । लेयत्रई गोमटे नाहि । भक्तिज्ञान वैराग्य देहीं । प्रगटले हृदई येकसरा ॥ ३५ ॥ सदासर्वदा नाम वाचे । हेचि सौभाग्य गुरुभक्ताचें । आनंदबावाचें भजनाचें । प्रेम साचे अद्भुत जगीं ॥ ३६ ॥ श्रीविठलरुखमाईच्या मूर्ति । भजनसंगी ज्याचे नाचती । कवणासि न कळता येकांतीं । भजन राति होतसे पै ॥ ३७ ॥ शैव करिति शीवार्चन । तेवि करणे गुरुपूजन । गुरुवारी ज्यागरण । सन्निधान गुरुपासी ॥ ३८ ॥ आळजपुरीं ऐशापरी । आनंदबावा राहिले भाईजीघरी । परी

माता खेद करि । अंतरी हे जाणवले ।। ३९ ।। यालागी स्वामीदिनानाथ । आनंदबाबासी आज्ञापित । ह्मणती जावे स्वगृहाते । मातुश्रीते भेटावया ।। ४० ।। तयेकाळीं कंठ दाटला । ह्मणे मी कधी पाहीन श्रीपाउला । सद्गुरुनाथ उचंबळला । करुणाब्धिला आलें भरतें ।। ४१ ।। ज्ञानेश्वरीचा येउन ग्रंथ । आनंदबाबासी भाईजी देत । मस्तकीं ठेउनी वरदहस्त । सस्वरूपाते मेळविले ।। ४२ ।। स्मरण करिसील तेव्हां येईन जवळ । ऐसे शिष्यासी स्वामी वदले । अतिप्रीति आलिंगन दिधले । कुर्वाळिले मुखावरुनी ।। ४३ ।। आनंदबावा नमन करीत । वारंवार विलोकीत । कुरोळीचा धरिला पंथ । परि चित्त गुरुपाईं ।। ४४ ।। मुखामाजी गुरुनाम । निरंतर मानसीं ज्याचें प्रेम । हृदईं स्वरोभी पादपद्म । देखिलें ग्राम कुरोळी ते ।। ४५ ।। घरासी जाउनी मातेप्रती । नमन केलें साष्टांग प्रीति । मग तो आनंद सांगणें किती । भेटली मूर्ति आनंदसुख ।। ४६ ।। ईष्टमित्र मिळाले । सकळीकांसी नवल वाटलें । अंदोपंत संत जाहाले । वदंती भले जन सारे ।। ४७ ।। आनंदमाहाराज समर्थ यानीं । सर्वत्रांसी नमन करूनी । विनयभावें नम्रवचनी । भाषण करूनी गौरविले ।। ४८ ।। कुरोळिक्षेत्रिचें दैवत । श्रीसिद्धेश्वर जगविख्यात । पुराणप्रसिद्ध आरंण्यात । रमणीय अद्भुतस्थान जें ।। ४९ ।। आनंदबावासाधु यानी । प्रत्यही जावे तयेस्थानी । बैसोनिया दृढ आसनीं । आत्मचिंतनीं मन लावावें ।। ५० ।। ज्ञानेश्वरीचा जो का ग्रंथ । प्राप्त जाहाला सद्गुरुहातें । पठण-करावा तो निश्चित । येकाग्रचितेकरूनी ।। ५१ ।। निबिड अरंण्य येकांतवास । वनचरें क्रीडती ज्या स्थळास । न वर्णवे तो विलास । जेथें मानस सुखावले ।। ५२ ।। येकांत मानला ज्या चित्ता । दुरि नसे त्या भगवंता । घरीं वाट पाहील माता । ह्मणुनी तत्वता येणे पै ।। ५३ ।। पात्री पडेल तें अन्न । काहीयेक करावें सेवन । पुन्हा करूनी मातेसीं नमन । मागुती जाणें वनांत त्या ।। ५४ ।। ऐसाप्रकारें बहुत दिवस । आनंदबावा करिती अरण्यांत वास । कार्य पावले सिद्धिस ।

मग त्या सुखास कोण वर्णी ॥ ५५ ॥ ज्ञानेश्वरीचा पूर्ण अर्थ । जाणुनी गेला आनंदबावाते । देहभान कैचें तेथें । द्वैताद्वैत हरपलें पै ॥ ५६ ॥ जे जे देखिले जे डोळा । तो तो दिसे घनसावळा । ताटस्तता वेळो-वेळा । होतसे ज्याला गुरुकृपें ॥ ५७ ॥ ऐशाप्रकारें आनंदबावा । लाधलें पूर्ण निजानुभवा । कोण वर्णी त्या वैभवा । ग्रंथ बरवा ज्ञानेश्वरी ॥ ५८ ॥ अहोरात्र पुस्तक जवळी । न विसंबिती कदाकाळी । भजन-रंगीं वनमाळी । वश्य कली कापतसे ॥ ५९ ॥ कोणें येके दिनि ज्ञाने-श्वरीचाग्रंथ । पठण करूनी अरण्यांत । निघाले सहजी स्वगृहांत । करावयातें भोजनासी ॥ ६० ॥ तव मार्गीं भेटला ब्राह्मण । खटावकर ज्योतिषी जाण । विद्याधरभट नामाभिधान । शास्त्रा पूर्ण वाज्यसनी ॥ ६१ ॥ विद्याभिमान फार ज्यासी । छळकबुद्धि आनंदबावासि । ह्मणे काय पुस्तक तुह्मापासी । दाखवा आह्मासी वाचुनी ॥ ६२ ॥ तयेवेळेसी कैवल्यदानी । मूर्तिमंत जो अर्थतरणी । सोडिला ग्रंथ तेथेचि मेदिनी । आनंदबावानी वाटेसी ते ॥ ६३ ॥ भावार्थे करुनी वाचुनी दाविता । पश्चाताप जाहाला भटजीचित्ता । चरणावरी ठेविला माथा । वैराग्य तत्वता भरले अंगी ॥ ६४ ॥ खळखळा नेत्रीं अश्रु वाहती । दीनवदने मांडिली स्तुति । ह्मणे माहाराज वृथा गर्वोक्ति । धरिला चित्तीं अभिमान ॥ ६५ ॥ अध्यात्मविद्या तेचि विद्या । इतर सकळ त्या अविद्या । जेणे वस्तु पाविजे आद्या । तेचि सध्या करणे पै ॥ ६६ ॥ ऐशापरी वदोन । आनंदबावासी नमन करून । सदृढ धरिले दोनी चरण । करा पावन ह्मणतसे ॥ ६७ ॥ अमानित्व लक्षण । आनंदस्वामीचे अंगीं जाण । विद्याधर-भटजीस करुन नमन । नम्रवचन बोलती त्या ॥ ६८ ॥ मी ज्ञातिमात्र ब्राह्मणदेही । आणी वेदध्ययन केलें नाहीं । तुह्मि थोर विद्वान मही । उपदेशसोही नेणेचि ते ॥ ६९ ॥ बहुप्रकारें ऐसें सांगीतलें भटजीस । परी जयाचे मानस । आनंदपदास विनटले ॥ ७० ॥ वारंवार नमस्कार । साष्टांगेसी घातले फार । अनन्यभावें पसरिला पदर । अनुग्रहविचार ह्मणुनी ॥ ७१ ॥ मग स्वानंदखाणी सद्गुरुनाथ । आनंदमाहाराज जे का

समर्थ । विद्याधरभटजीस अरण्यांत । केले कृतार्थ कृपेनें ॥ ७१ ॥ मंत्र सांगताचि निजकर्णी । प्राप्त जाहाली अवस्था उन्मनी । ज्ञानसूर्य उगवला नैनीं । अक्षई जनी प्रकाश तो ॥ ७३ ॥ आपिआप सर्वाघटीं । हरपोनि गेली जेथे त्रीपुटी । चराचर पाहाता दृष्टीं । आत्मत्व भेटी परिपूर्ण ॥ ७४ ॥ विद्याभिमानी विद्याधरभट । उद्धरिला जेणे स्पष्ट । ऐसे माहाराज आत्मनिष्ट । हरती कष्ट ज्या-दर्शनी ॥ ७५ ॥ ययापरी प्राणि अपार । बद्ध विषई नारीनर । आनंदस्वामिनीं भवार्णवपार । केले त्वरे कृपादृष्टी ॥ ७६ ॥ युवराजा जो प्रतिनिधि । योगभ्रष्ट उत्तमबुद्धि । स्वप्नामाजि त्रीशुद्धि । सांगे सिद्धि देवी तया ॥ ७७ ॥ आनंदस्वामिचे पाहातां चरण । सकळकामना होतिल पूर्ण । दृष्टांत पडता ऐसा जाण । सावध पूर्ण जाहाले ॥ ७८ ॥ निजध्यास तोचि लागला । झोप न लागे मग डोळ्याला । तव प्रातः-काळ जाहाला । उदय पावला चंडांश ॥ ७९ ॥ पत्रिका लेहुन सुंदरयुक्ति । शिबिका पाठविली कुरोलिप्रती । कार्कुनासी करावया विज्ञाप्ति । ते श्रीमंतीं आज्ञापिले ॥ ८० ॥ ईकडे आनंदबाबा श्रीसिद्धे-श्वरी । पठण करिती ज्ञानेश्वरी । येकांतवास वनचरे भारी । व्याघ्रादि सारी क्रीडती ॥ ८१ ॥ तयेस्थानी शोध करीत । पालखी पोहचली सुनिश्चित । कार्कुनानें जोडिले हात । पत्रिकेते अर्पियेले ॥ ८२ ॥ मजकुर पाहुनी विस्मय केला । ह्मणती विघ्न आले अनुष्ठानाला । मान्यता आली मज दिनाला । घात जाहाला स्वहिताचा ॥ ८३ ॥ साधकासि होता सत्कार । तेणे जाणावा क्षोभला ईश्वर । येकांतवासीं जो विच्यार । तेचि सर्वेश्वर कृपा खरी ॥ ८४ ॥ जो जो जगाचा घडे संग । तो तो होतसे विवेक भंग । आठविती श्रीपांडुरंग । सद्गद अंग होउनी ॥ ८५ ॥ हे देखुनी कारकुनासी । पश्चात्ताप जाहाला मानसीं । लागला तेथेंचि चरणासी । अनुग्रहासी घेतले ॥ ८६ ॥ देह अर्पुनी सेवेठाई । समागमीं राहिला पाही । संत दर्शनाची ही नवाई । ईतर काई साधनें तीं ॥ ८७ ॥ आसो खेद होईक प्रति-

निधिसि । हे जाणुनि मानसीं । पालखींत बैसोनी कराडासी । दया-रासी आले ते ॥ ८८ ॥ क्षेत्रस्थ शिष्ट ब्राह्मण । सामोरे पातले स्वामिसी जाण । श्रीमंतानीं करूनी अर्चन । उत्छह पूर्ण केला बहु ॥ ८९ ॥ वस्त्रें अलंकार भूषणें । आनंदस्वामीसी अर्पिली जाण । जाहाला फार कीर्तनयज्ञ । अन्नदान उत्कृष्ट ते ॥ ९९ ॥ अनन्यभावे करूनि प्रार्थना । पंत ह्मणती द्यावे वचना । वारंवार दाउनी चरणा । तृप्ति नैना करा माझी ॥ ९१ ॥ भक्तवत्छलगुरुमाउली । आनंदस्वामि श्रीगाउली । नम्रशद्वे पान्हावली । वर्षिन्नली कृपामृत ॥ ९२ ॥ ह्मणती भाव जैसा धरिसील चित्तीं । ते ते पुरवील सदा श्रीपति । ऐसे वदोनी सत्वरगति । कुरोलीप्रति गेले ते ॥ ९३ ॥ मग साहाचहु महिन्या श्रीमंतानीं । आणीत असावे प्रीतिकरूनि । ऐसे माहाराज कृपादानी । आनंदस्वामी गुरुराज ॥ ९४ ॥ पंढरीचा बहुत प्रेमा । चातुर्मास्य राहाती नेमा । आराधिती पुरुषोत्तमा । कीर्तनधर्मा आचरोनी ॥ ९५ ॥ आनंद-बावाची माता । लक्ष्मी नाम जीचे तत्वता । तयेचे आठवले चित्ता । पंढरिनाथा पाहावया ॥ ९६ ॥ ह्मणे आनंदा मजला घेउन । पंढरीस चल तू आनंदेकरून । मार्गीं चालतां करूं भजन । घेऊं दर्शन श्रीहरिचे ॥ ९७ ॥ आज्ञा वंदुनी मातुश्रीते । समागमे घेतले निरुते । निघाले स्वामी यात्रेते । आनंदसंत ते काळीं ॥ ९८ ॥ त्येकाळीची लीळा बरवी । श्रवण करावी श्रोतिये सर्वीं । अज्ञानतमनाशक रवी । प्रगटला उर्वी कलीमाजी ॥ ९९ ॥ आनंदबावा मातेसहीत । स्नान करुनि भजन करीत । पंढरीची वाट चालत । शुचिर्भुत सोवळ्यानें ॥ १०० ॥ करुणापर अभंग गाती । ठाई ठाई उभे राहाती । पांडु-रंगा आळविती । प्रेमे डुल्लती स्वानंदे ॥ १ ॥ यात्रा भाविक पंढ-रीची । दाटी बहुत पांथस्थांची । वेगळी वृत्ति सर्वांची । नाना देशाचि स्मृति पै ॥ २ ॥ तव मागून पोव्हा आला । समुच्चय फारच मिळाला । नामस्मरणें कोंदुन गेले । नाद भरला दशदिशा ॥ ३ ॥ आनंदबावा आणी माता । चुकामुक पडली उभयता । श्रीक्षेत्रांत जाउनी

पाहातां । माय तत्वता न दिसती ॥ ४ ॥ मागे पुढे राहिली कोठे । हे तो न कळे काहीच स्पष्ट । वार्धिक्य वय शिणली कष्टे । चालता वाटे न कळे कीं ॥ ५ ॥ ऐशापरि विच्यार करिती । आनंदबावा सखेद चित्तीं । तव भक्तवत्छळ रुक्मीणिपति । केली कृति तेणे पै ॥ ६ ॥ आनंदबावाचे शिष्याचे स्वरूप । धरिले तात्काळ वैकुंठाधिप । घोडा घेतला सुरद प्रताप । अयोध्याधीप धाविन्नले ॥ ७ ॥ लक्ष्मीबाईजवळ जाऊन । नमन केले संकोचमाने । ह्मणतीं स्वामिनी पाठविले जाण । अश्व देउन तुह्माकडे ॥ ८ ॥ तरी आपण घोड्यावरी बैसावे । पंढरीसी वेगीं चलावे । चैन न पडे स्वभावे । आनंदरावगुरुराया ॥ ९ ॥ तव ती बाई झीडकावीत । ह्मणे मी न मोडे निश्चित । पादच्यारीं चालुनि पंथ । पंढरिनाथ पाहीन पै ॥ ११० ॥ लीला नाटकी श्रीभगवान । सुचविती त्या मातेसि जाण । सीद्धिसी नेला नेम पूर्ण । कळस नैने पाहातां तो ॥ ११ ॥ सांगुनी युक्ति ऐसी खरी । बैसउनी अंगे तेजी वरि । न लगतां क्षण सत्वरि । आणीले निर्धारी जवळ स्वामीचे ॥ १२ ॥ मग ती प्रेमळ लक्ष्मीबाई । आनंदबावाची जी का आई । ह्मणे आनंदा नेम पाही । आजि का ठाई मोडिला त्वां ॥ १३ ॥ मागे बहुत मार्ग क्रमिला । पाई चालुन शीण जाहाला । पंढरी जवळुनी शीष्य पाठविला । बैसविले मला घोड्यावरी ॥ १४ ॥ आनंदबावासी मातेने । सांगता ऐसे वर्तमान । प्रेमाश्रुनें गळति नैन । अष्टे ही पूर्ण भाव आंगी ॥ १५ ॥ मग अटाहास्य करुणा भाकिती । लोळण घातिली भूमिप्रति । दर्शन द्यावे सत्वर गति । ऐसे वदती स्वामिते ॥ १६ ॥ तेंव्हा तात्काळ चतुर्भुज । प्रगट जाहाले स्वरूप सतेज । दिनवछळ माहाराज । गरुडध्वज दासांकित ॥ १७ ॥ आनंद संत पाहाता दृष्टि । आनंद जाहाला बहुत पोटीं । सद्दढ चरणीं घातली मिठी । होतसे वृष्टि प्रेमाश्रुची ॥ १८ ॥ ह्मणे सावळा सकुमारा । अनाथनाथा लक्ष्मीवरा । अमलासी सदया यादवेंद्रा । दीन-चकोरा रजनीपति ॥ १९ ॥ तुजसाठी योगीजन । गीरी कपाटी

श्रवण जाहाले निके । कळेल जरी आत्मानात्मविवेक । तरीच सार्थक जन्मा येउनी ॥ २१ ॥ आधीच सुवर्ण बावनकशी । तयात हीरे जडले तयासी । काय पाहाणे त्या अळंकारासी । अतिशयेसि शोभिवंत ॥ २२ ॥ तैसेचि येथे जाहाले पाही । मुळीच वैराग्य ज्याचे हृदई । तशात उपदेशवाक्य देही । प्राप्त सोई साधुमुखे ॥ २३ ॥ मग तेथे काय उशीर । पश्चात्ताप जाहाला फार । प्रल्हादबावा त्यजुनी घर । पंढरपुर सेविले पै ॥ २४ ॥ श्रीचरणीं मस्तक ठेउन । मनीं निश्चय केला पूर्ण । निराहार उपोषण । करावे आराधन श्रीजवळी ॥ २५ ॥ न होता ईश्वरप्राप्ती । जळप्रवाहा करणे शरीराप्रति । ऐसा विच्यार धरूनि चित्तीं । निघाले युक्ति प्रल्हाद द्विज ॥ २६ ॥ तव गरुडपरि आनंदबावा । स्वात्मधनाचा जो निजठेवा । करुणापर आळवीत देवा । रमाधवा भजती पै ॥ २७ ॥ तयापाहूनि हे प्रल्हादब्राह्मण । जो उद्विग्न आत्मप्राप्ति लागुन । दर्शन मात्रे तयाकारणे । समाधान वाटलें पै ॥ २८ ॥ जवळ जाउनि नमन करितां । तेहि स्वामि समजले चित्ता । जाणुनीं मनीं मुमुक्षुता । अभयहस्ता स्पर्शितीं शिरीं ॥२९॥ ह्मणती मुला तु कोठील कोण । कासया मुकसी देउनी प्राण । नलगे कराया अनुष्ठान । भेटउ नारायण तुजलागी । ॥ ३० ॥ ऐसे वदतांचि त्या अवसरी । आनंद जाहाला बहुत अंतरीं । दंडप्राय नमस्कारी । स्तवन वैखरी करीतसे ॥ ३१ ॥ उत्पन्न जाहाले अष्टभाव । न वर्णवे तें वैभव । सद्गुरुकृपेचे हें लाघव । तुटला भव तात्काळीं ॥३२॥ आनंदबावा सहजस्थिति । प्रल्हाद द्वीजा आज्ञापिती । वस्त्रें देउनि ब्राह्मणाप्रती । कौपीन प्रीति धारण करी ॥३३॥ परिक्षार्थ बोलता ऐसे । मग उसीर कायसा असे । आधीच वृत्ति उदास । आज्ञा विशेष जाहाली ॥ ३४ ॥ तात्काळीक तेथेचि । वस्त्रे काढुनि आंगीची । फेकोनी दिधली समग्र साची । घातिली नेमाची कौपिन पै ॥ ३५ ॥ श्रीशुकाच्यार्यासारिखे जाण । दिसो लागले प्रल्हाद ब्राह्मण । राउळांतील समस्तजन । आश्चिर्य पूर्ण करिती पै ॥ ३६ ॥ असो आनंदस्वामीनी पाहाता विच्यार । अधिकारी पूर्ण प्रल्हाद विप्र ।

बिऱ्हाडीं नेउनी साचार । उपदेश त्वरें केला तो ॥ ३७ ॥ वासुदेव मंत्र द्वादशाक्षरी । प्रल्हादासी सांगतां निर्धारीं । देहभावा कैची उरी । बाणली अंतरीं येकात्मता ॥ ३८ ॥ आपी आप स्वानंदमेळ । समाधी लागली त्याचि वेळे । सद्गुरुकृपेचे अगाध नवल । जग लोपलें पाहात असतां ॥ ३९ ॥ जिकडे तिकडे निबिडस्वरूप । निघोन गेली भ्रांति-झोप । उदय पावला ज्ञानार्क दीप । सुख अमूप न वर्णवे ॥ ४० ॥ प्रल्हाद गोसावी ब्रह्मार्णवीं । निमग्न जाहाले आत्मानुभवीं । जगदाभास उठाठेवी । सरली गोवी सुखदुःख ॥ ४१ ॥ श्रीविठल रखुमाई दोनी डोळा । भरुनी ठेली चैतन्य बुबुळा । दशवेद्वारीं प्रकाश जाहाला । सहस्रदळा लखलखाट ॥ ४२ ॥ अनिर्वाच्य ती सद्गुरुखुण । गुरुपुत्र जाणती इतर नेणे । उगेचि शीणती बापुडी जन । नानासाधनें करुनी पै ॥ ४३ ॥ जेथे तेथें धोंडापाणी । वृथाचि भ्रमती हिंडोनी आवनी । दुर्लभ आयुष्य गमाउनी । रुसीति प्राणी मिरविती ते ॥ ४४ ॥ साधु-कृपेविण कदा । न मिळेचि सर्वथा आत्मपदा । असो प्रल्हादस्वामि सद्गुरुपदा । निमग्न सदा जाहालेती ॥ ४५ ॥ रात्रंदिवस सेवेमाजी । तिष्ठत असे सदा काजी । आज्ञापितां न आणी वाजी । आवडी ताजी सतत पैं ॥ ४६ ॥ गुरुसेवापुरश्चरण । द्वादशवर्षें समग्र जाण । प्रल्हाद-बावासी घडलें पूर्ण । सन्निधान निरंतर ॥ ४७ ॥ नंतर आनंदस्वामि फिरत फिरत । रहिमतपुरासी गेले निश्चित । ठेउनी घेतले ग्रामस्थें । केले मठाते सिद्ध पै ॥ ४८ ॥ प्रल्हादाशिष्य तो समागमीं । राहिले उभयता तये ग्रामीं । पंढरीसी जावे नेमी । अनन्य प्रेमें भजन करीत ॥ ४९ ॥ रहिमतपुरीं श्रींच्या मूर्ति । स्थापुनी जग लाविले भक्ति । तोषविला रुक्मिणीपति । कीर्तनस्थिती आचरोनी ॥ ५० ॥ निशीम भक्ति प्रल्हादशिष्याची । आनंदस्वामिनीं जाणुनी साचि । झोळी दिधली भीक्षेची । उणीव कैचि मग तया ॥ ५१ ॥ आज्ञा वंदुनी प्रल्हाद गोसावी । निघते जाहाले फिराया उर्वी । ठाई ठाई आत्मानुभवीं । ज्ञानरवि नमिले ते ॥ ५२ ॥ तव कोणी एक-

ग्रामी दिपवाळीस । सहजी उतरले वरतीस । तेथे घातिले स्वामीस विष । हिंसक विशेष द्विज तेणें ॥ ५३ ॥ तेणे विकार शरीरासी जाहाला । परि शांतिक्षमेचा जो पुतळा । मौनेची स्थळत्याग केला । निघोनि गेला स्वमठासी ॥ ५२ ॥ तो आनंदस्वामि नाहींत रहीमतपुरासी । गेले होते कुरोलीसी । प्रल्हादगोसावी कासाविसी । स्मरती मानसी सद्गुरुपदा ॥ ५३ ॥ ह्मणति माहाराज अंतकाळीं । उपेक्षू नको गुरुमाउली । मस्तक ठेऊं दे पाउलीं । येवढी आळी करी पूर्ण ॥५६ ॥ ऐशापरी करुणा भाकितां । सर्वसाक्षी सद्गुरुनाथा । समजले कुरोलीस चित्ता । धावले तत्वता लगबगेसी ॥ ५७ ॥ रहिमतपुरासंन्निधानीं । जवळी पातले वरदपाणि । तव मार्गी ऐकिली वाणी । जाहाले ह्मणोनि प्रल्हाद ॥ ५८ ॥ सत्वर येता मठासी । जन मिळाले प्रेतापासी । शुभा आणोनी साहित्यासी । उचलिती शवासी ते सर्व ॥ ५९ ॥ हे देखोनि करुणागंगे । आनंदसंगे भवभंगे । नेत्रोदके आकाशमेघे । पूर वेगे पै आला ॥६०॥ सर्वत्र जनासी निवारण करून । प्रेताजवळ बैसले आपण । कपाट घेतले लाऊन । आनंदघन श्रीगुरुनीं ॥ ६१ ॥ भाईजीबावाचा करुनि धावा । ग्रंथ सोडिला ज्ञानेश्वरी बावा । अटाहास्ये अळविती देवा । करुणा माधवा भाकुनी ॥ ६२ ॥ ह्मणती मझ्या प्रल्हादशिष्या । आयुष्य घाली तूं पंढरीशा । मोकलु नको स्वदासा । राहिला आशा सेवेसि तया ॥ ६३ ॥ मार्कंडयासि यमापासून । जेवि घेतले सोडउन । तयापरि येथे करणे । ब्रीद सोडणे नाहीतरी ॥ ६४ ॥ नानाविध भक्तसंकटी । धाविन्नलासी तूं जगजेठी । सकळ ग्रंथी हेचि गोष्टी । आजी कष्टी करिसि कां ॥ ६५ ॥ ऐशापरी गर्जोनि वाणी । आठविती चक्रपाणी । जनासि न कळे भक्तिशीराणी । दुरोक्ति वदनीं बोलती ते ॥ ६६ ॥ नानापरीच्या वल्गना । नरनारी करिती जाणा । विपरीत करिती भावना । अंतःकरणाते विलक्षण ॥ ६७ ॥ ठेउनिया गावात प्रेत । उपवासी सारयासी मारीत । नगरवासी ऐसे बोलत । लोका रहिमतपुरचे ॥६८॥ असो आनंदस्वामिनीं श्रीगुरु स्मरोन । केला ज्ञानेश्वरीचा अध्याय पठण ।

अट्टाहास्य गर्जोन । संजीवन केलें प्रल्हादा ।। ६९ ।। भक्तसाह्य पंढरी-नाथ । उपेक्षा कैची असेल तेथे । स्मरतां पावले आनंदब्रावाते । पंढरीनाथ ते ऐका ।।७०।। निद्रिस्तापरी प्रल्हादब्राह्मण । उठता जाहाला शब्द ऐकून । जेवि करिती प्रातःस्मरण । योगी जन तयापरी ।। ७१ ।। मस्तक ठेवितां सदृढ पाई । कृपेने द्रवली श्रीगुरु आई । आलिंगन देउनी दोहीबाही । कुर्वाळित देही क्षणक्षणा ।। ७२ ।। मग तो आनंद सांगणें किती । धन्य सद्गुरु ते सत्शिष्य जगतीं । जगांत जाहाली प्रसिद्ध कीर्ति । नवल करिती सकळीक ।। ७३ ।। लाजि-न्नले निंदक सारे । भाविक जनासी हर्ष फार । स्तुति करिती नारीनर । घाटित साखरे ग्रामस्थ पै ।। ७४ ।। लागले कितेक परमार्था । प्राप्त जाहाले वैराग्य बहुता । अनुग्रह घेतले समर्था । शरण सर्वथा जाउनी ।। ७५ ।। यजुर्वेदीब्राह्मणपत्नी । गिरीबाई वैराग्यखाणी । जिचें स्मरण करितां प्राणी । असङ्ख्य जनीं तरले पै ।। ७६ ।। ऐसी जे कां योगनिष्ठ । ज्ञानाधिकारी असे स्पष्ट । व्हावया तयेनें संशयनष्ट । चरणीं निकट राहिली ती ।। ७७ ।। उपदेश घेउनी तेहि । रंगुनी गेली सेवेठाई । रात्रदिवस न स्फुरे कांहीं । भक्ति ह्दईं सदृढ ते ।। ७८ ।। परीक्षा करणें यदर्थ । आनंदराजसद्गुरुनाथ । छळुनी पाहिले बहुत । परी चित्त न ढळे तिचें ।। ७९ ।। हेडदरोनी बोलावें । दगड तयेसी मारावे । मठाबाहिर दवडूनी द्यावे । छळण करावें नानापरी ।। ८० ।। तो तो तयेनें मानुनी हर्ष । अधिकाचि करावें दास्य । नमन करावें गुरुचरणांस । येकाग्र मानस प्रीतीनें ।। ८१ ।। मग निश्चय जाणुनी आनंदस्वामी । संतोषले अंतर्यामीं । वरदकर ठेवितां शीरपद्मीं । गिरी बम्हीं लीन जाहाली ।। ८२ ।। आणि रहिमतपुरचें स्वस्थान । स्वाधेन केलें तयेचे जाण । प्रल्हाद शिष्यासहित निघोन । गेले आपण पंढरीसी ।। ८३ ।। च्यातुर्मास्य राहुनी तेथें । फिरते जाहाले सकळ तीर्थे । ठाईंठाईं उपदेशित । प्राणी बहुत नरनारी ।। ८४ ।। भवसागरीं पायवाट । आनंदस्वामींनीं केली स्पष्ट । भक्तिमार्ग घडघडाट ।

पावती वैकुंठ जीव सकळ ।। ८५ ।। जगीं भजन वाढविलें । शुद्धज्ञान प्रगटविलें । वैराग्यासी स्थापियेलें । भावबळें सप्रेमें ।। ८६ ।। निर्याण समईं सेवटीं । येते जाहाले भूवैकुंठीं । श्रीचे देउळाचे पृष्टीं । समाधी गोमटी वामभागीं ।। ८७ ।। तये काळींचें वर्णन करितां । वाच्या पावती तन्मयता । प्रत्यक्षता पंढरीनाथा । जेणे सर्वथा प्रगटविले ।।८८।। इंद्रियाच्या सकळ वृत्ति । आकळ केल्या सहजस्थिती । आनंदस्वामींनीं मांडिली स्तुती । अनन्य भक्ति श्रीपांडुरंगीं ।। ८९ ।। मग तात्काळिक सन्निधानी । उद्भवले चक्रपाणी । स्वरूपीं घेतले मिळोनी । प्राणप्रयाणीं आनंदाचे ।। ९० ।। ऐशा प्रकारें निधन । आनंदबावा पावले जाण । शिष्यामाजीं अग्रगण्य । जवळी ब्राह्मण प्रल्हाद तो ।। ९१ ।। शके सत्राशे पंचवीस । रुधिरोद्गारी नाम संवत्सरास । कृष्णपक्ष माधवमास द्वादशीस विष्णुतिथी ।। ९२ ।। प्रल्हादशिष्य उत्तरविधान । उत्छाहा केला बहुत जाणे । धन्य जयाचें अनुष्ठान । गुरूभजन अहर्निशी ।।९३।। तयेस्थळीं बांधून मठ । वृंदावन स्थापिले गोमटें । पूजन करूनी सहजी निकट । भूवैकुंठ वसविलें ।। ९४ ।। समाधीपासी च्यातुर्मास्य । करीत असावें कीर्तनास । सावडी कथा ऐकावयास । बहुत जनास आवडे पै ।। ९५ ।। प्रल्हादबावाचें अद्भुतप्रेम । वस्य केला जेणें राम । अटाहास्यें गर्जोनी नाम । आरोळी नेम होतसे पै ।। ९६ ।। श्रोत्याचे जवळी जाऊन । नारायण हरी दीर्घ ह्मणून । करावें यश वर्णन । सद्गद होउनी प्रीतिपूर्वक ।। ९७ ।। जिये कथेची अगाधशोभा । हरि प्रत्यक्ष जेथें उभा । प्राणी पावती आत्मलाभा । होतसे सभा निर्वि-कार ।। ९८ ।। प्रल्हादबावा ऐसे समर्थ । आनंदस्वामीचे अनुग्रहीत । करावया जीवाचें हित । कळवळा बहुत जयाचे मनीं ।। ९९ ।। श्री-करहाटकक्षेत्र भूठाईं । पाहातां उपमा तयासी नाहीं । मठ बांधिला तयाचे ठाईं । भक्तिसोई लागावया ।। १०० ।। श्रीपांडुरंगरुक्मिणीसहित । स्थापन केलें प्रल्हादसंते । सिद्ध करुनी देवालयाते । कीर्तनाते आरंभिले ।। १ ।। तये काळीं लीला जाहाली । ऐकावे ते श्रोतिये भली ।

श्रवण करितां जन्मावळी । चुकती सकळी प्राणीयांच्या ॥ २ ॥ श्रीचे संन्निध वृंदावन । मृत्तिकेचें असतां जाण । प्रगटले तेथें भगवान । पंधरा दीन डोलतसे ॥ ३ ॥ ब्रह्मनाळक्षेत्रीं प्रतिवर्षी । डोल होतो शिवरात्रीसी । तयापरी श्रीकरहाटकक्षेत्रासी । जाहाला विशेषी चमत्कार ॥ ४ ॥ अपार यात्रा मिळाली । कीर्तनाची अखंड धुमाळी । जयाचा सखा श्रीवनमाळी । दाविले कली कौतुक हें ॥ ५ ॥ प्रत्यक्षता सर्वत्र जन । स्वयें पाहिले या दासानें । प्रल्हादस्वामी जगीं धन्य । कारणें स्तवन यालागी ॥ ६ ॥ अद्यापि ते वृंदावन आहे । दर्शन घेती भाविक पाहे । पुज्या अनुष्ठानें सिद्धी लाहे । जेणें जाय भवरोग ॥ ७ ॥ जगीं भावार्थ बुडाला । शुष्कवेदांत वाढला । तेणें हरीसी कळवळा आला । प्रगटिला भाव प्रल्हाद ॥ ८ ॥ यालागी प्रल्हादबावास भाउ ह्मणती । ज्ञानेश्वरीवर बहु ज्याची प्रिती । वश्य केला श्रीपति । नवविधभक्ति करुनी ॥ ९ ॥ नाना देश नाना स्थाने । हिंडुनी जग केलें पावन । सेवटी पंढरीसी येऊन । वास्तव्य जाण केलें पैं ॥ १० ॥ श्रीगुरुचे समाधीजवळी । काया आपुली समर्पिली । शकसंवत्सर तयेवेळीं । ऐका भली घटिका ते ॥ ११ ॥ शालिवाहनशके सत्राशे । वरुती जाहाली आणीक च्याळीस । बहुधान्यनामसंवत्सरास । पुण्यमास कार्तिक तो ॥ १२ ॥ कृष्णपक्ष येकादशी । अत्यंतप्रिय जे ज्ञानेश्वरासी । प्रयाण केले तेचि दिवसीं । ज्ञानराशी प्रल्हादें ॥ १३ ॥ परमगुरु त्याचे भाईजीबावा । श्रीज्ञानेश्वराचा अनुग्रह बरवा । पुण्यतिथी तयाचा उत्छाहा परिसावा । कार्तिकमास पाहावा शुद्धदशमी ॥ १४ ॥ ऐशाप्रकारें संतत्रिविध । भाईजीबावा आनंद प्रल्हाद । भक्तमालिके गुंफिले शुद्ध । मंजरी येकविध त्रिदळ हें ॥ १५ ॥ पुढें शंभु आपाजी सुंदर कथा । वदवितां स्वामि सिद्ध दाता । जो का अवतार पूर्ण पाहातां । प्रत्यक्षता रामदास ॥ १६ ॥ जगदोद्धारार्थ पुन्हा । अवतरलासे भूमीसी जाणा । राजारामीं निज-कल्याणा । मिळवी सदना कृपादृष्टी ॥ १७ ॥ संतकथन सेवाधर्मी । योजिले समर्थ तेणें स्वामि । दाटलें प्रेम अंतर्यामीं । पादपद्मीं साधूचें

॥ १८ ॥ कबीर कमालाचे अंश । जन्मले साधु निर्दोष । तें कथन वर्णविती सिद्धेश । सावकाश ऐकिजे तें ॥ १९ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । दिनानाथ आनंद प्रल्हादकथे । अध्याय चतुर्थ जाहाला हा ॥१२०॥ अध्याय ॥४॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय त्रेपन्नावा ॥५३॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ५४

### — शंभुआप्पाबावा —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु करुणामूर्ति । आदि आव्यय आत्मज्योति । सहजस्वभाव मूळप्रकृति । अभेदयुक्ति निजमाया ॥ १ ॥ तूं स्वामि या जीवासी । अन्वयव्यतीरेक दाविसी । व्यष्टिसमष्टि ते असती । अद्वयविलासी ऐक्य तें ॥२॥ सकळगणांचा जो कां ईश । ह्मणुनी नामे श्रीगणेश । आत्माराम स्वयंप्रकाश । अखिळ जगास कुलदेवता ॥ ३ ॥ जननी जनक तोचि पाहीं । मस्तक माझे तयापाई । सिद्धनाथ सर्वाठाई । अंतरबाही संचला ॥ ४ ॥ स्वयेंचि हृदई प्रगटोन । भक्तवराचे वदवी गुण । ऐका श्रोते विचक्षण । रसाळ कथन अद्भुत ॥ ५ ॥ भक्तमंजरीमालिकाग्रंथ । करवितां स्वयें श्रीरघुनाथ । हरीप्रिय जे का संत । कथन येथें तयाचें ॥ ६ ॥ कबीरकमाल अवतार । पुन्हा जाहाले पृथ्वीवर । तेचि येथें सविस्तर । चमत्कार परिसावा ॥ ७ ॥ कोण्ही येक समई श्रीभगवान । पंढरीसी जगजीवन । करिते जाहाले आठवण । क्रमेकरून साधूची ॥ ८ ॥ निर्गुणस्वरूपी कोण संत । राहिले असतां निवांत । भक्तिप्रेमसुखांत । कोण आहेत भूठाई ॥ ९ ॥ ऐसा करितां विच्यार । नाहींत कमाल आणि कबीर । झुरणी लागलें अंतर । भेटीसी त्वरें तयाचें ॥ १० ॥ भक्तवछळ ते माउली । प्रेमे वोसंडे पान्हावली । ह्मणे स्तनीं कळ लागली । बाळके भली तुम्ही पीया ॥ ११ ॥ मज निर्गुणा देह धरणें । नाना अवतार लागले

घेणें । ते तुह्मी जातसा टाकून । प्रेमळ जाण सखे हो ॥ १२ ॥ आता न साहावे वियोग । कबीरकमालजी धरि बा आंग । चोजवितसे श्रीरंग । लिहितां अभंग कंठ दाटतो ॥ १३ ॥ समाधिसुख नाहीं भोगीले । जगीं तुम्हा निर्मीळिलें । अनुभवोनी स्वसुख आपुलें । जावें भले निजधामा ॥ १४ ॥ जाणुनी हृद्गद श्रीहरीचें । जन्म घेतलें तेणें साचें । वर्णू जाता पवित्रत्वाचे । दोष कैचें मग राहाती ॥ १५ ॥ कबीर अवतार बावाफन्न । स्वज्ञाति स्विकारिली तेणें । देवंगउदरीं जन्मले जाण । कमाल पूर्ण योगी ते ॥१६॥ शंभु अपा नाम ठेविलें । पूर्वसमंधे लग्न जाहालें । प्रपंचधर्मी मन फिरलें । नावडे सकळ लोकीषणा ॥ १७ ॥ उदयासी येता तमारि । कीर्णे तयाचे बरोबरी । तैसीच लक्षणें आंगी सारीं । या अवतारीं शोभत ॥ १८ ॥ कबीरअंश बावा फन्न । गर्भी राहातां मातेसी चिन्ह । डोहळे जाहाले संपूर्ण । करा श्रवण सर्वही ॥ १९ ॥ गृहधंदा टाकुनी सकळ । अरण्यांत बैसणे लाउनी डोळे । रामनाम सर्वकाळ । घालवी वेळ भजनें ती ॥ २० ॥ म्हणे मजला न्याहारे पंढरी । नाचेन आवडी रंगशिळेवरी । समदृष्टी पाहीन हरि । चरण धरी संताचे ॥ २१ ॥ हे तो नावडे तया यवना । अव्हेर केला तिचा जाणा । मग ती राहिली कानना । धन्य ललना सती ते ॥ २२ ॥ तव प्रसूतकाळ आला । सखा श्रीराम आठविला । यवनभाषें म्हणती अल्ला । तोचि आला तेवेळे ॥ २३ ॥ मग तेथे काय उणें । जाहाले सहजीं बाळंतपण । तो विच्यार करितां वर्णन । ग्रंथ जाण वाढेल ॥ २४ ॥ तया बाळासी बावाफन्न । म्हणते जाहाले सकळ जन ॥ दिवसों-दिवस वाढतां जाण । जननी ज्ञान उपदेशी ॥ २५ ॥ बावाजी तूं कोण आहेसी । हें जरी बा वोळखिसी । तरीच सार्थक येवोनी कुशीं । तूं जाणसी जरी आपणा ॥ २६ ॥ ऐसें ऐकतां बावाफन्न । जाहाले अंतरीं सावधान । करोनी मातेसी नमन । विच्यार मनें केला तो ॥ २७ ॥ बुडाले साधन कलींत । जीव जाहाले विषयासक्त । शब्दज्ञान

उदंड बोलत । नाहीं किंचित अभ्यास ॥ २८ ॥ तरी करूनी दाखवावे । जग मार्गासी लागावे । लेखक जैसा मुलासवें । लीहींत बरवें धडियावरी ॥ २९ ॥बावाफन्न तयावरी । आरंभिला योग निर्धारी । चित्त येकाग्र करूनि चतुरी । नरनारी श्रवण करा ॥ ३० ॥ घेउनी आज्ञा निज-मातेची । वाट धरिली अरण्याची । ग्रंथी बांधिली सीदोरीची । भक्षावयाची सांग ते ॥ ३१ ॥ तात्काळ जावोनी येके दरींत । बैसते जाहाले निवांत । वज्रासन घालोनी चित्त । स्वरूपीं रत पै केलें ॥ ३२ ॥ आत्मा नेहुनी ब्रह्मांडीं । वृत्ति होमिल्या ज्ञानकुंडीं । अहं सोहं देवोनी उंडी । दिधली दडी सहस्त्रदळीं ॥ ३३ ॥ द्वादशवर्षे ऐशारीतीं । येकासनीं बैसली मूर्ति । मग वायु सत्वरगती । उत्तरला युक्ती द्वाराते ॥ ३४ ॥ देहावरी येतां-क्षणीं । क्षुधा लागली अंतःकरणीं । पाहातां सिदोरी उलगडोनी । पदार्थ जनीं काष्टाचे ॥ ३५ ॥ मग येवोनी मातेजवळी । ह्मणती मज भूक लागली । बावा फन्ना तयेवेळीं । बुद्धि बोधिली आईनें ॥ ३६ ॥ काय बोलिली तेंव्हां जननी । व्यर्थ शिणाविणे मजलागोनी । आशा धरितां चक्रपाणी । कैसा जनीं भेटे तुज ॥ ३७ ॥ नाहीं इंद्रियाचा जयो । तृष्णेचा नव जाहाला क्षयो । तववरी स्वरूपान्वयो । अभिप्राय न बोली जे ॥ ३८ ॥ प्रत्यक्ष भेटेल भगवान । निज डोळा पाहीन पूर्ण । तरीच घालीन मग अन्न । आतां निघोन जाई तूं ॥ ३९ ॥ कबीर अवतार तो बावाफन्न । वैराग्य निधी केवळ जाण । आकर्षण प्राणापान । न लागतां क्षण केलें तें ॥ ४० ॥ पाहोनिया जुनाट कोवा । तेथें वृक्ष अश्वत्थ बरवा । निरसोनिया देह भावा । धरीले भावा येकाग्रते ॥ ४१ ॥ बांधोनिया चरणकर । उफराटे टांगिले शरीर । सगुणध्यानीं निर्धार । लक्ष थोर लावियेला॥४२॥ पक्षी येवोनी मास खाती । परी सावध निश्चळ वृत्ति । प्रेम जडलें भगवंतीं । निश्चयवृत्ति न भंगे ॥ ४३ ॥ डोळ्यापर्यंत भाक्षिले सर्व । बावाफन्न ह्मणती आखे मत खाव । येथें अल्ला पाहाते पणाचा भाव । असे सोडीव खुण ती ॥ ४४ ॥ ऐसें पाहातां निर्वाण । प्रगट जाहाले

रघुनंदन । बावाजीते आलींगोन । दिव्य पूर्ण देह्य केला ॥ ४५ ॥ मग म्हणती श्रीरामा । मातेसी दर्शनीं बहु प्रेमा । पूर्ण करावें मनोधर्मा । मेघःशामा सर्वेशा ॥ ४६ ॥ देव भक्ताचा अंकिला । तयाचिये सेवे चालिला । बावाफन्नें दाखविला । नेहुनी आपुल्या जननीसी ॥ ४७ ॥ मग तो आनंद सांगता नये । वृत्ति जाहाली तन्मये । आलिंगन दिधलें पुत्रा मायें । कोण पाहे उत्तरितसे ॥ ४८ ॥ मलंगस्वरूपें दर्शन जाहालें । बावाफन्ना उपदेशिलें । तें स्वसुख ग्रंथीं लिहिलें । ऐसे उगले नोव्हे ते ॥ ४९ ॥ कबीर अवतार बावाफन्न । पूर्वील स्वानुभव सहजी पूर्ण । शेळे विणी जगजीवन । अंगे आपण स्वयेंचि ॥ ५० ॥ परी जगा लागणें भक्ति । ह्मणुनी आचरिली योग्यस्थिती । मागें पुढें सीतापति । जयासंगतीं क्रीडतसे ॥ ५१ ॥ मलंगरूपें अनुग्रह केला । ह्मणुनी वेष तोचि धरिला । बावाफन्न अति शोभला । फकीर जाहाला बेपर्वा ॥ ५२ ॥ सोहं मणका माल विराजे । नवविध गोदडी आंगीं साजे । अनुहतलंगर पाईं गर्जे । उन्मनी साजे सहली ते ॥ ५३ ॥ शुद्धतत्वभांग बनावोनि । घोटा सदा प्राशन करूनी । निमग्न झुकती नैन फिरावोनी । अद्वयन साजनी शोभतसे ॥ ५४ ॥ स्वइछा हिंडती तीर्थाटण । ध्यावया साधूचीं दर्शनें । करावे ते जन पावन । हाचि पूर्ण हेतु पै ॥ ५५ ॥ कृष्णातीरा सहजी पातले । मालगांवासी येते जाहाले । निंबवृक्षाखालीं बैसले । दिनदयाळ निर्वेध ॥ ५६ ॥ तेथें केले अपूर्व नवल । ऐकावे ते श्रोते सकळ । झाडांतुनी शर्करा गळे । पाहाती डोळे जन सर्व ॥ ५७ ॥ साखरेचा गंज पडला । अद्भुत दाविली ऐसी लीला । सकरगंज नाम पावला । बावा फन्न भला योगी तो ॥ ५८ ॥ बालोन्मत पिशाच स्थिती । तीन प्रकारें संत वर्तती । यालागीं जाहाले बालमूर्ति । आत्मोक्ती बावाफन्न ॥ ५९ ॥ तो पालखगांवकरी । पूजन करिती आद्यापवरी । मालगांवीं नरनारी । दर्शन सारी घेताती ॥६०॥ अवघीच स्वरूपें आपण जाहाला । जनीं जनार्दन असे भरला । जगभरीत नाम तयाला । बावाफन्नाला वदती जग ॥ ६१ ॥ शंभु आपा फिरत

फिरत । येते जाहाले अकस्मात । दृष्टीं पडले कबीरतात । बावा विद्यात तये स्थळा ॥ ६२ ॥ परस्परें बाणली खूण । येकमेका आलिंगन । कृष्णककुत्मतींचें जीवन । संगम जाण तैसा तो ॥ ६३ ॥ नातरी शिवविष्णूची ऐक्यता । कीं मारुति भेटले श्रीरघुनाथा । किंबहुना येकात्मता । पुत्रपिता अभेद ॥ ६४ ॥ वछ सुटता दावियाचें । लगबग धावें प्रेम स्तनाचें । किंव्हा स्नेह तान्हयाचें । दर्शनाचे जननीच्या ॥ ६५ ॥ तयापरी येथें जाहालें । आष्टौभाव आंगीं दाटले । शंभु आपा भेटते जाहाले । धन्य वेळ ती जाणा ॥ ६६ ॥ कबीरकमाल हे उभय-मूर्ति । आलिंगन जाहाले सहजस्थिति । तो आनंद वाचे हाती । नये युक्ति बर्णावया ॥ ६७ ॥ शंभु आपासी वर्तमान । विच्यारिती बावा फत्न । कोठे तुह्मा जाहाले जनन । सांगणें तें सकळ कांहीं ॥ ६८ ॥ आज्ञा वंदुनी तयेवेळीं । मस्तक ठेविले चरणकमळी । अनुक्रमें सांगितली । पीठिका जाहाली पूर्वील ते ॥ ६९ ॥ कोष्टिज्ञातीसी भक्तिमार्ग । नसेचि कांहीं अनुराग । पोट भरिती घालुनी माग । न कळे वैराग्य कैसें तें ॥७०॥ म्हणुनी तेथें देह धरिले । आज्ञापिलें श्रीविठलें । ऋणानुबंधें लग्न जाहालें । ठाउके सकळ आपणासी ॥ ७१ ॥ मार्गी भेटले साहेब तुराण । तेणें दाविलें मज खुराण । परी न घडे समाधान । प्राप्तिविण आत्मत्व ॥ ७२ ॥ न करा विलंब स्वामीराया । मेळवावे निजपदठाया । वियोग नसावा या पाया । सेवा घ्यावी दीनाची तें ॥ ७३ ॥ जाणूनी हृदई दृढभाव । प्रसन्न जाहाले श्रीगुरुराव । शंभु आपासी ह्मणती पाहावे । कोण जीव आहेसी तूं ॥ ७४ ॥ देह तव पंचभूतांचा । आत्मा व्यापक सर्वत्र साचा । पालव धरी विच्याराचा । बरे ठाईचा न्याहाळी तूं ॥ ७५ ॥ सन्मुख जवळी बैसउनी । शक्तिपात केला ततक्षणीं । समदृष्टी होतां मीळणी । व्यापियेलें मनीं ब्रह्मसुखें ॥ ७६ ॥ सप्तरात्रीपर्यंत । शंभुआपा समाधिस्त । बाबाफत्नें वरदहस्त । स्पर्श करीत निजमस्तकीं ॥ ७७ ॥ जव समाधी उत्तरली । इंद्रियें सकळ चेईलीं । देहावरी वृत्ति आली । दृष्टी उघडिली तात्काळ

॥ ७८ ॥ पाहातां सन्निध पुढें स्वामी । आनंद जाहाला अंतर्यामी । तो न सांगवे वेधिले ब्रम्हीं । अंतर्यामी येकसरें ॥ ७९ ॥ अष्टभाव दाटले आंगीं । बुद्धि पहुडली निजरंगी । आनुहत पुढे वाजे शिंगी । लखलखाट जगी चहुकडे ॥ ८० ॥ शंभु आपा श्रीगुरुतें । वारंवार घाली दंडवत । प्रदक्षणा भावें करीत । प्रार्थनेते आरंभिले ॥ ८१ ॥ स्वामि सर्वदा जें सुख । अनुभविलें म्या क्षणीक । तें असावें निष्कळंक । ऐसें निके करा तुह्मी ॥ ८२॥ बावाफन्न संतोषले । निजआत्मज्ञान सांगितलें । त्रिपदाचें शोधन केलें । गिळुनी ठेले अर्धमात्रे ॥ ८३ ॥ तें लिहितां समुळस्थिति । विस्तार होईल फार ग्रंथीं । चरित्रभाग श्रवणार्थी । श्रोते असती फार जगीं ॥ ८४ ॥ परी न कळतां आत्मसुख । श्रवण पठण ते निरार्थक । विषयजाळीं गुंतले लोक । नाहीं विवेक ज्ञानाचा ॥ ८५ ॥ असो आतां तें सांगणें । शंभु आपासी अनुभव पूर्ण । सद्गुरुकृपें जाहाला जाण । बाणली खूण सहजी ते ॥ ८६ ॥ अनिर्वाच्य तें ब्रह्मसुख । कोण लिहीतो ग्रंथीं लेख । ज्याचा तोचि भोगीं देख । निगुरा टकमक पाहातसे ॥ ८७ ॥ शंभु आपा पत्नीसहित । सद्गुरुसेवे सदा रत । अंतरबाह्य दृष्टीं पाहात । श्रीरघुनाथ जनींवनीं ॥ ८८॥ ऐका भूतदयेचा विच्यार । केवढा प्रेमा तो साचार । कोण्हा न कळतां मार्ग सार । आपण स्वकरें लोटितु ॥ ८९ ॥ जोड्यांतील खडेचि करावे । जगा वेडासे दिसावे । कोण्ही आडलीया धावावे । काम सर्व करावया ॥९०॥ कोण्ही येक नगरांत । तस्करासी बांधिले होते । तयालागी सोडुनी देत । चोर ह्मणत आपणासी ॥ ९१ ॥ पहिलाचि तो अंगस्वभाव । संतसेवे शीर अर्पावे । भूतमात्रीं समान पाहावें । तृणादि सर्व पाषाण ॥ ९२ ॥ माळगांवीं स्त्रियेसहित । शंभु आपा असे राहात । सद्गुरुतें उपासीत । अनन्युक्त सर्वदा ॥ ९३ ॥ ग्रामाबाहीर बावाफन्न । राहिले स्वईछा मळंग जाण । तेथें केलें असें स्थान । परम जाण रमणीक ॥ ९४ ॥ त्रिकाळसेवा कीर्तनभजन । शंभु आपा करिती जाण । न जाणती दैवत आन । येक भजन श्रीगुरुचें ॥ ९५ ॥ आपुलाला

ज्ञातिधर्म । करणें हा शास्त्री नेम । याचि अर्थी सप्रेम । वस्त्रें परम विणावीं ॥ ९६ ॥ मागीं बैसोनी कांडी फेकितां । वाचे स्मरावे श्रीरघुनाथा । क्षणक्षणा येकात्मता । होय समता वृत्तीसी ॥ ९७ ॥ सहजी विसर देह्या पडला । शुद्धि नसे इंद्रियाला । विणीत बैसे घन-सावळा । मागीं भला श्रीराम ॥ ९८ ॥ साहा चौघटिका स्मृति । पुढें दिसे श्रीरघुपति । शंभुअप्पा सद्गदचित्तीं । नमन करिती सप्रेम ॥९९॥ ऐशाप्रकारें मालगावीं । गुरुशिष्य ते गोसावी । राहिले असती जैसा रवि । अज्ञान सर्वी तमनाशक ॥ १०० ॥ तेथें दुर्जन असती कोण्ही । छळणाते आरंभीले तयानीं । शंभुआपासी बोलाउनी । यावे घेउनी चावडीसी ॥ १ ॥ उगाच बैसतो येकांतीं । सदा बुटबुट करिती चित्तीं । वस्त्रें काढुनी सत्वरगती । नाहींच देती कवणासी ॥ २ ॥ द्रव्य आणिती कवणाचे । उणे नसे संसाराचें । कांहीं निमित्य लाउनी वाचे । करावें धनाचें हरण पैं ॥ ३ ॥ रोखा करुनी धाडिले लोक । द्रव्य मागती ग्रामकंटक । शंभु आपा तात्काळीक । देती सुखें पैक्यासी ॥ ४ ॥ जैसे अग्नींत घृत घालितां । अधीक वाढे तो सर्वथा । तैसी तृष्णा त्या ग्रामस्था । विशेष सर्वथा जाहाली ते ॥ ५ ॥ ह्मणती यासी उपद्रव करितां । द्रव्य देईल पुष्कळ आतां । चावडीसी न ये बोलावितां । करा तत्वता चिठी तया ॥ ६ ॥ घरषण करिता चंदनासी । सुगंध देतो निश्चयेसी । तयापरी शंभुआपासी । छळणासी आरंभिले ॥ ७ ॥ जे येतील तितुके कागद । मान्य करिती आपा सिद्ध । रुपये देती तया आनंद । नाहीं खेद ज्या अंतरीं ॥ ८ ॥ आश्चिर्य करिती गांवकरी । दिसतो कोष्टी गरीब भिकारी । उदीम कोणता कांहींच न करी । द्रव्य पदरीं कोठील ॥ ९ ॥ शंभुआपा कमाल प्रसिद्ध । माला उणे काय विविध । मालगांवांत असोनी अंध । जग अबध भ्रमले ते ॥११०॥ मग कांहीं काळांनंतर । मछिंद्रस्थानासी पातले योगेश्वर । वेडग्रामीं निर्धार । योगेश्वर राहिले पैं ॥ ११ ॥ मनीं जाहाले सहजी स्मरण । करवीरक्षेत्रासी जावें जाण ।

मार्गी लागले ग्राम उरुण । राहिले पूर्ण वस्तीसी ॥ १२ ॥ दर्शना पातले ग्रामस्थ । पाटीलकुळकर्णी समस्त । वैराग्य जाहालें तयातें । उभयता ते काळीं ॥ १३ ॥ जन्मांतरीचा योग प्राधान्य । चरणीं ठसावलें मन । म्हणती मज करा पावन । आलों शरण दयाळा ॥१४॥ खेळजी पाटील शिरोमणी । दुजा आपाजीपंत कुळकर्णी । शंभु आपा पाहातां नैनीं । अनुताप मनीं जाहाला तया ॥ १५ ॥ चुंबकाजवळी लोह आणितां । सचेतन होय सर्वथा । नातरी घन गर्जना करितां । मयूर तत्वता नाचतसे ॥ १६ ॥ कीं पाहातां चंद्रसूर्यांते । कमळणी त्या विकास पावत । विरक्त जाहाले आपाजीसंत । खेळजी त्वरित पाटिल ते ॥ १७ ॥ ह्मणती स्वामी कृपा करणें । आह्मां उभयता पदरीं घेणें । अनन्यभावें आलों शरण । करा पावन गुरुमूर्ति ॥ १८ ॥ ऐकोनी ऐसें भाषण । शंभु आपा करिती नमन । सद्गद जाहालें अंतः-करण । बोलती वचन काय तया ॥१९॥ अनाधिकारी नीच कोष्टी । काय सांगतां ऐसी गोष्टी । ब्राह्मण वर्ण उत्तम सृष्टीं । करा दृष्टि तुह्मी कृपेची ॥ १२० ॥ सेवाधर्म आमुचा खरा । धर्मशास्त्रीं पाहा विच्यारा । थोरी कायसी या परा । नेणे खरा उपदेश तो ॥ २१ ॥ आपाजीपंत आणि खेळजी । उभयता करिती अर्जी । अंतर जाणत अपा सहजी । निर्दया वर्जा स्वामिया ॥ २२ ॥ ज्ञानभीक्षा घेणें सर्व । ऐसे बोलती माहानुभाव । अंत्यजादि गृहा जावे । परी तरावें भवसिंधु ॥ २३ ॥ बुडतां गंगेंत ब्राह्मण । शूद्रें काढिले तयालागून । ह्मणुनी गेलें ब्राह्मणपण । ऐसे जाण नोव्हे पै ॥ २४ ॥ जाणोनी दृढभाव शंभु आपानीं । बोधियेले पाटील कुळकर्णी । तात्काळ लाधली उन्मनी । अंतरभुवनीं लीन जाहाले ॥ २५ ॥ तो अनुभव अबोलणा । जडोनि ठेला आत्मा नैना । द्वैताद्वैता समूळ जाणा । गेली कल्पना निरसोनी ॥ २६ ॥ जीवशिव क्षराक्षर । मीतूंपण दृश्य सारें । उचंबळता प्रत्ययनीर । नदीसागर कैंचा तो ॥ २७ ॥ पिंडब्रह्मांड येकात्मता । सहजस्थिती बाणली अवस्था । खेळजीपाटील अपाजीपंता । निजपूर्णता

ते पातली ॥ २८ ॥ देहभान कैंचें काई । कारभार राहिला ठाईंचा ठाईं । लक्ष वेधिलें श्रीगुरुपाईं । बैसती हृदई येकांतीं ॥२९॥ अपाजीपंतें दौतलेखणी । अर्पण केली हरिचरणीं । खेळजीपाटील तयानीं । काठी नेहुनी वाहिली ते ॥ १३० ॥ सर्वकाळ अध्यात्मश्रवण । नानाग्रंथ निरोपण । येकात्मता तिघे जण । निजसदन भोगिती पै ॥ ३१ ॥ उर्णग्रामसन्निधानीं । मठ बांधविला शंभु आपानीं । पत्नीसहित तये स्थानीं । राहिले मेदिनी स्वईच्छा ॥३२॥ दोकोशावर कृष्णा वाहात । प्रत्यही स्नानासी तेथें जात । गुप्तस्थिती सदा वर्तत । जना अविदित आचरणविधि ॥ ३३ ॥ तीनयोजनें माळगांव । गुरुदर्शना तेथें जावें । शंभुआपानीं आराधन करावें । नित्य यावें माघारे ॥ ३४ ॥ द्वादशवर्षे ऐशारीतीं । वारंवार यात्रा करिती । सद्गुरुचरणीं बहुप्रीति । नाहीं भक्ति दुजी ते ॥ ३५ ॥ बावाफत्नें जाणुनी भाव । शंभुआपासी ह्मणती बरवें । माळगांवासी न यावें । येतो स्वभावे तुजपासी ॥ ३६ ॥ उर्णग्रामीं तात्काळ प्रगट । श्रीगुरुराव जाहाले स्पष्ट । दुःखदैन्य गेलें कष्ट । जाहाली नष्ट पातकें तीं ॥ ३७ ॥ ते लीळा वर्णावी केतुली । धन्य कृपाळु गुरुमाउली । उर्णक्षेत्रीं स्थिरावली । पवित्र जाहाली भूमि ते ॥ ३८ ॥ शंभुआपा सद्गुरुपासी । सदा तिष्टे अहर्निसी । समर्पण केलें पायासी । कायवाचेसी मनादि ॥३९॥ कबीर अवतार बावाफत्त । शंभुआपा ते कमाल जाण । शिष्येसहीत निघाले पूर्ण । रुक्मीणीरमण पाहावया ॥१४०॥ भजन करीत स्वानंदेसी । नाचत आले पंढरीसी । सकळसंता ऋषिकेशी । सांगता आवडसी निजप्रेमें ॥ ४१ ॥ जीवाहूनी जे आवडतें । प्राणाहूनी जे का परते । ते चि पुन्हां भूमंडळाते । जाहाले येते कबीर कमाल ॥ ४२ ॥ संतभोजनासाठीं जेणें । अर्पण केलें मस्तक जाण । शूळीं घातला नेहून । आला पूर्ण कमाल तो ॥ ४३ ॥ अंतकाळीं दुर्जनानीं । छळीले असे यवनांनीं । मग जाहाली विचित्र करणी । तुळसी सुमनीं कायेची ॥ ४४ ॥ ऐसे प्रतापशीळ संत । कबीरकमाल माझे भक्त । ते आजी

भेटले हरि ह्मणत । प्रेमभरते पांडुरंगीं ॥ ४५ ॥
देवभक्ता आलिंगन । तेथील सुख वर्णील कोण । येकात्मता उदक-
लवण । काय भिन्न असे ते ॥ ४६ ॥ राहीरुक्मिणी माता सकळा ।
आल्या पाहावयाला शंभु आपला । बावाफन्न ते कबीर जाहाला ।
उतरिले लोणाला उभयता ॥ ४७ ॥ मिळती जाहाली सर्व मंडळीं ।
हर्षे पीटिली समस्तें टाळी । कीर्तनीं तिष्ठे श्रीवनमाळी । जाहाला
सकळीं आनंद तो ॥ ४८ ॥ कोण नवलाव तये कथेचा । देव डोलत
असे साचा । भेद पाहातां येथें कैचा । शंभु आपाचा कमाल तो
॥ ४९ ॥ गोपाळकाला पौर्णिमेसी । आपा करिती वाळवंटासी । सकळ
देव प्रसादासी । अनुक्रमेंसी पातले ॥ १५० ॥ जाहाला उत्छाह सांग
सोहळा । देव राउळामाजी आला । यात्रासमुच्चय जाहाला । आपुलाल्या
या देशासी ॥ ५१ ॥ शंभु आपा उर्णग्रामासी । येते जाहाले स्वस्था-
नासी । घालवीत आले ऋषिकेशी । परीवारेसी श्रीपांडुरंग ॥ ५२ ॥
भगवान ह्मणती आपाते । तुजजवळी राहिलों निश्चित । भजन ऐकावें
सतत । हेंचि मनांत आवडे पै ॥ ५३ ॥ बावाफन्न ते स्वस्वरूपाशी ।
न विसंबवावे तयासी । सकळ तीर्थे पायापासीं । आदिकाशी करुनी
॥ ५४ ॥ ऐसे सांगोनी पंढरीनाथें । उर्णक्षेत्रीं राहिले स्वस्थ । शंभु
आपा भजनीं रत । धन्य होत ते जागा ॥ ५५ ॥ पुढें कथेचा चम-
त्कार । परिसोत सदा नारीनर । राजारामीं रुक्मिणीवर । सिद्धेश्वर
वदवीतसे ॥ ५६ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ ।
प्रथमोध्याय जाहाला सत्य । आपासंतचरित्रासी ॥ ५७ ॥ आध्याय ॥
॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमें अध्याय चोपन्नावा ॥ ५४ ॥ श्रीकृष्णा-
र्पणमस्तु ॥ ७ ॥



## अध्याय ५५

### — शंभूआप्पाबावा —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो सिद्धविनायका । मुळप्रकृति विनायका । भवबंधनछेदका । स्वात्मसुखा श्रीमूर्ति ॥ १ ॥ जनकजननी तूंचि पाही । सदा वससी माझे हृदई । कुळदेवता दुजी नाहीं । सर्वांठाई श्रीराम ॥ २ ॥ भक्तकाजा पंढरीसी । उभा ठेला तो ऋषिकेशी । तयाचिये पूजनासी । नाहीं सर्वस्वीं अन दुजे ॥ ३ ॥ पूज्याद्रव्य सकळीक । आपणची जाहाले रघुनायक । तेव्हां युक्ति अलोलीक । सांगितले देख गुरुरायें ॥ ४ ॥ भक्त प्रेमळ त्याची तुळसी । अर्पण कराव्या भगवंतासी । चरित्र दोरीया जरी वोविसी । श्रीहरीसी प्रिय तेणें ॥ ५ ॥ सद्गुरुकृपें तें आराधन । आरंभिले ग्रंथलेखन । श्रोतिये करुनी येकाग्रमन । साधुकथन परिसावें ॥ ६ ॥ मागील अध्याई पंढरीहुनी । शंभु आपा यात्रा करुनी । उर्णग्रामा स्वस्थानीं । आले निघोनी देवभक्त ॥ ७ ॥ येकात्मता सहजास्थिती । वास केला उर्णावती । कमाल अवतार जाहाला क्षीतीं । शंभु ह्मणती आपा तया ॥ ८ ॥ कबीर ते चि बावा फन्न । दर्शन घेतां प्रीतीकरुन । लोकत्रईं विराजमान । तात्काळ जाण मुक्ती वरी ॥ ९ ॥ कबीर ह्मणजे बीर बावन । देहीमात्रा त्याचि पूर्ण । अर्धमात्रा निजस्फुरण । कबीर जन सर्वत्र ॥ १० ॥ योगस्थिती या अनुभवा । लाधला तयासी ह्मणीजे बावा । बावाफन्न तो चि बरवा । दिसतो सर्वां जनींवनीं ॥ ११ ॥ पूर्वार्चित उत्तम भले । युगायुगीं कमाविले । श्रीहरीते ऋणी केले । जाण कमल ते चि पै ॥ १२ ॥ जीव तोचि शीव जाहाला । शंभुराज विश्वीं भरला । ज्ञानांजन घालोनी डोळा । माल काढिला निजतत्व ॥ १३ ॥ कमाल अवतार शंभु आपा । जाणती जया सद्गुरुकृपा । येरी न घडे मार्ग सोपा । करिती खेपा जन्माच्या ॥ १४ ॥ असो चरित्रभाग

ऐकावया । भाविकजनाआवडी हृदया । गोडकथा वर्णू तया । जेणें काया निवे पै ॥ १५ ॥ शंभुआपा पत्नीसहित । श्रीगुरुसेवे सदा रत । वास्तव्य केलें उरणग्रामांत । महिमा अद्भुत तयाचा ॥ १६ ॥ भगवत्स्वरुपीं जडलें प्रेम । तया घडलें सकळ नेम । भूतीं दिसे आत्माराम । वाचे नाम सर्वदां ॥ १७ ॥ जे जे जयाची कामना । ते ते पुरवी योगीराणा । शंभु आपाचे पाहातां ज्ञान । त्रिनैना समान ते ॥ १८ ॥ पांथस्थ चालती मार्गानीं । तयासी जे ईछा मनीं । शंभुआपा ते पदार्थ घेउनी । जाती स्थानीं त्या ठाईं ॥ १९ ॥ जे जे वेसन प्राणीया । ते ते नेहून द्यावें तया । तपकीर तमाकु गुरगुडिया । ज्ञातीच या भिन्नभिन्न ॥ २० ॥ मध्यरात्रीं उठोनी सकळ । मार्गे लोटावे प्रांजळ । बहुभाषण सर्वकाळ । न करी केवळ मौनी तो ॥२१॥ लीनता ते मूर्तिमंत । जया अंगीं विराजित । वेडा चि केला श्रीभगवंत । जवळी तिष्टत अहर्निशी ॥ २२ ॥ वामसव्य दोन्ही अंग । ठाउक असती जया सांग । खुराण पठण करणें विग । न पडे व्यंग काहींचि ॥ २३ ॥ शंभु आपा माहासमर्थ । राम रहीम येक पाहात । दोन्ही उपासना आचरण करीत । अभिन्न निश्चित भाव जया ॥ २४ ॥ कळविले कोण्ही यवनासी । हिंदु पूजितो पीरासी । फाता देतो निश्चयेसी । उणीव तयासी कांहीं नसे ॥ २५ ॥ माजविलें फार बंड । उरुस भरवीत प्रचंड । जगा लाविलें असे वेड । संतत्व प्रौढ माजविले ॥२६॥ केला विच्यार छळक जनीं । अविंद मिळाले खुराणपठणीं । स्वारीते सिद्ध करूनी । आले निघोनी उर्णग्रामा ॥ २७ ॥ माहान फकीर बोलके । अर्थान्वय जाणती निके । कयफ घेउनी झाले सडक । झुकत नटके आले जवळी ॥ २८ ॥ वाजतीं वाद्यें घणघणा । नगरा लाविले निशाणा । आतां जिंकू कोष्टिया दीना । ऐसें वचना बोलती पै ॥२९॥ शंभु आपा पूजासनीं । बैसले असती प्रेमेंकरुनी । लगबग धावत तये स्थानीं । मिळाले जनीं येकसरा ॥ ३० ॥ क्रूरदृष्टी पाहाती यवन । सोडिते जाहाले सकळ खुराण । बोल ह्मणती तुझें वचन । काय ज्ञान

आहे पा ॥ ३१ ॥ आपुला धर्म आचरिसी । अमुचे घेतले स्वस्था-
नासी । धरुनी नेहू आतां तुजसी । सांग कैसी भक्ति ते ॥ ३२ ॥
नातरी यवन होई । भ्रष्ट करितो याचि ठाई । सापडलासी येथें पाही ।
कोण्ही नाहीं सोडवावया ॥ ३३ ॥ शंभु आपा तो कमाल प्रसिद्ध ।
जया ठाउकें खुराण प्रसिद्ध । तेथें बापुडी हि मतिमंद । काय छंद
करितील ॥ ३४ ॥ सूर्यापुढें खद्योत जैसें । तेज मिरविती अपैसे ।
नातरी पंडितांच्या सभेस । करी स्तुतीस मूर्ख आपुली ॥ ३५ ॥
कीं रावण मारुतीपासी । प्रौढी सांगे आपुली जैसी । यवन बडबडती
शंभु आपासी । विवेक मानसीं कैचा त्या ॥ ३६ ॥ असो फार काय
दृष्टांत घेणें । ग्रंथ पसरेल बहुत जाण । येथें सारांशकथा लिहीणें ।
च्यातुर्य करणें कायसें ॥३७॥ आपानीं प्रथम वंदन केलें । निजशांतिते
अंगिकारीलें । विनयभावें चरण कमळे । दृढ धरिले सर्वांचे ॥ ३८ ॥
ह्मणती तुह्मी च आमुचे अल्ला । अंकित दास मी आपुला चेला ।
पावन करावे या दीनाला । आहे सर्वांना शरण मी ॥ ३९ ॥ फकिर
बोलती अरे महींदा । भोंदिसी जगा फार रे सदा । आतां दाखवी ग्रंथ
विषदा । शास्त्र संपदा सकळीक ॥ ४० ॥ आह्मी सोडितों खुराणें ।
प्रत्योत्तर याचें करणें । नाहीं तरी धरुनी नेहणें । करुं हेळण सर्वथा
॥ ४१ ॥ शंभुआपा ते कमालराज । केवळ ज्ञानाचें निजबीज । जया
साह्य गरुडध्वज । सकळ लाज तयाला ॥ ४२ ॥ येथें पाहिजे
कासया ग्रंथ । प्रत्यक्ष अवतार मूर्तिमंत । कोरा कागद घेतला हातें ।
प्रतिवचन देत सर्वांसी ॥ ४३ ॥ समाप्त जाहाली खुराण पुस्तकें ।
अमले काजी माहा बोलके । परी कोरा कागद तैसा चि देख ।
वाचिती सुखें शंभुआपा ॥ ४४ ॥ मग ते दचकले मनीं । ह्मणती
अवतार जाहाला मेदिनी । बहुधा कमाल दिसतो नैनीं । आला जनीं
मागौता ॥ ४५ ॥ आपा ह्मणती चालो द्या खुराण । कां थकला
भडस घ्या पुरवोन । नाहींतरी ठेऊनि द्या निशाण । शरण व्हा
स्वामीते ॥ ४६ ॥ म्लान जाहालीं फकीरवदनें । समूळ गेला अभिमान ।

जैसा अपमानिला दशानन । श्रीरघुनंदनें धनुष्य मोडितां ॥ ४७ ॥
शंभुआपासी सकळ यवन । घालिते जाहाले लोटांगण । ठेवोनी नगारा
निशाण । गेले निघोन स्वस्थळा ॥ ४८ ॥ तो नगारा आणि निशाण ।
प्रस्तुत चि असे जाण । अनुहतध्वनी वाजे पूर्ण । निशिदिनीं
सर्वदा ॥ ४९ ॥ निशाण झळके भक्ति फडके । शुद्धसत्ववर्ण शुभ्र देख ।
शोभा आली राउळा निष्टंक । पाहातां दुःख मावळलें ॥ ५० ॥
धन्य कमाल तो शंभु आपा । उजळिले जेणें ज्ञानदीपा । जना मार्ग
केला सोपा । ब्रह्मस्वरूपा मिळावया ॥ ५१ ॥ सर्वकाळ श्रीगुरुभजनीं ।
निमग्न असती रामस्मरणीं । खेळजीपाटील आपाकुळकर्णी । आत्मदानी
शंभु आपा ॥ ५२ ॥ त्रिवर्ग बैसती येकांतीं । अध्यात्मज्ञानसंवाद
करिती । बोलतां बोलतां स्तब्ध होती । नाहीं स्मृति देहाची ॥ ५३ ॥
त्रिकाल शंभुआपासी । ब्रह्मांडांतील कळे जयासी । ज्ञानेश्वरें वर्णिली
तैसी । अभेदराशी माहाराज ते ॥ ५४ ॥ प्राणीमात्राचें मनोगत ।
पूर्ण करिती संतश्रीमंत । घालती आघात अनर्थ । निरसन ज्या स्मरणें
॥ ५५ ॥ शंभु आपा कोणी येक समईं । बैसले असती स्वस्थ ठाईं ।
आपाजीपंत विदेही । खेळजी तो हि पाटील ॥ ५६ ॥ ऐका श्रोते
नवल तेथें । चमत्कारकथा परम अद्भुत । झाज बुडता काढिलें सत्य ।
समुद्रांतूनी ततक्षणीं ॥ ५७ ॥ शंभु आपा स्वशिष्यातें । बोलाउं नका
ह्मणती आह्मातें । मुखावरी घेतली बुंथ । स्तब्ध निवांत च्यार घटिका
॥ ५८ ॥ अचेतन काष्टवत । बैसले असती निवांत । जना वाटले
प्राणरहित । आपासंत स्वरूपीं मिळाले ॥ ५९ ॥ घाबरे होउनी
उभयतांनीं । शब्द केले दीर्घ कानीं । खेळजीपाटील आपानीं । प्रयत्न
जनीं केले बहुत ॥ ६० ॥ परी ते न होती सावध । च्यार घटिका
जाहाल्या शुद्ध । मग अपसया इंद्रियवृंद । चेईरी सिद्ध पैं
जाहाली ॥ ६१ ॥ देहावरी येवोनी । नेत्र उघाडिले आपानीं ।
करिती सकळ विनवणी । जोडोनी पाणि नरनारी ॥ ६२ ॥
सांगती तेव्हां शंभुराज । समुद्रीं बुडतां काढिले झाज । अंगरख्याची

अस्तनी सहज । पिळुनी सतेज दाविली पै ॥ ६३ ॥ आजपासुनी महिनियानें । येईल सावकार उर्णसी जाण । तयेकाळीं वर्तमान । कथिले वदनें इत्थंभूत ॥ ६४ ॥ ऐसे सांगतां मास लोटला । सौदागर तो येतां जाहाला । साकल्य वृत्तांत तेणें कथिला । ऐका भला प्रेमळ ॥ ६५ ॥ ग्रामस्थ पुसती सावकाराते । कैसियासी तुह्मी आला येथें । शंभु आपा दाखवा ह्मणत । कारण कोणतें असे पै ॥ ६६ ॥ तव तयाचा कंठ दाटला । समूळ विच्यार कथन केला । ह्मणे झाज जातां तळा । साधु पावला शंभुराज ॥ ६७ ॥ बहुत द्रव्य खर्च केलें । नाना पदार्थ झाजांत भरले । येकसरा ते बोहटी पडले । बुडूं लागलें गलबत ॥ ६८ ॥ बोभाईली सकळ दैवतें । माहा जाज्वल्य सामर्थ्यवंत । पाणी शिरले झाजांत । न पावले कोण्ही चि ॥ ६९ ॥ येक चि आरड जाहाला । झाज चाललें असे तळाला । उपाय न सुचे कवणाला । शंख केला सकळजनीं ॥ ७० ॥ तो ईतकीयांत प्रांतांतील । कोण्ही येक बैसला होता पुण्यशीळ । तयानें माहात्म निरोपिलें । ह्मणे निर्मळ शंभु स्मरा ॥ ७१ ॥ मग आह्मी सर्वत्रानी दिन्न वाहिला । अपास्वामी चित्तीं स्मरला । नवल प्रताप आगळा । झाज कडे लागले तें ॥ ७२ ॥ तये काळीं केले नवस । पदार्थ अर्पावे शंभुआपास । ह्मणुनी आलों दर्शनास । सांगा स्थानास तयाचे ॥ ७३ ॥ आश्चर्य करिती ग्रामस्थ मंडळी । अश्रू आले नेत्रकमळीं । शंभुआपा समर्थ जवळी । असतां पडली भ्रांति अम्हा ॥ ७४ ॥ गांवकरी या समवेत । आला सावकार तो मठांत । घातिले साष्टांग दंडवत । बद्धांजुळींत पसरीती ॥ ७५ ॥ नाना पदार्थ रत्नमोतीं । सूवर्ण मोहरा वैडुर्य ज्योती । परोपरीचीं वस्त्रें निगुती । ठेविली प्रीतीं आपापुढें ॥ ७६ ॥ शंभु आपा हास्यवदनें । मागुती केलें तया नमन । उंच वस्तु काय कारण । आह्मा करणें काय तया ॥ ७७ ॥ स्फटिक-माळा काचपात्रें । गारापाषाण पंचपात्रें । तुळसीकाष्टे सुंदर पवित्र । हे चि मात्र योग्य ॥ ७८ ॥ सावकार ह्मणे माझी आस्था । साधवा पुरवी तूं समर्था । अंगीकारावे या पदार्था । विनंति सर्वथा करीतसे ॥ ७९ ॥ मग

काहीं येक किराणा । ग्रहण केला जीनसाना । शंभुआपानीं समाराधना । करविली जाणा द्रव्याची ॥ ८० ॥ तयापात्राचें पूजन । प्रतिवर्षी होतसे जाण । सावकार जाहाला पावन । कथा धन्य संताची ॥ ८१ ॥ बोधलेबावा माहासमर्थ । भूतभविष्य जया कळत । ज्याचे कीर्तनीं पंढरीनाथ । वाजवीत टाळ पै ॥ ८२ ॥ अंतकाळीं तयानीं । सुचविले होते जगालागुनी । कबीर कमाल अवतरोनी । धर्मस्थापन करितील ॥ ८३ ॥ ते हे कबीर बावा फन्न । शंभुआपा कमाल जाण । मार्गी बैसोनी जगजीवन । विणी वसनें ज्यासाठीं ॥ ८४ ॥ प्राणी असती पुण्यवंत । तयासी वस्त्र तें प्राप्त होत । ज्या ज्या गृहीं ते प्रावर्ण असत । दरिद्र तेथें नसे पै ॥ ८५ ॥ ऐसा प्रताप शंभु आपाचा । वेडा चि राम केला साचा । सदा नाम गर्जे वाचा । सद्गुरुचा अतिप्रेमा ॥ ८६ ॥ दोन्ही नेत्र पाहाणें येक । तैसा रहीमरघुनायक । जाणुनी ऐसा भाव देख । पुजिती निके पीरासी ॥ ८७ ॥ शंभुआपा कोण्ही येक समईं । अर्चन करीत बैसले ठाईं । नानाप्रकारचि द्रव्य पाही । समर्पण करिती देवा ॥ ८८ ॥ प्रेमोदकें घालुनी स्नान । सुगंध चंदन वाहिलीं सुमनें । वस्त्रें अलंकार भूषणें । समर्पण करिती देवा ॥ ८९ ॥ बुका परिमळ तो चि वास । स्वानंदें पीराते वाहिलासे । त्रिगुणउदी सावकाश । अति सुरस जळती पुढें ॥ ९० ॥ सोहंस्मरण अखंड दीप । लाविलासे तो चिद्रूप । सत्रावीचे मद्य अमूप । निजआत्मस्वरुप भरियेलें ॥ ९१ ॥ मीपण मेढा मारुनी ताटीं । बीजमंत्र जपिला होटीं । सिंचन केली स्वानंदवाटीं । नैवेद्य सेवटीं तो जाहाला ॥ ९२ ॥ ब्रह्मरसाचा निजप्याला । घेउनी झुकती पूर्णत्वाला । सबघटबीजमो अल्लाहि अल्ला । उचंबळला निजानंद ॥ ९३ ॥ ऐसें पूजन शंभुआपानीं । करीत बैसावें गुप्त रजनीं । तो तेथें जपणीलागुनी । ग्रामस्थ जनीं प्रभु पातला ॥ ९४ ॥ ह्मणे हा नीच कोष्टी । उपदेश देतसे सृष्टी । कैसी याची असे गोष्टी । पाहूं दृष्टीं या वेळा ॥ ९४ ॥ करितो मद्याचें प्राशन । अन्याच्यारी वर्ते पूर्ण ।

सत्वर यासी शिक्षा करून । मोडूं जाण बंड पै ॥ ९६ ॥ ऐसी धरुनी दुर्बुद्धि । साधिली तेणें पूजासंधी । पडदा खोल म्हणती आधी । दुर्बुद्धि कुटील ते ॥ ९७ ॥ शंभु आपा तो कमाल देख । सिद्धि बुद्धि तया ठाउक । सिंचन केलें तात्काळ उदक । दाविले निके उपच्यार ॥ ९८ ॥ अरक्तपुष्पें जास्वनीची । होती जाहाली मांसाची । गति पाहातां मद्याची । दुग्ध तेंव्हां चि जाहालें तें ॥ ९९ ॥ देखुनी अद्भुत नवलाव । मुखासी लाविती पालव । घाबिरे जाहाले असे सर्व । आले भावें शरण ते ॥ १०० ॥ शंभुआपासी ग्रामस्थप्रभु । ह्मणे साक्षात तूं चि शंभु । कृपादृष्टीं देई लाभु । उजळिले नभु तव-कीर्ति ॥ १ ॥ क्षमा दया ज्याचे आंगीं । कमाल अवतार आपा जगीं । अपराधिया तो योगी । करुणा अभंगी गौरवीतसे ॥ २ ॥ आज्ञा घेउनी छळक गेला । अर्चनविधि सांग जाला । शंभु आपाची चरित्र-लीला । प्रताप आगळा तो वर्णीत ॥ ३ ॥ अन्नदान करणें भूतीं । आवडी बहु आपाप्रति । भिक्षा मागुन परमयुक्ति । सकळ ज्ञाति जेव-वाव्या ॥ ४ ॥ सज्जनगडीं रामदास । समाधिस्थ जाले तो चि दिवस । पुण्यातिथि माघमास । नवमीस कृष्णपक्ष ॥ ५ ॥ माहान् पर्वणी जाणुनी मनीं । उत्छाहा आरंभिला शंभु आपानी । तेथील यात्रा सांग करुनी । उर्णस्थानीं प्रारंभ तो ॥ ६ ॥ वान्नर अंश सकळसंत । गुरु-स्थान श्रीहनुमंत । ते चि अवतार मुर्तिमंत । स्वामीसमर्थ रामदास ॥ ७ ॥ शंभु आपा याचि अर्थे । पांच दिवस उत्छाह करीत । जगा दाविला यवनीपंथ । फकीर होत नवसाचे ॥ ८ ॥ परी ते गुह्य हृदईचे । परस्परें ऐक्य साचें । द्वैतभान तेथें कैचें । येकात्मतेचे सर्व-भूतीं ॥ ९ ॥ मंडप उभारुनी विस्तीर्ण । दिंड्या पताका निशाणें । अहोरात्र होतसें कीर्तन । नामस्मरण धुमाळी ॥ ११० ॥ येक ब्रह्म अभेदभाक्ति । हे दाखविली जगा युक्ती । अवघे चि मंडप चढविती । अतिशूद्र निश्चिति करूनी ॥ ११ ॥ मर्यादा प्राणी सोडतील । ह्मणोनी स्तंभ नेमोनी दिधले । स्वधर्म रक्षितां

तोचि भले । ही खुण सकळा सांगीतली ॥ १२ ॥ यालागी मंडप चढविता । विच्यार योजिला हा सर्वथा । आपुलाले खांब धरितां । मंडप तत्वता चढे तो ॥ १३ ॥ प्रतिवर्षी ऐसी लीळा । उर्णग्रामीं होतसे सोहळा । महान्तपंडित पाहाती डोळा । ज्या स्थळाला सर्व ऐक्य ॥ १४ ॥ अन्न संतर्पण रात्रंदिवस । शंभुआपा करीतसे । गणीत न धरवें कवणास । प्रसाद देवास दुर्लभ जो ॥ १५ ॥ भिन्नभिन्न पाक होती । ज्ञाति सर्वत्र जेविती । अन्नपूर्णा श्रीभगवती । पाकशाळेप्रति तिष्ठतसे ॥ १६ ॥ तेथे न्यून्य असेल कैचें । पर्वत पडती अन्नाचे । प्राणी जेविती तयाचे । गणीत वाचे न करवे ॥ १७ ॥ शंभुआपा कपालमूर्ति अवतरलासे पुन्हा क्षितीं । जया साह्य सीतापति । तयाप्रती किती वर्णी ॥ १८ ॥ आषाढमासीं गोपाळकाला । पौर्णिमा दिवस प्राप्त जाला । कीर्तनविधि आरंभिला । देव जयाला न विसंबे ॥ १९ ॥ शंभुआपा प्रेमभरें । नेत्रीं वाहातसे अश्रूनीर । आदिकरूनि गीरजावर । वैष्णववीर येती पै ॥ १२० ॥ दुमदुमिलें नभ सारें । विमानीं दाटलें अंबर । सुरवर करिती जयजयकार । वृष्टि थोर सुमनांची ॥ २१ ॥ धन्य क्षेत्र उर्ण जागा । पुण्यपावन या जगा । जेथें वास्तव्य श्रीरंगा । गाती अभंगा शंभुआपा ॥२२॥ हिंदु यवन दोन्हींधर्म । आचरीले जेणें अनुक्रमें । उपासिला रामरहीम । स्वभाव निःशीम पूर्विल तो ॥ २३ ॥ परी हें योग्य शंभुआपासी । अनुचित गोष्टी इतर जनासी । जेणें केलें दुग्धपुष्पासी । शोभे तयासी वाममार्ग ॥ २४ ॥ मागील ऐकोनि पुढे भ्रमली । संस्थान मंडळी भ्रष्ट जाहाली । मद्यपान करूं लागली । ह्मणती आपुली उपासना ॥ २५ ॥ अनुग्रह देती ब्राह्मणासी । विपरीत घडली गोष्टी ऐसी । हृदई कळवळले ज्ञानराशी । चिद्घनविलासी शंभुआपा ॥ २६ ॥ स्वयें चि कर्णी सांगोन । निषिद्ध करविलें मद्यपान । करावें तें भजन । हे चि साधन योग्य पै ॥ २७ ॥ संतसेवा अन्नदान । तेणें साजिरें संस्थान । अध्यात्मग्रंथ करितां पठण । होय ज्ञान स्वधर्मा ॥ २८ ॥ ज्ञान नसतां उपदेश देती । आपण

बुडोनी जगा बुडविती । यालागीं जन्म धरिला क्षिती । कमाळमूर्ति तयानीं ॥ २९ ॥ ते हे आपा बावाफन्न । ग्रंथ करविला तेणे जाण । सकळ कामना होती पूर्ण । केल्या स्मरण जयाचें ॥ १३० ॥ भाविकप्राणी कोण्ही असती । तयासी दर्शन अद्यापि देती । जे जे जेथें नवस करिती । तया पावती ततक्षणीं ॥ ३१ ॥ जगदोद्धार जेणें केला । ज्ञानदीप उजळीला । समाप्त केली अवतारलीळा । ऐका सोहळा पुण्यतिथी ॥ ३२ ॥ शाहालीवान शके सोळाशे । त्रिषष्ट उत्तम पौषमास । दुर्मति संवत्सरा नाम विलसे । भोमवारास कृष्ण नवमी ॥ ३३ ॥ समाधीकाळीं ऐसे योग । शरण आले सानुरागें । आंगीकारितां श्रीगुरुअंगें । जाहाले सांग वर्णावया ॥ ३४ ॥ सप्तवर्षानंतर पाहीं । निर्गुणसदना विसूबाई । श्रावणमास नवमी ठाई । श्रीगुरुपाई लीन जाहाली ॥ ३५ ॥ शंभुआपाच्या पत्नीसहीत । देह्यावसान तो कथिला वृतांत । विमानीं बैसोनी वैकुंठाते । जाहाले जाते स्वानंदें ॥ ३६ ॥ यवन हीं तयेकाळीं । भांडू लागले भूमंडळीं । प्रगट जाहाले श्रीवनमाळी । तये वेळीं अकस्मात ॥ ३७ ॥ निजभक्ताची स्वहस्ते । समाधी रचिली पंढरीनाथें । हर्ष जाहाला त्रैलोक्याते । गजर होत स्वानंदें ॥ ३८ ॥ साधुनिर्याण ऐकतां कर्णीं । वृद्धि पावे आयुष्य जनीं । धन्य कीर्तन या मेदिनी । उर्णस्थानी होतसे पै ॥ ३९ ॥ आर्णीक लीळा असती कांहीं । यथामति लिहिली पाही । मस्तक ठेविलें सर्वांपाई । सांप्रदाई सकळीका ॥ १४० ॥ रामदास अवतार सिद्धस्वामी । अंकित तयाचा जन्मोजन्मीं । अज्ञोक्ति ग्रंथ राजारामी । मंजरी रागीं अर्पितसे ॥ ४१ ॥ सिध्दाचि उभा भक्तकाजा । राहिला विठो श्रीराम माझा । कटावरी ठेउनी करसरोज्या । घ्यावया पूजा तिष्ठतसे ॥ ४२ ॥ शंभु आपा बावाफन्न । उभयऐक्य गुंफीलें सुमनें । विटेसहित समचरण । होतसे अर्चन सिध्दकृपें ॥ ४३ ॥ पुढे श्रीसिध्देश्वरभटजींचें कथन । करवीतोळ स्वामिसिध्द पूर्ण । श्रोतिये करून येकाग्रमन । सावधान परियेसा ॥ ४४ ॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । शंभु आपाचरित्राते ।

द्वितीयोध्याय पै जाहाला ॥ १४५ ॥ अध्याय ॥ २ ॥ ओंव्यासंख्या ॥ ३०२ ॥ अनुक्रमें आध्याय ॥ पंचावन्नावा ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# अध्याय ५६

## — सिद्धेश्वर स्वामी —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमो सित्ध आदिपुरुषा । परात्परा अविनाशा । चित्सूर्या स्वयंप्रकाशा । पंढरीनिवासा श्रीमूर्ति ॥ १ ॥ सद्गुरुकृपापूर्वेसी । उदय होता ज्ञानमित्रासी । अज्ञानतम हारपली निशी । कोण तयासी वर्णू शके ॥ २ ॥ मनचंद्र जाहाला निस्तेज । दश्यचांदणें लोपलें सहज । अनेकवृत्तिविकारबिज । हारपली जे उडगणें तीं ॥ ३ ॥ नाना मतें भेदनदी । दोहीं तटीं बोधबुद्धि । बिघडली होती रात्रसंधी । मीनली तधि चक्रवाकें ॥ ४ ॥ लिंगदेह्य-कमळीं भ्रमर । बंधन पावले जीव समग्र । दर्शन होतां सहस्त्रकर । मुक्त त्वरें जाहाले ते ॥ ५ ॥ आत्मानुभवी पांथीक । भक्तिमार्ग लागले देख । प्रातःस्मरामि कोण्ही एक । जप असंख्य करितात ॥ ६ ॥ ब्रह्मनिष्ट ते ब्राह्मण । करिते जाहाले अर्घ्यप्रदान । येकात्मता देवतार्चन । सोहं स्फुरण होतसे ॥ ७ ॥ सूक्ष्मवेद पांचवा । भूतमात्रीं घोष बरवा ।

। सहजस्वभावा अध्ययन ते ॥ ८ ॥ पाहोनिया निजआत्मसूर्या । अद्वयाब्जिनी विकासल्या । माहाद्वारीं त्राहटिल्या । अनुहात सगळ्या दुंदुभि त्या ॥ ९ ॥ श्रीगुरुकृपें नित्योदय । अस्तमाना-रहित होय । वर्णू जातां स्वसुखा नये । तादात्म लाहे ततक्षणीं ॥ १० ॥ असो ऐसिया कुटस्था । आत्मयारामा सिद्धनाथा । अनन्य चरणीं ठेविला माथा । वदवी कथा संतचरित्र ॥ ११ ॥ भक्तमंजरीमालिका । आवडे तुह्मां रघुनायका । ह्मणुनि जन्म धरिला निका । गुंफी अनेका प्रीतीनें ॥ १२ ॥ संत श्रोतेजन प्रेमळ । तयाचरणीं ठेविलें भाळ । सावडे शब्द परि सखोल । भक्ति प्रांजळ अद्भुत ॥ १३ ॥ सावुलिढा करितां श्रवण ।

साक्षात्कार पावती जन । आत्माराम स्वयेंचि होणें । लाहिजे म्हणून गुरुकृपें ॥ १४ ॥ सप्तऋषींमाजीं मुगुटमणी । ब्रह्मवेत्ता वसिष्ठमुनि । अवतरलासे तो मेदिनी । कथन कर्णीं ऐका ते ॥ १५ ॥ कलीमाजी अनाचार । स्वधर्म लोपला समग्र । प्रथमचरणीं वर्णसंकर । मांडला थोर अनर्थ पै ॥ १६ ॥ च्यारी वर्ण येक जाहाले । सोवळे अवघेंचि बुडालें । वेदपठण अव्हेरिलें । टाकियेले स्नानसंध्या ॥ १७ ॥ शुद्र करिती उपदेश । भ्रष्टविले जगास । भक्षवीती मद्यमांस । नाहीं तयास विच्यार पै ॥ १८ ॥ वर्णानाम् ब्राह्मण गुरु । हाचि शास्त्रींचा निर्धारु । घडला विपरीत विच्यारु । शूद्र थोरु ज्ञान बोधिती ॥ १९ ॥ मर्यादा साऱ्याचि राहिल्या । शिष्य न मानी गुरुवचनाला । न पुसे स्त्री भ्रताराला । अनुचित कर्माला प्रवर्तती ॥ २० ॥ पुत्र गांजिती मातेतें । जनका त्यागुनी करिती तीर्थ । सेवक प्रभुते धिःकारीत । राजे पीडित प्रजेसी ॥ २१ ॥ संतवेश धरुनि दैत्य । धर्म विध्वंसिला सत्य । वाघ्यांश करूनि या जगाते । धाडिती त्वरित नर्कालया ॥ २२ ॥ भक्ति साधन राहिलें । विषय मनीं खवळले । येकसरा वाहूं लागले । जन सकळ मायाडोहीं ॥२३॥ तेणे कळवळले ब्रह्मऋषी । अवतरते जाहाले भूमंडळासी । तयाचिये चरित्रासी । ऐका मनासी येकाग्र करूनि ॥ २४ ॥ श्रीगंगेचे उत्तरेस । देवगीरी पर्वत विकसे । तेथून पुढें वेरुळ दिसे । स्थान विशेष उत्तरभागीं ॥ २५ ॥ जो का विश्वकर्मा तेणें । वेरुळ रचिलें असें जाण । तेथें नांदती पंचवदन । आदिकरुन देवसारे ॥ २६ ॥ निधुने ग्राम बोलती जन । वेरुळाचे उत्तरेस जाण । तेथील समर्थ ब्राह्मण । यजुर्वेदी पूर्ण वाजसनीं ॥ २७ ॥ नाम जयाचें रामचंद्र । अनुभव ज्ञानाचा समुद्र । पतिव्रता स्त्री निर्धार । नाम जिला थोर गोदावरी ॥ २८ ॥ उभयता मूर्ति अनुष्ठानाते । पाहुनी तयाचा भावार्थ । जन्मते जाहाले समर्थ । आत्मवेत्ते वसिष्ठमुनि ॥ २९ ॥ ब्रह्मविद्यामाजि जो का सिद्ध । नाम धरिलें तोंचि प्रसिद्ध । यालागीं बोलती जगशुद्ध । आबालवृद्ध सिद्ध तया ॥ ३० ॥ भटजीबावा

विख्यात । कर्म प्राधान्य ज्याचें प्रेम । जन्मांतर उपासना श्रीराम । भक्ति परम थोर पै ॥ ३१ ॥ उपपुराण जे कां आदित्य । तेथें निर्णय केला सत्य । यजुर्वेदी या निमित्य । जन्म धरीत वसिष्ठऋषी ॥ ३२ ॥ गर्भीच असतां मातेसी डोहळे । व्रतस्थ नेम सदा सोवळे । पुराणकथा ऐकतां वेळे । घालवी सकळ जननी ते ॥ ३३ ॥ प्रपंचधर्म न रुचे कांहीं । ध्यानस्थ बैसणें सर्वदाही । ऐसें प्रकारें नवमासही । पूर्णता देहीं गर्भासी ॥ ३४ ॥ प्रसूतकाळ रामजयंती । वसिष्टमुनि अवतार क्षिती । वर्णूं जाता उत्छाह गति । तादात्म्यवृत्ति होतसे पै ॥ ३५ ॥ दिवसोदिवस वाढतां जाण । बुद्धि जेवि चंद्रांशकीर्ण । पंचमवर्षी व्रतबंधन । जाहालें पूर्ण यथोक्त ॥ ३६ ॥ समदृष्टी सुहास्य । वदन । दर्शन होतांचि हरे शीण । जरी जाहालीया दैवें भाषण । मृत्युजननभय सरे ॥ ३७ ॥ सहजस्थिति अध्ययन । प्रतिष्ठानक्षेत्रीं केलें जाण । सकळ शास्त्रें जाहाली प्रवीण । अठरा पुराणें उपपत्ति ॥ ३८ ॥ सविता आंगी जैसी कीर्णे । पुष्पें सुगंध असे पूर्ण । वसिष्ठार्यासी अध्ययन । तैसें जाण या अवतारीं ॥ ३९ ॥ सकळसिध्दाचा ईश्वर । याळागी नाम सिद्धेश्वर । जेणें उपदेशिला श्रीरामचंद्र । तो हा मुनींद्र कलीमाजीं ॥ ४० ॥ तयाचें वर्णितां महीमान । शेष समर्थ नसे जाण । तेथें बापुडे मानव दीन । काय स्तवन करील ॥ ४१ ॥ परी श्रीगुरु कृपा कौतुक । सरिते केलें तेणें देख । जेवि वेद रेडियामुखें । ज्ञानोक्ति निके बोलाविले ॥ ४२ ॥ असो वसिष्ठ आवतार बाबामाहाराज । धर्म स्थापने जाहाला सहज । कर्म प्राधान्य ज्ञानबीज । प्रगटले सहज भूठाईं ॥ ४३ ॥ आत्मप्राप्तीलागीं सोपान । रचिले वेद नारायणें । कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड जाण श्रुतिमाजी ॥ ४४ ॥ मुळीची पाईरी टाकून । वेधू जाती निजसदन । तेणें होतसे पतन । नरकसदन भोगीती ॥ ४५ ॥ पुष्पापासोनी येती फळ । तरी ते पुष्पाचि अव्हेरिले । मग प्राप्त कोठोनि फळ । प्राणी नाडले निजहिता ॥ ४६ ॥ तेवि कर्म नसता उपासना । सिद्धी न

पवे सहसा जाणा । बोलूं जातां शब्दज्ञान । काय वचना वेचतसे ॥ ४७ ॥ लोप जाहाला आचार जेथें । राहील विच्यार कैसा तेथें । यालागी श्रीवसिष्ठाते । धरणें देहाते भूठाई ॥ ४८ ॥ वेदबाह्य क्रीयावर्ण । तोंडभरी ब्रह्मज्ञान । संतवेश धरुनी जाण । भोळीजन भोदिती ॥ ४९ ॥ राहिला सभूळ तरुणोपाय । नरदेह पावोनि जाय । येतद्विषई योजिली सोय । कर्मप्राधान्य सिद्धेश्वरी ॥ ५० ॥ त्रिकाळविधि स्नान करणें । संध्यावंदन देवार्चन । गायत्रीजप पुरश्चरण । हेचि चिंतन जयाचें ॥ ५१ ॥ प्रवृत्ति निवृत्ति दोघी स्त्रिया । सिद्धेश्वरभटजीयोगीया । प्रवृत्ति धाडिली विलया । निवृत्ति हृदया फळप्राप्ति ॥ ५२ ॥ त्रिगुणात्मक तिन्हीपुत्र । रजतम आणि सत्व पवित्र । दोष हरती नाममात्रे । प्रताप थोर जयाचा ॥ ५३ ॥ रजांश जो कां उत्पन्न । तया आवडे राजकारण । परी अंतरीं सावधान । स्वरूपानुसंधानभाउक ॥ ५४ ॥ तमोगुणाचे वैराग्य । शंकरापरी ज्ञानभाग्य । चौसष्टकळासौभाग्य । भक्तिसांग हृदई ज्या ॥ ५५ ॥ सत्वांश तो विष्णुचि केवळ । रामचंद्रनामें सोज्वळ । वेदमूर्ति प्रांजळ । भक्ती निर्मळ सज्ञान ॥ ५६ ॥ असो गुणातीत सिद्धेश्वर । वसिष्ठमुनींचा अवतार । जाहाला असे महीवर । परिसा चरित्र तयाचें ॥ ५७ ॥ देवगुरु जो बृहस्पति । तेणें जन्म धरिला क्षीती । अमृतराय तो निश्चिती । ज्ञानमूर्ति आत्मऐक्याचा ॥५८॥ घडता तयाचा सत्संग । अनुग्रह जाहाला तेथेचि सांग । दीपीं दीप मिळतां मग । अद्वय सांग प्रकाश तो ॥ ५९ ॥ रायजीचें प्रथक स्तवन । वर्णिलें असें आख्यान । या आध्याई प्रस्तुत सांगणें । बसिष्ठ अवतरण जाहाले ते ॥ ६० ॥ सर्वत्र येक आत्मासिद्ध । परि जग जाहाले भ्रमांध । संकल्पगुणें देहसमंध । सेविले द्वंद्व मायेचें ॥ ६१ ॥ ईश्वरत्व गेलें हारपोन । नाडिले जीव मीतूपण । याचिसाठी नारायणें । रूप धरणें साधूचें ॥ ६२ ॥ जाणीव प्रासोनि अवशिष्ट । तोचि जाणिजे वसिष्ट । सकळ संशय होती नष्ट । जाहाल्या स्पष्ट दर्शन तें ॥ ६३ ॥ आत्मानुभवी योगीराज ।

सिद्धेश्वरस्वामिमाहाराज । जगदोद्धार करणे काज । हेंचि साजे वृत जया ॥ ६४ ॥ तीर्थमिसे मोक्षदानी । निघते जाहाले सिद्धमुनि । ठाई ठाई संत नमोनी । काशीस्थानीं पातले ॥ ६५ ॥ विश्वेश्वरासी नमन केलें । तात्काळ तेणें दर्शन दिधलें । देवभक्तासी आलिंगन जाहालें । ते सुख वर्णिलें नवजाय ॥ ६६ ॥ क्षेत्रस्थासी आनंद जाहाला । शिष्टजनीं सत्कार केला । बादरायण प्रत्यक्ष देखिला । व्यास आश्रमाला जातांचि ॥ ६७ ॥ जान्हवीतटीं अकस्मात । दृष्टीं पडले महासमर्थ । ज्ञानानंद सद्गुरुनाथ । ज्याचा अमृतरायास अनुग्रह ॥ ६८ ॥ सिद्धेश्वरस्वामीसी । पुसिते जाहाले ते सन्यासी । परंपरा सांगा कैसी । मालिकेसी अनुक्रमें ॥ ६९ ॥ भटजीबाबा कथन करिती । संप्रदायमाला ऐका श्रोती । श्रवणमात्रे दोष हरती । आत्मप्राप्ति होतसे पै ॥ ७० ॥ माहाविष्णुआदिनारायण । तयाचा शिष्य चतुरानन । हंसरूपाते अवलंबोन । आत्मज्ञान उपदेशीले ॥ ७१ ॥ ब्रह्मदेवें सनकादिका । अनुग्रह केला असे निका । नारदा प्राप्ति जाहाली देखा । सनकादिकापासोनी ॥ ७२ ॥ नारदें बोधिले व्यासासी । तेथुनी प्रसाद शुकाच्यार्यासी । तें सुख लाधले सन्यासी । आत्मविलासी पूर्णानंद ॥ ७३ ॥ पूर्णानंद स्वामीचा । ज्ञानानंदा अनुग्रह साचा । रायजीस लाभ ब्रह्मसुखाचा । ज्ञानानंदाचा प्रताप पै ॥ ७४ ॥ अमृतराय सद्गुरुनाथ । तेणें ठेविला मस्तकीं हात । सांगितला निजपंथ । तोचि सत्य निवेदिला ॥ ७५ ॥ सांप्रदायमाळा सांगता ऐसी । सद्गद जाहाले यती मानसीं । बावाचे धरिले करासी । स्वस्थानासी घेउनि गेले ॥ ७६ ॥ मग तो संवाद उभयतांचा । ग्रंथीं लिहोणे न घडे साचा । तर्क कुंठित परावाचा । तेथें मनाचा न चले ॥ ७७ ॥ काशीवास स्वछंदे । करा ह्मणती ज्ञानानंद । भटजीबावा निर्द्वंद । केली सिद्ध आज्ञा ते ॥ ७८ ॥ क्षेत्रवासी ज्ञाते पुरुष । तयासी जाला परम हर्ष । नित्य येती दर्शनास । सिद्ध विशेष बंधादी ॥ ७९ ॥ द्वादशवर्षें होतो जाहालीं । पूर्णता वृत्तीसी पातली । ज्ञानानंदगुरुमाउली । काय बोलितो बावासी ॥ ८० ॥ जगदोद्धार करात-

यासी । येथें आला भूमंडळासी । राहिले कार्य ते मेमेंसी । भटजीबासी वाट दावा ॥ ८१ ॥ अनुभव होता मानसीं । जेथें राहावें तेथें काशी । जाणें आता स्वदेशासी । कुटुंबासी भेटावया ॥ ८२ ॥ सिद्धेश्वर स्वामी तये वेळा । नमिते जाहाले चरणकमळा । वंदन केलें विश्वेश्वराला । निरोप घेतला क्षेत्राचा ॥ ८३ ॥ ज्ञानानंद परमगुरुते । नमन केलें पुन्हा मिरुते । निघते जाहाले अक्षय्येचे । भटजी समर्थ ततक्षणीं ॥ ८४ ॥ मार्गी चालता भेटती प्राणी । होतसे मुक्ति तया दर्शनीं । सहजस्थिती येता सदनीं । वंदिली जननी जनक तो ॥ ८५ ॥ अंगी स्वभाव पूर्वीचा । पुरश्चरणीं छंद ज्याचा । विच्यार केला स्थानाचा । येकांतीचा प्रेमा तो ॥ ८६ ॥ सिद्धेश्वरस्वामी फिरत फिरत । पंढरीसी पातले निश्चित । सामोरे आले रुक्मीणीकांत । देवभक्त भेटले पै ॥ ८७ ॥ भटजीबावा तेचि वसिष्ठ । श्रीराम जाहाले विठल स्पष्ट । श्रोतीं संशय न धरा नष्ट । अनुभवमिष्ट येकात्मता ॥ ८८ ॥ आणीक येथे निघतो क्लेश । विचक्षण करा स्थीर मानस । भटजीबावा ह्मणावयास । हेतु विशेष तो ऐका ॥ ८९ ॥ भटजी ब्राह्मणा संबोधन । परि सिद्धेश्वर-स्वामी प्रसिद्ध जाण । भटजीबावा नामाभिधान । जगीं प्राधान्य या हेतु ॥ ९० ॥ वसिष्ठमुनि सद्गुरु बरवा । उपदेश केला श्रीराघवा । यालागी बोलिजे भटजीबावा । लक्ष लावा तयापदीं ॥ ९१ ॥ असो सिद्धेश्वर पंढरीसि । हितगुज बोलती देव त्यासी । प्रेम दाटलें ऋषि-केशी । ते गोष्टिसी न वर्णवे ॥ ९२ ॥ कृतकृत्य मानिती भगवान । धन्य ह्मणती आजीचा दिन । सिद्धेश्वरस्वामीचें दर्शन । कृतार्थ तेणें मी जाहालों ॥ ९३ ॥ सकळसंत मिळोनी । लागते जाहाले बावाचे चरणीं । धर्मस्थापना करणें मेदीनी । हेंचि करणें उचित आपणा ॥ ९४ ॥ हास्य करुनि श्रीगुरुराजें । साष्टांग नमिला गरुडध्वज । भावें वंदिला संतसमाज । केला अर्ज श्रीहरीसी ॥ ९५ ॥ पाहिजे अम्हा येकांतस्थान । सन्निध असावे श्री आपण । ऐसें स्थळ सांगा कवण । रम्यमाण शुचिभूत ॥ ९६ ॥

सिद्धेश्वरस्वामीप्रती । श्रीपांडुरंग स्वयें काय बोलती । कृष्णातीरीं श्रीपति । नृसिंव्हाकृति मी तेथें ॥ ९७ ॥ पुरश्चरण करावयासी । जागा योग्य निश्चयेसी । भूअंतरगत अनुष्ठानासी । राहावयासी योग्य ते ॥ ९८ ॥ आज्ञा वंदुनी भटजीसमर्थ । नृसिंव्हपुरासी आले निरूते । गुप्तरूपें राहिले स्वस्थ । आत्मगुह्यांत स्थिरावले ॥ ९९ ॥ श्रीमूर्ति पाहुनी नयनीं । परम उल्हास जाहाला मनीं । येकाग्र बैसले आसनीं । सिद्धमुनि तपश्चर्ये ॥ १०० ॥ नाहीं कवणासी भाषण । गोमूत्रपिष्टाचें सेवन । मृगाजिना-वरी शयन । करिती जाण योगीराज ॥ १ ॥ मस्तकी शोभे जटाभार । पाहातां दिसे गिरिजावर । श्रीराम मुखीं उच्चार । व्याघ्रांबर विभूति आंगीं ॥ २ ॥ द्वादशवर्षे ऐसे रितीं । सिद्धेश्वर स्वामी अनु-ष्ठान करिती । अष्टमासिद्धि पाया लागती । दास्य करिती बावाचें ॥३॥ गुप्तस्थिती ध्यान करणें । नाशिकाग्रीं दृष्टी पूर्ण । अहोरात्र सदा बैसणें । येकाग्रमनें अहर्निशीं ॥ ४ ॥ अष्टांगयोग सहजस्थिती । जया आंगीं बिराजती । दृढ समाधिकेचि स्फुर्ति । भीनली वृत्ति चिदंबरीं ॥ ५ ॥ कोण्ही येक समईं श्रीगुरुराज । विवरांत बैसले बावामाहाराज । विद्युल्लता ते सतेज । आली सहज श्रीजवळी ॥६॥ मग तो अनर्थ कैसी गती । ठाउकेचि आहे सर्वाप्रती । परि समाधी निश्चळवृत्ति । आत्मस्थिति मिनले जे ॥ ७ ॥ जवळी येउन गेली चपळा । कांहीं विदित नसे जयाला । ऐसा योगी समर्थ भला । अवतार जाहाला वसिष्ठाचा ॥ ८ ॥ धर्मस्थापना करावी । अज्ञानजना वाट दावावी । कर्मप्राधान्य प्रगटला रवि । सदाचार उर्वि निजकीर्णे ॥ ९ ॥ सकळसिद्धामाजि वरिष्ठ । श्रीरामगुरु मुनिवसिष्ठ । सिद्धेश्वरस्वामी नाम श्रेष्ठ । म्हणतां स्पष्ट दोष जाती ॥ ११० ॥ द्वैताद्वैत नसे कांहीं । भूतमात्रीं दया पाही । आत्माराम सर्वाठायीं । दुजी नाहीं उपासना ॥ ११ ॥ समाप्त करुनी अनुष्ठान । गृहस्थाश्रमी वर्ते पूर्ण । नित्य करावें अन्नदान । पूर्वील जाण स्वभाव तो ॥ १२ ॥ जे जे क्षुधिस्त प्राणी येती । तया करावी इच्छा तृप्ती । नसेचि कांहीं दिवाराती । हाचि चित्तीं छंद जया ॥ १३ ॥

पृथ्वीमाजीं दुष्काळ पडला । अन्न न मिळे कवणाला । तयेकाळीं नृसिंव्हपुराला । ब्राह्मणमेळा येतसे पै ॥ १४ ॥ अठरा वर्ण अनेक ज्ञाति । भीकारभणंग तृप्त होती । पाहावयासी हे प्रचिती । केली कृति ईश्वरें पै ॥ १५ ॥ मध्यरात्रीं अकस्मात । बैरागी आले तीन शत । वाट चुकोनी अरण्यांत । स्मरण करीत बावाचें ॥ १६ ॥ सिद्धेश्वरस्वामी शेजेवरी । कळले तयासी अंतरीं । मशाल लाऊन त्या झडकरी । आणविली सारी साधुवृंदे ॥ १७ ॥ पूजन करुनी यथोक्त । पुसिला साकल्य वृत्तांत । बैरागी म्हणती आम्ही क्षुधित । उपासी निश्चित चार दिवस ॥ १८ ॥ दाळ खीचडी देतां भोजन । ईच्छा होईल तरीच पूर्ण । स्वामी समर्थ बावा आपण । आलो ऐकून या ठाया ॥ १९ ॥ स्वामी सांगती अतिथीसी । खिचडी पोटा सोसेल कैसी । निरशने घडलीं तुम्हासी । भक्षणेसी योग्य वोदन ॥ १२० ॥ उदईक आज्ञेप्रमाणे । दाळखिचडी करवितो अन्न । यथेष्ट करावे सेवन । मान्य करणें प्रार्थना ॥ २१ ॥ संतोष जाहाला बैरागीया । पाकसिद्धि करउनिया । । वाढिले ठाया अन्नें ते ॥२२॥ नंतर सारिली निद्रा सर्वीं । धन्य भटजी लीलालाघवी । वसिष्ट अवतार हा गोसावी । प्रतापरवि उगवला ॥ २३ ॥ दुसरे दिवसी ईच्छाभोजन । दाळखिचडी करविली जाण । अनेकप्रकारें पक्वान्न । करिती जेवण बैरागी ॥ २४ ॥ कामधेनु प्रसन्न जेथें । न्यूनता असेल कैची तेथें । सकळसिध्दि हात जोडीत । मुक्ति लोळती ज्यापाई ॥ २५ ॥ जे जे प्राणी शरण येती । कृपेनें तया उद्धरिती । अनाधिकारी भलते ज्ञाती । पावन होती दर्शनें ॥ २६ ॥ आणीक चमत्कार ऐका नवल । जलचर मगरासी ज्ञान जाहाले । पदस्पर्श मेळविले । स्वरूप अखिल त्यामाजि ॥ २७ ॥ सांगू तेचि संक्षेपयुक्ति । येकाग्र करणें अवधानवृत्ति । संतकथेसी धरितां प्रीती । आत्मस्थिती वरीतसे ॥ २८ ॥ रेटरेग्रामीं दक्षणवाहिनी । कृष्णा जेथें कैवल्यदानी । देवालयीं शूळपाणी । सहितभवानी पशुपति ॥ २९ ॥ अद्भुतस्थान अरण्यवास । पाहाता चित्त परमउल्हास ।

तये स्थळी केला वास । कांहीं दिवस बावानी ॥ १३० ॥ सर्वकाळ समाधिस्थ । अन्हिकारूप आचरण करित । देवालयाच्या पश्चमे जात । स्नानें करीत त्रिकाळीं ॥ ३१ ॥ मगर निघे उदकातुनी । प्रत्यही लागे स्वामिचरणीं । मागुती रिघे तेन्हांचि जीवनीं । कृष्णावेणीमाजी पै ॥ ३२ ॥ जन्मांतरीचा योगभ्रष्ट । सुसर होता गंधर्व स्पष्ट । शापबळें जाहाला नष्ट । देह कनिष्ट प्राप्त तया ॥ ३३ ॥ उश्शाप कथिला इंद्रानी । उद्धरतील वसिष्टमुनि । पदस्पर्शे स्वस्थानी । जाशील आसनीं तूं ऋषिकृपें ॥ ३४ ॥ ऐसा वर होता दिधला । प्राप्त दिवस तोचि जाहाला । सिद्धेश्वरस्वामी स्नानाला । अन्हिका लागले पै ॥ ३५ ॥ महान्तविक्राळ शरीर । उदकाबाहीर पडला मगर । निबिड दाटला अंधःकार । न दिसे विच्यार नेत्रासी ॥ ३६ ॥ स्नानविधि सारोनि बरवा । वस्त्रे नेसले भटजी बावा । आसनसिद्धियोग करावा । संध्या अनुष्टान सर्वाध्यक्ष पै ॥ ३७ ॥ ह्मणुनी सुसर पृष्टीवरी । आसन घालिते निर्धारी । वरि बैसले मदनारी । तयापरी श्रीस्वामि ॥ ३८ ॥ प्राणायाम आत्मस्थिती । धारणा धरितां येकाग्रवृत्ति । नसें चि कांहीं देहस्मृति । सहस्त्रदळाप्रति स्थिरावले ॥ ३९ ॥ सप्तघटिंकापर्यंत । भटजीबावा ध्यानस्थ । मगरा लागली ताटस्त । योगस्थित मुद्रा ते ॥ १४० ॥ सूर्यउदय होताक्षणीं । जन पावले तयेस्थानीं । शिष्ये आवलोकिता नैनीं । हाहाकार जनीं जाहाला तो ॥ ४१ ॥ दुरोनि गर्जना सकळ करिती । बावा उठा सत्वरगती । सुसर गिळील तुह्मा निश्चिती । मगरमीठी ती न सुटे पै ॥ ४२ ॥ स्वामी स्वस्थ निमग्न स्वरूपीं । मगरही जडला तद्रूपी । जैसी मछी आसता आपीं । उपदेश झडपी शिवाचा त्या ॥ ४३ ॥ मछोदरीं जाहाले जनन । मछिंद्रनाथ तोचि जाण । तयापरी येथें पूर्ण । मगरी निमग्न येकात्मता ॥ ४४ ॥ सप्तघटिकानंतर । बावा आले देहावर । पाहातां जवळी नारीनर । हाका येकसरे मारिती ॥ ४५ ॥ मगरपृष्टिवरुनी । खाली उतरले मोक्षदानी । चरणी मस्तक ठेउनी । आत्मभुवनीं सुसर गेला ॥ ४६ ॥ ऐसा स्वामि सिद्धे-

श्वर । वसिष्टऋपि अवतार । जाहाला असे महीवर । कथा थोर तयाची ॥ ४७ ॥ पुढें कथन रसाळ । श्रोतीं द्यावे चित्त प्रांजळ । भक्तमंजरी होतसे माळ । श्रीघननीळ पुजावया ॥ ४८ ॥ स्वयेचि होउनी सिद्ध हृदई । ग्रंथा स्फुरण देतसे पाही । समचरणीं ठेविली ठाई । निरंतर ध्याई ते निजरूप ॥ ४९ ॥ राजारामीं स्थिरता मन । उदेले भाग्य संत सेवन । धन्य सद्गुरु सिद्धचरण । जाहालो पावन त्रिवाचा ॥१५०॥ भक्तमंजरीमाळाग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । सिद्धेश्वरस्वामि आख्यानातें । अध्याय समाप्त प्रथम हा ॥ ५१ ॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय छपन्नावा ॥ ५६ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ५७

### — सिद्धेश्वर स्वामी —

( पुढें चालू )

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय जी सिध्दगणेशा । निज आतमया स्वयंप्रकाशा । मायादेवि चिद्विलासा । श्रीसिद्धेशा जगद्गुरु ॥ १ ॥ मातापिता तूंचि सर्व । कुळदेवता श्रीराघव । सिद्धचि उभा स्वामीराव । देवाधिदेव विटेवरी ॥ २ ॥ चिद्गगन ते पंढरी । विठल भरला चराचरीं । भाव पुंडलीकाचे द्वारीं । आत्मा मुरारी तिष्टत ॥ ३ ॥ मूळमाया रुक्मीणीकांता । तीची जाणा उन्मनी अवस्था । तूर्या साक्षिणी राही तत्वता । प्रकृति त्या अष्टनायका ॥ ४ ॥ मनचंद्राच्या सोळा कळा । षोडशसहस्र त्याचि अवळा । सत्रावी ते जीवनकळा । पाहीले डोळा निजतीर्थ ॥ ५ ॥ चौघडा वाजे माहाद्वारी । अनुहातध्वनि नानापरी । कीर्तन होतसे गरुडपारी । क्षेत्राभीतरी स्वानुभवें ॥ ६ ॥ नृदेहयात्रेसी येतां भळे । भावें पुजावा श्रीविठल । भक्तसुमनें करुनि माळ । गुंफुनी फुळें अर्पितसे ॥ ७ ॥ सिंव्हावलोकन मागील कथा । श्रोतीं असावी येकाग्रता । मगर उद्धरिला सर्वथा । स्पर्श होतां सिद्धेश्वर

॥ ८ ॥ रेटरेग्रामीं कृष्णातीरीं । लीला केली हे निर्धारीं । उपमा द्यावया कुसरी । सृष्टीवरी दुजी नसे ॥ ९ ॥ प्रत्यक्ष अवतार वसिष्ठाचा । जगीं जाहाला असे साचा । जन्मांतर स्वभाव जयाचा । कर्म करण्याचा प्राधान्य पै ॥ १० ॥ राजगुरुत्व प्राप्त जाहालें । ततो लक्षण असेंचि पाहिले । शिवाजीस उपदेशिले । कृतार्थ केले ततक्षणीं ॥ ११ ॥ करवीरक्षेत्रीं तो नृपति । वास्तव्य करी छत्रपती । परम उदास वैराग्य चित्तीं । ब्राह्मणप्रतिपाळकर्ता ॥ १२ ॥ आत्मदर्शनीं उतावेळ । जाहाला राजा तो प्रेमळ । युगासम जातसे पळ । प्रश्न सकळ करी संताते ॥ १३ ॥ कोठें न घडे समाधान । मना न पडे कांहींच चैन । विषवत् वाटती भोग संपूर्ण । प्राप्तीविण सकळही ॥ १४ ॥ ऐसे लोटतां कांहीं दिवस । वार्ता ऐकिली कर्णास । श्रीनृसिंहपुरीं माहापुरुष । करिती वास बावासमर्थ ॥ १५ ॥ तात्काळ स्वारी सिद्ध करुनी । राजश्री आले क्षेत्रालागुनी । सिद्धेश्वरस्वामी पाहातां नैनीं । गेलें भुलोनि सर्वेंद्रियें ॥ १६ ॥ कमळ विकासे पाहातां सूर्य । कीं चंद्रदर्शनीं चंद्रकांता होय । नातरी वत्स देखोनि गाय । आनंद लाहे तयापरी ॥ १७ ॥ दीनवदने कर जोडुनी । दंडवत घातिले मेदिनी । ह्मणे स्वामि कैवल्यदानी । आत्मतत्व नैनीं दावीं तूं ॥ १८ ॥ पाहुनी भावार्थ राजीयाचा । कृपाघन वोळला सद्गुरुसाचा । तत्वमसि वाक्य स्वानंदाचा । पडला ज्ञानाचा पर्जन्य तो ॥ १९ ॥ मग तो अनुभव अबोलणा । उन्मनी वर्तत्से लीहिता मना । बळेंचि तुर्येचे जातसे सदना । संतस्तवनालागीं पै ॥ २० ॥ त्वंपद तत्पद असिपद । अन्वय व्यतिरेक दाविला शुद्ध । प्राप्त जाहाला निजानंद । लाधला बोध परिपूर्ण ॥ २१ ॥ यथायुक्त गुरुपूजन । शिवाजीनें केलें जाण । काया वाचा आणी मनें । केलें अर्पण सकळ राज्य ॥ २२ ॥ उदक सोडिलें स्वामीचरणीं । उभा ठेला जोडुनी पाणी । म्हणे बैसा राज्यासनीं । स्वामियांनि मी सेवक ॥ २३ ॥ जैसा का जयत्पाळ । राजा गुरुभक्त प्रेमळ । गुरुदक्षणे राज्य सकळ । आर्पिले प्रांजळ मुकुंदमुनी ॥ २४ ॥

तैसें चि येथें जाहाले असे । भटजीबावासी आले हासे । आज्ञा करिती राजियास । येकाग्रमानस तें ऐका ॥ २५ ॥ आपणासहित राज्य आर्पिलें । तरी पाहिजे वचन मानिले । शिष्यलक्षण तेंचि भलें । करणें सफळ गुरु आज्ञा ॥ २६ ॥ आमुचे राज्य सकळप्रजा । संरक्षी तूं चालवी काजा । प्रधान मंत्री पुत्र आजा । करणे वोजा प्रतिपाळ ॥२७॥ भूतदया न्याय नीती । शिक्षा करणें दुष्टाप्रती । सांभाळावी आत्मस्थिती दिवाराती नामस्मरण ॥ २८ ॥ अवस्य ह्मणोनी आकिती करुणा । म्हणे नसावा वियोग चरणा । श्रम न वाटे माझिया मना । भद्रासना तरी बैसे ॥ २९ ॥ सद्गुरुनाथें आश्वासिलें । शिवाजीस वचन दिधलें । तात्काळ वंदिलीं श्रीपाउलें । राजे गेले स्वस्थाना ॥ ३० ॥ कृपासिंधु सिद्धेश्वर । वसिष्ठऋषीचा जो अवतार । विख्यातनाम सृष्टीवर । भटजी थोर जन बोलती ॥ ३१ ॥ दर्शन होतांचि हरती व्याधी । स्मरण जयाचे दिव्योपधी । स्वसुखानंदीं पहुडे बुद्धि । ज्ञानवृद्धि होतसे पै ॥ ३२ ॥ कुष्टादिक इतर कांहीं । राहातील कैसी तये देहीं । सद्गुरुकृपा जाहालिया पाही । संचित ठाईं गरीब ते ॥ ३३ ॥ प्रारब्ध समर्थ जरी मानूं । आधीच मिथ्या कळली तनु । उदय पावतां चिद्भानु । नुरे भाम द्वैताचें ॥ ३४ ॥ धन्य प्रताप गुरुभक्तांचा । काय ह्मणुनी वर्णील वाचा । अगाध महिमा ब्रह्मनिष्ठांचा । जेथें प्रश्नचा आतिसौरस्य ॥ ३५ ॥ जे जे इच्छा धरुनी येती । ते ते तात्काळ तया देती । अवतार जाहाला क्षिती । उपमा जगतीं नाहीं तया ॥ ३६ ॥ कोणी मागती संतान । कोण्ही दरिद्रें पाडिली जाण । भटजीबावासी येता शरण । होती पावन ततक्षणीं ॥ ३७ ॥ सासुरवासिणी येती मुग्धा । येक सुचविती भूतबाधा । त्रिविधताप अनेक अपदा । श्रीगुरु-पदा निवेदिती ॥ ३८ ॥ जेवि कल्पवृक्ष तो भाषण । नाहीं करीत कवणालागुन । परी होतसे ज्यासी दर्शन । ईछित जन ते पावती ॥ ३९ ॥ नातरी श्रीआदित्य । दर्शनीं कमळ विकसत । जग होतसे व्याप्रत । धर्मी रत आपुलाल्या ॥४०॥ कीं चिंतामणीसी पाहतां नेत्रीं ।

चिंतिले कार्य होतसे जनीं । अलिप्त तो स्वस्थानीं । जेवि तरणी गगनीं तो ॥ ४१ ॥ तयापरी श्रीस्वामीते । मागती नाना चित्तीचे अर्थ । सिद्धी पावती मनोरथ । काय संत न करिती पै ॥ ४२ ॥ भटजीबावा तपोराशी । वसिष्ठ अवतार प्रत्यक्ष ऋषी । कृपाकटाक्षें पाहाती ज्यासी । मुक्ति दासी तयाच्या ॥ ४३ ॥ मृतप्राणी उठविले । उदकाचे घृत चि केलें । व्याघ्रादिक वश्यचि जाहाले । सर्प भके शफत मानीती ॥ ४४ ॥ ऐशा कथा भिन्न भिन्न । लीहीतां वाढेल ग्रंथ पूर्ण । अंत न लागे वर्णितां गुण । यालागी संज्ञ सुचवीतसे ॥ ४५ ॥ छाटी जयाची तपीन्नली । कुशाचे अग्नी सृष्टी धरीली । तेथें कार्यें हि केतुली । अवतरली वरीष्टमाये ॥ ४६ ॥ जैसे समुद्रासी अर्घ्य देणें । कीं सूर्यालागी वोवाळणें । तैसे येथें केलें वर्णन । संक्षेपपणें यथोक्त ॥ ४७ ॥ असो जे जे गुरुचे दास । जयासी कळला लक्षांश । येरे केले आयुष्यनाश । उगाच वाचांश करुनी ॥ ४८ ॥ नरदेह न मिळे पुन्हा कांहीं । येथें पाहावी आत्मसोई । यास्तव संत प्रगटती पाही । भूठाई कलीमाजी ॥ ४९ ॥ सिद्धेश्वरस्वामी माहासमर्थ । नृसिंहक्षेत्रीं वास करीत । जो जो प्राणी शरण येत । पावन करीत तयासी ॥ ५० ॥ नित्यविधी ब्राह्मणभोजन । कृष्णास्नान त्रिकाळ करणें । अनाथ दीनाचे संरक्षण । हेंचि पूर्ण व्रत ज्याचें ॥ ५१ ॥ जनीं आध्यात्र प्रगटविला । ज्ञानमार्ग सांग दाविला । आत्मानुभव दीप उजाळिला । आनंद जाहाला त्रैलोकीं ॥ ५२ ॥ जो जो संशय जयाचे चित्तीं । तो तो तयाचा छेदिती । कीर्ति फाकली दिगांतीं । दर्शना येती शास्त्रज्ञ ॥ ५३ ॥ ऐका श्रोते उत्तम गोष्टी । बावासी जाहाली झळक भेटि । तये काळीं कीला मोटी । केली गोमटी ते ऐका ॥ ५४ ॥ काशीकरपंडित गर्विष्ट । पुणीयासी वास्तव्य त्याचें स्पष्ट । वार्ता ऐकीली अवचट । भटजी वरिष्ट थोर म्हणुन ॥ ५५ ॥ प्रयाण करुनी लवलाही । नृसिंव्हक्षेत्रासी आला पाही । गर्व स्फुंदतसे देहीं । पंडित हदई तो द्विज ॥ ५६ ॥ आता जिंकू येकवचनीं । मिथ्या ज्ञान

बोलती जनीं । ऐसे म्हणुनी प्रवेश सदनीं । करी धरुनी अहंकृति ॥५७॥ भटजीबावा जेथें बैसले । जाउनी तेथें नमस्कारिले । मग बोलों आरंभिले । ब्राह्मणपण सकळ वेचुनी ॥ ५८ ॥ जेवि रात्रींमाजी नानाप्रभा । गगनामाजी तेणें शोभा । सहस्रकीर्णे फांकती नभा । निस्तेज आभा ते सर्व ॥ ५९ ॥ तैसे अज्ञान जनाठाईं । पंडित प्रतिष्ठा मिरविती पाही । तत्त्वनिष्ठ भेटता कांहीं । शक्ति नाहीं तयासी ॥ ६० ॥ भटजी समर्थ सिद्धेश्वर । वसिष्ठऋषींचा अवतार । तयापुढें छळणद्वारें । आरंभि त्वरें प्रश्नासी ॥ ६१ ॥ मौनस्थिती बावानीं । हास्य करुनी ऐकिलें श्रवणीं । आज्ञा केली पुत्रालागुनी । प्रश्नोत्तर वदनीं वदावया ॥ ६२ ॥ पंडित मनीं तो चाकाटला । ह्मणे अपूर्व दिसती येथें लीला । आज्ञापिले धाकुट्या मुला । विनोद जाहाला अवघा तो ॥ ६३ ॥ अनेकक्षेत्रीं वाद । येकवाक्यता न घडे सिद्ध । माहाबोळके जाहाले स्तब्ध । काय छंद मुलाचा ॥ ६४ ॥ ऐसा विस्मय करुनी चित्तीं । पंडितें आरंभिली गूढयुक्ति । नानामाहाराज सत्वरगति । छेदन करिती प्रश्नाचे ॥ ६५ ॥ पंडित वाक्यें प्रौढ गज । सूक्ष्म सिंव्ह नानामाहाराज । शास्त्रीअभिमानभुजंग सतेज । खगेंद्र साजे नाना तो ॥ ६६ ॥ असो फार काय दृष्टांत घेणें।केले पंडितगर्वहरण । अभ्दुतमहिमा ज्याचा पूर्ण ॥ किती ह्मणून वर्णावें ॥ ६७ ॥ कोण्ही पंगु अंध येती । मुकेबधिर चरणीं लागती । तयाचे ते काम पुरती । प्रतापदीप्ती सूर्य तो ॥ ६८ ॥ देहसमंध दुरावती । ईतर समंधा सहजगती । अत्यंतमूढ तेंचि वदती । श्रुति स्मृति पुराणादि ॥ ६९ ॥ क्षमेचा तो जैसा गिरी । शांति खेळे ज्याचे घरीं । घोळंगती मुक्ति च्यारी । वैराग्य द्वारीं लोळतसे ॥ ७० ॥ भटजीबावा कोणी येक दिवसीं । बैसले असती स्नान संध्येसी । तीव्रउष्णकळाराशी । माध्यान्हासी सूर्य आला ॥ ७१ ॥ मिळाले भाऊकब्रह्मवृंद । मध्ये स्वामी श्री प्रसिद्ध । विनाविती ते भाव शुद्ध । उष्ण प्रसिद्ध सोसवेना ॥ ७२ ॥ सिद्धेश्वर स्वामी तये वेळा । अवलोकिती सूर्यमंडळा । मित्रस्तवन आरंभिला । सिंचिले जळा

अभिमंत्रुनी ॥ ७३ ॥ तात्काळ अभ्र येते जाहाले । मंदवातें गगन भरलें । ब्राह्मण अवघे संतोषळे । चाकाटले जग सर्व ॥७४॥ आणीक दुजा चमत्कार । श्रोतीं ऐका तो विच्यार । भोजना बैसले विप्र साच्यार । वर्षे जलधर तत्समईं ॥ ७५ ॥ शिष्य सांगती बावासी । ब्राह्मण उठती उपवासी । मेघ वोळला चौपासी । जळवृष्टीसी निवारा ॥ ७६ ॥ सिद्धेश्वरमुनि तपोनिष्ट । केवळ अवतार श्रीवसिष्ट । काय तयासी लागती कष्ट । पर्जन्य स्पष्ट निवारावया ॥ ७७ ॥ मेघ जावा ऐसे युक्ती । मंत्र आरंभिला उत्तम श्रुति । अभ्र फाकले दिसे गभस्ती । आनंद चित्तीं द्विजाचे ॥ ७८ ॥ जेविते जाहाले स्वस्थ ब्राह्मण । टाळी पिटति सकळ जन । अघटित प्रताप ज्याचा गहन । धरिलें मौन शेषादि ॥ ७९ ॥ निर्विकल्प जयाची स्थिती । वेदाची तो प्रत्यक्षमूर्ति । नामस्मरणीं अत्यंत प्रिती । श्रीरघुपती ज्याचे संगे ॥ ८० ॥ सहजीशद्ध तें चि स्तवन । सहजीपाहाणें तें दर्शन । जिकडे स्वामी करिती गमन । तें तो जाण प्रदक्षणा ॥ ८१ ॥ विषय सेवन नानाविध । पूजा घडली तेचि शुध्द । स्वामी संदेह सच्चिदानंद । महाराज सिद्ध दयाघन ॥ ८२ ॥ विदेहस्थिती योगीराणा । देहभान त्या नसे चि जाणा । कोणी येक दिवसीं भटजी भोजना । येकाग्र मना बैसले ते ॥ ८३ ॥ तये काळींचा वृत्तांत । अद्भुत नवल जाहाली मात । केळांत मीठ कालउनी हातें । वाढिलें होतें शिष्यानें ॥ ८४ ॥ बहुत घालिती भक्तिकरून । स्वामी स्वस्थ भाक्षिती जाण । सदा स्वरूपीं अनुसंधान । इंद्रियमान कैचि रुची ॥ ८५ ॥ नंतर शिष्यसमोदाई । प्रसाद उरला घेतला ठाईं । मुखीं घालितां झाडिती डोई । अनुताप हृदईं जाहाला त्या ॥ ८६ ॥ घळघळा नेत्रीं अश्रू आले । वाढणार विस्मिती होउनी ठेले । शर्करा म्हणुनी लवण घातिले । बावा जेविले कैसे ते ॥ ८७ ॥ सिद्धेश्वर स्वामीसी शिष्य सांगती । भोजन करितां कैसे रिती । क्षारपदार्थ सेवन प्रिती । कृपामूर्ति केला तुह्मी ॥ ८८ ॥ ऐकोनी ऐसे निर्धारी । बावा आले देहावरी । क्षार ह्मणुनी सांगती वैखरी । नरनारीस आश्चिर्य ते ॥ ८९ ॥ या नांव

बोलिजे पूर्णदशा । काय वर्णिजे त्या सिद्धेशा । अज्ञानतम हारपली निशा । दाही दिशा उजळिल्या ॥ ९० ॥ नृसिंव्हक्षेत्र विराजमान । वेदघोष पुराणश्रवण । वैकुंठासम दिसे जाण । सदा कीर्तन त्या स्थळीं ॥ ९१ ॥ दुजी पंढरीच पै केली । धन्य कृपाळु गुरुमाऊली । आच्यार पीठ स्थापोनी भली । वाट केली ब्रह्मपदा ॥ ९२ ॥ मूर्खप्राणी कर्म द्वेशी । आडवे मातंग ते मार्गासी । विवेक शस्त्रें वारिलें त्यासी । दयाराशि सिद्धेश्वर ॥ ९३ ॥ पुढें शिवाजीरायास । चैन न पडे करवीरास । सद्गुरुवियोगें मानस । सुख तयास नोव्हे जगीं ॥ ९४ ॥ अन्न भक्षितां स्वाद न कळे । कैसे लागेल मधुर जळ । शेजेवरी निजतां डोळे । निद्रा केवळ नाहीं तया ॥ ९५ ॥ कारभार विच्यार मंदावला । सेना-समुदाय घाबिरा जाहाला । मंत्री पुसती राजीयाला । कैसें तुम्हांला वाटतसे ॥ ९६ ॥ शिवाजी सांगे हृद्गद । सन्निध असावे श्रीगुरुपद । हे चि आह्मा दिव्यौषध । दुजें प्रतिपाद्य नसे पै ॥ ९७ ॥ प्रधान मंत्री मिळोनी सेना । लिहीते जाहाले विज्ञापना । सिद्ध करवोनी शीबिका जाणा । पाठविली जाणा चतुरद्विज ॥ ९८ ॥ लीहूं जातां पदार्थ ग्रंथीं । अष्टौभाव दाटती चित्तीं । स्वसुखासनीं पहुडे वृत्ति । लेखणी पावती स्तब्धता ॥ ९९ ॥ असो ऐसी ते पत्रिका । सिद्धेश्वर स्वामीसी धाडिली देखा । वाचितां डोलवी माथा सखा । अर्थ चोखा रसभरीत ॥ १०० ॥ रुक्मीणी ते श्रीकृष्णासी । लिहिली होती पत्रिका जैसी । सुदेव पाहातां ऋषिकेशी । गोष्टी तैसी घडली ते ॥ १ ॥ भटजीबावा क्षेत्रस्थासी । नमस्कारिले नृसिंव्हासी । निघते जाहाले करवीरासी । कुटुंबासि घेऊनी ॥ २ ॥ तये काळीं क्लेश जाहाले । द्विजवरानीं प्रार्थीयले । म्हणती आमुचें पुण्य सरलें । ऐसें वाटले सकळीका ॥ ३ ॥ सिद्धेश्वरस्वामी तयेवेळा । संतोषविती सर्वांला । पादुका आश्रमीं ठेविल्या । नंतर धरिला पंथ मग ॥ ४ ॥ सव्य घेउनी क्षेत्राते । भटजी येते जाहाले करवीराते । निघाले सत्वर त्वरित । भजन करीत आनंदेसी ॥ ५ ॥ सामोरे पातले ब्राह्मण । शृंगारिलें नगर जाण । राजा घाली लोटांगण ।

करिती नमन सकळ प्रज्या ॥ ६ ॥ अनेक वाद्ये वाजती । शर्करा भाविक ते वाटिती । माडिया गोपुरी उभे राहाती । दर्शन घेती बावाचें ॥ ७ ॥ धन्य ह्मणती आमुचे करवीरक्षेत्र । स्वामीसारिखें आलें सत्पात्र । वास्तव्य केल्या सहितकळत्र । निवती नेत्र सहज ते ॥ ८ ॥ सिद्धेश्वरस्वामी ठाईं ठाईं । नमस्कार घेत लवलाही । येते जाहाले देवाळईं । अंबिका हृदईं स्तवियेली ॥ ९ ॥ गुणत्रयाची स्वामिणी । मूळमाया ते स्फुरद्रूपिणी । नमस्कारिली लक्ष्मी जननी । चिन्मयखाणी साष्टांगे ॥ ११० ॥ द्विजवरेसी नृपतिसहित । प्रवेश केला राजमंदिरांत । शिवाजी जाहाले कृतार्थ । पूजनीं रत स्वामींचे ॥ ११ ॥ बांधवोनि शुद्ध आश्रमाते । राहाते जाहाले सद्गुरुनाथ । पत्नीसहित बावासमर्थ । वास्तव्य तेथें केलें पै ॥ १२ ॥ सेवेमाजी सर्वकाळ । राजा तिष्ठे तो प्रेमळ । दर्शन घेतसे त्रिकाळ । भक्ति अढळ जयाची ॥ १३ ॥ लौकिकाच्यारें राजनीती । येऱ्हवी नावडे विषयसंपति । शिवाजीस बाणली विरक्ति । रंगली वृत्ति गुरुचरणीं ॥ १४ ॥ जैसे काहीं श्रीयेकनाथ । गुरुभक्ति आचरिली येकचित्तें । तैसें चि येथें घडलें वृत्त । शोभे दृष्टांत द्यावया ॥ १५ ॥ अहर्निसीं तो चि छंद । क्षण येक न विसंबिती सद्गुरुपद । कायावाचामनें शुद्ध । जाहाले शुद्ध गुरुभजनीं ॥ १६ ॥ स्वामीसी अर्पण केलियाविण । न सेवी पदार्थ राजा आपण । सर्वकाळ हात जोडून । तिष्टे लीनपणें सदा ॥ १७ ॥ नाहीं दुसरें आणीक दैवत । कुळधर्म अवघे श्रीगुरुव्रत । नामस्मरणीं सदा वृत । निष्ठा सतत गुरुवचनीं ॥ १८ ॥ धन्य राजा शिवाजी भाविक । आज्ञेविण न घेचि उदक । क्षणक्षणा विच्यारी देख । प्रकार अनेक कार्यासी ॥ १९ ॥ हें चि जयाचें तीव्र अनुष्ठान । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण बाधूं काय शकती विघ्नें । निर्भय जाण राज्य करी ॥ १२० ॥ नाना अरिष्टें दूर होती । सद्गुरुचरणीं ज्याची प्रीती । शिवाजीस तारिले बहुयुक्ती । लीलाकृति सिद्धेश्वरें ॥ २१ ॥ लीहितां तयाचा विस्तार । कथा वाढेल ते चि फार । मुख्य येथें वर्णिलें सार । आत्मविच्यार

श्यामाजीं ॥ २२ ॥ जयाचे सत्ते वायु हाले । सूर्यबिंब उदेजळे । ऐसे ऋषि समर्थ भले । तेथे केतुले इतर ते ॥ २३ ॥ परि भक्ति हेचि प्राधान्य । म्हणुनी केलें कांहीं वर्णन । विषयांध जाहाले बहुत जन । न आपण कोण ते ॥ २४ ॥ उगीच कथा चावटी गाती । विसरोनी गेले आत्मप्रचिती । यास्तव जाहाला अवतार क्षीती । वसिष्ट जगती सिद्धेश्वर ॥ २५ ॥ अध्ययनशाला निर्मान बरवी । निगमध्वजा लाविली सर्वी । ऋग्यजुसाम पढवी । वेदगोसावी प्रत्यक्ष जे ॥ २६ ॥ पुत्रद्वारा प्रगटार्थ । वेदा करविले जगांत । आपण स्वरूपीं निर्गत । पंचमस्थित-वेदीं पैं ॥ २७ ॥ पांचवा वेद तो स्फुरण वोंकार । तेथुनी ध्वनि बिजां-कुर । शब्द उमटला जो हाकार । तोचि हारी मूळवेदा ॥ २८ ॥ सकार-स्वरूपीं सहजी लीन । अनिर्वचनीय तेंचि स्थान । योगी जाणती ऐसे खूण । इतरजन काय जाणे ॥ २९ ॥ केवळ करूं अत्यंतप्रगट । तरी क्षोभती संतशिष्ट । सद्गुरुविणें न कळे स्पष्ट । खरी गोष्ट हेचि पै ॥ १३० ॥ आत्मस्वरूप न कळे जया । त्याग करणें गुरु तया । मंत्र तंत्र जपणें वाया । असोनी हृदया न आणति ॥ ३१ ॥ असो स्वामि सिद्धेश्वर । भक्तिज्ञानाचें माहेर । आच्यारसहित प्रगट विचार । केला उद्धार भूमंडळीं ॥ ३२ ॥ करवीरक्षेत्रीं राहुनी बरवे । वेदपठणें स्तविला शिव । उद्धारिले सकळ जीव । कीर्ति सर्व भुवनत्रइं ॥ ३३ ॥ नानापदें अभंगेसी । पूजन केलें ऋषिकेशी । प्रसन्न जाहाले आयोध्यावासी । सन्निध ज्यासि युगायुगीं ॥ ३४ ॥ जाग्रतिस्वप्नसुषुप्तींत । व्यापुनी आदिअंत । अंतर्बाह्य श्रीरघुनाथ । जया सतत मार्गेपुढें ॥ ३५ ॥ गृहस्थाश्रम सांग केला । संतति संपत्ति आच्यारशीला । जगीं मार्ग प्रांजळ जाहाला । श्वेतु बांधिला भवडोहीं ॥ ३६ ॥ मग कांहीं काळे करून । सेविते जाहाले निर्गुणसदन । सिद्धेश्वरस्वामी माहामान्य । गोड कथन तयाचें ॥ ३७ ॥ कोण तिथी कोण मास । ऐका श्रोते सावकाश । वसिष्ठमुनि सिद्धेश । पार्थिवांश विसर्जिला ॥ ३८ ॥ सत्राशे शके शालिवाहान । तेवीस वर्ते जाहाले पूर्ण । संवत्सरासी

नामाभिधान । दुर्मति जन बोलती पै ॥ ३९ ॥ यालागीं स्वामीचे समाधीसी । संवछर शरण आला ते वेळेसी । पावन जाहाला जगत्रयासि । सुमति तयासी ततक्षणीं ॥ १४० ॥ वसंतऋतु माधवमास । पुण्यतिथी षष्ठी दिवस । पक्ष ह्मणती कृष्ण ज्यास । समय विशेष धन्य ते ॥४१॥ सोमवंशी कृष्ण जन्मला । तोचि वार प्राप्त जाहाला । योगी साधिती जया काळा । समय आला तोचि पै ॥ ४२ ॥ उत्तरायणी उत्तमगती । सर्वोत्तम वसे जयाप्रति । परी जगीं शास्त्ररिती । ठेवील क्षीती नरतनु ॥ ४३ ॥ जाहाला वाद्याचा एकगजर । विमानीं दाटले आंबर । दर्शना पातले सुरवर । गिरीउयावर आदिकरुनी ॥ ४४ ॥ जाणें येणें कैचें तया । सिद्धेश्वरस्वामियोगीया । अखंड निमग्न स्वरूपालया । चिदात्मठाया परिपूर्ण ॥ ४५ ॥ जळीं तरंग होती जाती । अवतारलीला तैसी संतीं । नातरीं गारा उदकीं दिसती । परी असती सबाह्य ते निर ॥ ४६ ॥ भटजीबावा समाधिस्त । जाहाले करवीक्षेत्रांत । शिवाजिराजा गुरुभक्त । उत्छाह बहुत केला पै ॥ ४७ ॥ श्रीपंचगंगेचियेतटीं । स्थान केले अद्भुत सृष्टि । आदिकरुनि परमेष्टि । धुर्जेटि जेथे बसे ॥ ४८ ॥ दक्षणप्रयागभागीरथी । गंगायमुनासरस्वती । सकळ तीर्थें वास करिती । धन्यक्षिती करवीर ते ॥ ४९ ॥ माहालक्ष्मी मूळमाया । अखंड राहीली जयाठाया । मति न पुरे वर्णावया । आदिगया तीर्थें ज्या ॥ १५० ॥ अनेक देव अनेक ऋषि । वास्तव्य करिती ज्याभूमीसी । तेथें स्थान समाधीसी । आत्ममीरासि योगीया ॥ ५१ ॥ स्थापोनी श्रीपादुका । स्थान रचिलें परम देखा । प्राणी पावती आत्मसुखा । दर्शनीं निका आत्मलाभु ॥ ५२ ॥ उत्छाह होतसे प्रतिवर्षी । वद्यषष्ठी वैशाखमासीं । यात्रेसीं येताती समस्त ऋषि । ज्ञानराशि आत्मध्येते ॥ ५३ ॥ समारंभ तो अद्भुत । अनेक देशींचे मिळती संत । कीर्तन करिती पंडित । तुल्य निश्चित पंढरी ॥ ५४ ॥ अन्नदान सर्वभूतीं । अमर जेथें प्रसाद ईछिती । धन्य अवतार भूमीप्रती । कृपामूर्ति श्रीवसिष्ट ॥ ५५ ॥ जनीं आच्यार स्थापोनी भला । समास केली जेणें

लीला । तोचि पंथ असे चालिला । पुत्र जाला ज्ञानसूर्य ॥ ५६ ॥ परंपरा ते पूर्वीच कथिली । यथामति कीर्ति वर्णिली । भक्तमालिका हे गुंफिली । कथा भली उत्तमोत्तम ॥ ५७ ॥ ग्रंथ करविता श्रीगुरु प्रसिद्ध । रामदास अवतार स्वामी सिद्ध । राजारामी होउनी सिद्ध । चरित्र विशद वदवीतसे ॥ ५८ ॥ सिद्धेश्वरभटजी आख्यान । प्रेमरज्जु गुंफिलें सुमन । श्रीरामपदीं समर्पण । अनन्यपणें केलेसें ॥ ५९ ॥ बाबापाध्याची कथा सुरस । वदविती पुढें श्रीसिद्धेश । श्रोते देउनी अवधानास । येकाग्रमानस श्रवण करा ॥ १६० ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ श्रवणें चि पुरती मनोरथ । सिद्धेश्वर आख्यानाते । द्वितीय होत अध्याय हा ॥ १६१ ॥ अध्याय ॥ २ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमे अध्याय सत्तावन्नावा ॥ ५७ वा ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



## अध्याय ५८

### — काशीनाथ उर्फ बाबापाध्ये —

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयसद्गुरु सिद्धस्वरूपा । निरंजना निर्द्वंद भूपा । चैतन्यघना जि चिद्रूपा । करी कृपा गोसाविया ॥ १ ॥ जगउत्पत्तीपालकसंव्हारा । मूळमायेच्या तूं भ्रतारा । ज्ञानाब्धि-शाई परात्परा । निर्विकारा श्रीसद्गुरु ॥ २ ॥ निबिड अज्ञानतिमिर-नाशका । उद्बोधकीर्ण प्रकाशका । वैराग्यकमळविकासका । सुखदायका आत्मसूर्या ॥ ३ ॥ जीवगजेंद्र उन्मत्त । अहंकारनक्र त्या वोढित । भ्रांतिडोहीं बुडवित । आक्रंदत मायाजळीं ॥ ४ ॥ तया वारणाच्या साहाकारिया । चतुर्भुज तूं स्वामिया । सुदर्शनचक्रें रक्षुनिया । नेहसी ठाया लवलाही ॥ ५ ॥ स्तविता गुरुराया तुम्हांसी । मही न पुरे लेखनासी । सिंधुशाई लेखणीसी । वनस्पतीसी जरी करिता ॥ ६ ॥ तरी आतां हेंचि बरवें । चरणीं मस्तक सदा ठेवावें । संतमंजरीसी अर्पावें । मनोभावें तवपदीं ॥ ७ ॥ याकारणें होउनी श्रोतावक्ता ।

वदवा स्वामी मुळिच्या कथा । श्रीभगवान जानकीकांता । हृदयस्था प्रगट होई ॥ ८ ॥ कोण कोणाचा अंश । अवतरले संत भूमीस । प्रार्थना परिसोनी सर्वेश । कथवी सिद्धेश दयाघन तो ॥ ९ ॥ ऐकतां ते कथन परवडी । ब्रह्मस्थिति होय रोकडी । स्वसुख पाविजे तेचि घडी । घेईजे गोडी श्रवणीं ते ॥ १० ॥ म्हणुनिया सकळ श्रोते । अवधान द्यावें उदारचित्ते । जन्ममृत्यु चुके अवर्त । निराशी घात संतलीला ॥ ११ ॥ श्रीनिवृत्यादिभक्त चौघे जण । अवतरले होते सगुण । परि ते असंस्कारपूर्ण । वाटले जाण रुक्मिणीवरा ॥ १२ ॥ तयाचे व्रतबंधादिलग्नक्रीया । करणें राहिले राहिले मनोदया । याकागी श्रीपंढरीराया । निजहृदया आवड बहु ॥ १३ ॥ निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर । सोपान मुक्ता संत थोर । समाधिस्थ जाहाले त्वरे । नाहीं फार वाचले पै ॥ १४ ॥ श्रीपांडुरंगें समाधी देऊन । पंढरीसी आले आपण । परी सखेद जाहालें मन । समाधान न पडे पै ॥ १५ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान । मुक्ता भेटेल कधीं जाण । मनीं विठला हेचि ध्यान । लागले चिंतन सदा हृदईं ॥ १६ ॥ ज्ञानोबाने अवतार घेतले । येकनाथ आणि जयराम जाहाले । परी मानस उतावेळ । इछिती डोळे पुन्हा पाहावया ॥ १७ ॥ असो ऐसे चतुर्विध । भेटती ह्मणे कै गोविंद । पांडुरंगीं हाचि छंद । लागला शुध्द निजध्यासे ॥ १८ ॥ घ्यारशेसाठ वर्षे लोटलीं जाण । परी पंढरीसी न येती अज्ञान । वदती तयासी श्रीभगवान । तुह्माविण मी परदेशी ॥ १९ ॥ तेन्हां ज्ञानदेव बोलिले । देवा सर्वत्र रूप तुझें भरलें । येकदेशित्व आवडलें । हे तो प्रांजळ सागरया ॥२०॥ मग भक्तसखा बोले जाण । ज्ञानराया तूं परम सज्ञान । परी मातेचे स्तनीं प्रेम पूर्ण । दुग्ध जाण उचंबळलें ॥ २१ ॥ तो प्रकार जाणे माता । अनन्यचि होय अनुभविता । तू ज्ञानोबा आहेसी जाणता । ज्ञानवेत्ता ह्मणुनी ॥ २२ ॥ ऐसें बोलता पंढरीनाथ । निवृत्तिदेव प्रेमें सद्गदीत । धरुनी सोपानाचा हात । आवडी बोलत स्वलीले ॥ २३ ॥ माउलीये तुजवांचून । क्षणहि आह्मा न गमे जाण ।

परी तुझी आज्ञा शीरीं वंदोन । केलें सेवन निर्गुण पै ॥ २४ ॥ हीं इतुकीं वर्षें गेलीं । युगासमान तीं जाहालीं । आतां जैसे तव हृत्कमळीं । पाहीजे केली तसी आज्ञा ॥ २५ ॥ कवणीये ठाई ठेविसी । हें सांग बा तूं हृषीकेशी । मग पांडुरंग स्वभक्तासी । निजप्रीतीसी बोलत ॥ २६ ॥ म्हणती तुह्मी चतुर्विध । अवतार घेणें जगीं प्रसिद्ध । निववावे नेत्रवृंद । तरी आनंद मजलागी ॥ २७ ॥ ऐसें बोलतां चक्रपाणी । आज्ञा मानिली चौघांनीं । निवृत्ति सोपान मुक्ता ज्ञानी । जन्मली मेदिनी ते ऐका ॥ २८ ॥ आधीं श्रीनिवृत्तीचें चरित्र । वदविती स्वामी सिद्ध पवित्र । अनुक्रमेंसी पुढें तंत्र । त्रिविधा सुत्र परिसिजे ते ॥ २९ ॥ अनंतोपाध्ये भगवद्भक्त । भागवतधर्म ज्या सकळ विदित । जयाचा सखा श्रीभगवंत । ऋणी सतत युगायुगीं ॥ ३० ॥ तया उदरीं माहाराज । निवृत्तिनाथ भक्तिध्वज । जन्म पावला सतेज । जयाचें चोज रुक्मिणीवरा ॥ ३१ ॥ जनकजननी काशीनाथ । वदती तथा सुनिश्चित । कां जे अंश उमाकांत । निवृत्ति सत्य अवतार जो ॥ ३२ ॥ गर्भसंभव होतां जननी । घेरिले तये निजउन्मनी । ताटस्था होउनी नैनीं । सोहंध्वनी गर्जतसे ॥ ३३ ॥ नवविधभक्ति नऊ मास । पूर्ण होतां त्या गर्भास । उत्पन्न जाहाले श्रीयोगेश । काशीविश्वेश श्रीनिवृत्ति ॥ ३४ ॥ काशीनाथ नामाभिधान । बाबा पाध्ये ह्मणती जन । दिवसोदिवस वाढतां जाण । निमग्न सदा हरिरूपीं ॥३५॥ अहोरात्र नामस्मरण । रंगोनी गेलें ज्याचें वदन । दुजा खेळ नसे जाण । हरिनारायण वदे सदा ॥ ३६ ॥ विद्याभ्यास कासया तेथें । वेदपुरुष तो मूर्तिमंत । व्रतबंध घडला निश्चित । सकळवृत ज्याठाईं ॥ ३७ ॥ असो लग्न करुनि आनंदयुक्त । गृहस्थाश्रमी केले काशीनाथ । मग स्वपुत्र घेउनी विप्र अनंत । पंढरींत आले पै ॥ ३८ ॥ करुनी श्रीविठ्ठलपूजेसी । निवेदिले व्यवहारासी । जाणों सागर तपीला तोयेसी । जाहाली तैसी परी ते ॥ ३९ ॥ देव ह्मणे लाभ जाहाला । माझा सखा मज भेटला । मग पंढरीसी राहाविला । स्वभक्ताला परमप्रीती ॥ ४० ॥ विठल म्हणे काशीनाथा । कृतकृत्य

जाहालों आतां । वृत्ति धर्म धरिजे तत्वता । निवृत्ति असतां मजसाठीं ॥ ४१ ॥ विद्या सांगावी विद्यार्थीया । अन्न द्यावें क्षुधित आलीया । आश्रमधर्म स्वीकारूनिया । राहीं सखया तूं येथें ॥ ४२ ॥ ऐसें सांगतां पंढरीनाथ । निवृत्ति देव तो काशीनाथ । आज्ञा मानोनी सुनिश्चित । राहीले सतत पंढरीसी ॥ ४३ ॥ श्रीचे संनिध वोवरी । वसविली जेणे माहाद्वारीं । विद्यासत्र निरंतरी । वदे वैखरी हरिनामें ॥ ४४ ॥ अनाथ गरीब मूढमति । शरण येतां जयाप्रती । वसे जिव्हे सरस्वती धन्यमूर्ति काशीनाथ ॥४५॥ अनेक ज्ञाति भीकारमणग । ब्राह्मण शूद्र मलंग फकीर । तृप्त करिती सकळ जग । अन्नढीग पात्रीं तया ॥४६॥ जें जें इछी जगाचें हृदय । तें तें पुरिती बाबापाध्ये । जो निवृत्ति अवतार आद्य । करिती सद्य मुक्त जीवा ॥ ४७ ॥ कोणे येके समईं श्रीभगवान । बैसले जवळ येऊन । ह्मणती करी बा कांहीं कवन । जेणें श्रवण सुखावती ॥ ४८ ॥ मग पांडुरंगमाहात्माप्रती । केले आधारें पादमौक्ति । श्रीपंढरी आख्यान जगाप्रती । उत्कृष्ट जगतीं प्रकाशिले ॥ ४९ ॥ तेथें श्रोतियें केला प्रश्न । पूर्वीं काय माहात्म नव्हतें जाण । तें वाढविलें महिमान । पाध्ये येणें काशीराजे ॥ ५० ॥ तरी मुळिचेंचि आहे विख्यात । परी अभक्तदैत्य दूषित । तयाचा चुकवावया अनर्थ । रचिला ग्रंथ स्वलीळा ॥ ५१ ॥ पूर्वींपासोनी निंदक असती । ते सत्कर्मा बळे निंदिती । तया निंदका अधोगति । होय निश्चिती तयाते ॥ ५२ ॥ तो चुकवावया अधःपात । द्रवती दयाळु संतचित्त । प्रतिष्ठिती श्रीभगवंत । धर्म सनाथ जो कां पै ॥ ५३ ॥ माहाभागवत तुळसी । श्रीविठलनाम घोषी । या तिहीसंगें उद्धरे दोषी । मुक्ति जीवासी तात्काळ ॥ ५४ ॥ परी या त्रिविधसाधना । दानव उछेदिती जाणा । याळागी अवतार घेती नाना । धर्मस्थापना श्रीगुरुते ॥ ५५ ॥ धन्य धन्य ते सर्वज्ञ साधु । करी ज्ञान जीवा बोधु । काशीनाथ दयासिंधु । बाबापाध्ये म्हणती जया ॥ ५६ ॥ दशम श्रीभागवतीसार । सर्व सुखाचें जें जिव्हार । तोषणीमूते विच्यारें । ग्रंथ तयावर केळा पै ॥ ५७ ॥ पदें अभंग विचित्र ।

नानाविध करुनी स्तोत्र । आराधिला प्रसन्नवक्त्र । समनेत्र श्रीविठ्ठल ॥ ५८ ॥ संसारीं वर्ततां जाण । जाहाले सहजी प्रजोत्पादन । निपज-विले धर्मसंतान । कन्यारत्न चतुर्विध ॥५९॥ सुखी करुनी जनासी । आपण लागले आत्मविच्यारासी । जाहाले असती निवासी । चिद्विलासी पंढरीचे ॥ ६० ॥ अशक्ता यात्रेंत दर्शन न होय । तयासी सांगती पंढरीराय । बाबापाध्ये त्याचे पाय । येकाग्रहृदय वंदा तुह्मि ॥ ६१ ॥ ऐसा साक्षात्कार आद्या-पवरी । पंढरींत आहे निर्धारीं । तेथील आवघे नरनारी । सांगती वैखरी जन लोका ॥ ६२ ॥ असो कोणे येके दिनीं । आठवले श्रीकाशीनाथमनीं । ह्मणती फिरावी अवनी । पाहावी नैनी तीर्थें तीं ॥ ६३ ॥ स्फुरण होतां ऐसे चित्ता । वियोग न साहे पंढरीनाथा । स्वयें येउनी काशीनाथा । सांगती तत्वता श्रीविठ्ठल ॥ ६४ ॥ ह्मणती काशीराजा निवृत्तिनाथ । जाऊं पाहासी तू बा तीर्था । हें तुवा आणिले वृथा । चैन सर्वथा न पडे मज ॥ ६५ ॥ ज्या ज्या तीर्था जावे वाटे । तीं तीं आहेत येथेंचि श्रेष्ठ । प्रत्यक्ष दावितो तुजला स्पष्ट । न धरी नष्ट संशय तो ॥६६॥ ऐसें वदोनी त्या अवसरीं । स्वहस्तें धरीले काशीनाथ करीं । तो माध्यान्हसी आला तमारी । निघाले हरि भक्त दोघे ॥ ६७ ॥ चंद्रभागेतीरीं येऊन । पुंड-रीकाजवळी घातिले आसन । देवभक्त बैसले पूर्ण । अवलोकन करिती पै ॥ ६८ ॥ श्रीविठ्ठल सुचविती पाध्यासी । पाहा आतां सकळ तीर्थासी । ऐसें वदतां ऋषिकेशी । जाहाली कैसी गोष्टी ते ॥ ६९ ॥ प्रत्यक्षता मूर्तिमंत । भागीरथ्यादि गंगा समस्त । पातल्या तेथें स्नानार्थ । चंद्र-भागेंत सकळ नद्या ॥ ७० ॥ जगत्रयाचे पाप भक्षून । आंगे जाल्या होत्या मळीन । पंढरीसी येतां जाण । स्वछता पूर्ण पातल्या त्या ॥ ७१ ॥ मग इतर जनाची काय कथा । दुरित जावया तेथें तत्वता । जेथे वैष्णवमेळा सर्वथा । तेथे तीर्थासी येणें पै ॥ ७२ ॥ पंढरी सांडुनी तीर्था जाणें । हे अयुक्त सर्वांगुणे । भीमातीरीं मुक्ति पूर्ण । लोळती जाण वाळवंटी ॥ ७३ ॥ स्नान करिता चंद्रभागे । तीर्थे हिंडती त्याचे मागें । मोक्ष स्वयें पाठी लागे । पायकी अंगीकरी पै ॥७४॥

जेथें वराडी मोक्ष जाहाला। तेथें पुढें कोण स्वर्गाला। देव जेणें गडी केला। त्याचावला भक्तिसुखा ॥ ७५ ॥ तीर्थें व्रतें दानें तपें। तो आवघाचि संताप। न जाये कोठें कदा पाप। नाशी अनुताप दोषासी ॥ ७६ ॥ पश्चात्ताप संतसंगें। तो हा पंढरीस सदा योग। यालागी सांगे रमारंग। पांडुरंग स्वदासा ॥ ७७ ॥ असो निवृत्ति अवतार बाबापाध्ये। काशीनाथ नामें जे कां प्रसिद्ध। तेणे कृष्णागंगादि तीर्थें आद्य। हरिप्रसादें पाहिलीं तीं ॥ ७८ ॥ चित्त बहुत सुखावलें। राऊळीं भक्त देव आले। मग कीर्तनासी आरंभिलें। उभे ठाकले बाबा ते ॥ ७९ ॥ तये कथेची अत्यंत शोभा। राम चि जेथें प्रत्यक्ष उभा। सुमन वर्षती देव नभा। फाकली प्रभा दशदिशा ॥ ८० ॥ ऐसा पाहाता अनेक लीला। मति न पुरे स्याहावयाला। निवृत्तिनाथ अवतार भला। तरी जगाला निजलीले ॥ ८१ ॥ सकळ तीर्थें श्रीपांडुरंगीं। बाबापाध्ये जाणुनी जगीं। पंढरीसी राहिले सत्संगीं। भजनरंगीं रंगले ॥ ८२ ॥ सेवटीं चतुर्थाश्रम घेऊन। चतुर्थ अवस्थे जाहाले लीन। सखा ज्याचा नारायण। कृपा पूर्ण सद्गुरुची ॥ ८३ ॥ मीराशीस्थान पंढरी पाहें। समाधी दिधली देवरायें। जाणुनी आपुले निवृत्ति हृदय। योजिला ठाय भीमातीरीं ॥ ८४ ॥ निधनकाळीं स्वर्गींहुनी। पावले शुक नारद मुनि। भजनकडाका अनुहतध्वनि। मिळाले ज्ञानी सकळीक ॥ ८५ ॥ अद्यापि तेथें समाधीपासी। देव प्रगटती कीर्तनासी। साक्षात्कार होतो जनासी। पंढरीसी भीमातीरीं ॥ ८६ ॥ विटेवरी समचरण। तटिकांत जो भगवान। तयाचा जो मुख्यप्राण। श्रीहनुमान जगद्गुरु ॥ ८७ ॥ स्वतसिद्ध तो रामदास। जयाचा प्रताप विशेष। मेळविले कल्याणास। कृपालेशें निजपदा ॥ ८८ ॥ राजारामीं रमऊन। वदविती स्वयें संतगुण। धन्य धन्य ते सिद्धचरण। अंतःकर्ण उज्वलित ॥ ८९ ॥ पुढें श्रीमध्वनाथ कथन। करविती सिद्धदयाघन। श्रवणें चि होय कामना पूर्ण। आत्मज्ञान प्रत्यक्ष तया ॥ ९० ॥ भक्तमंजरीमालिकाग्रंथ। श्रवणें चि पुरती मनोरथ। निवृत्ति अवतार काशीनाथ। आख्यान समाप्त आध्याय

हा ॥ ९१ ॥ आध्याय ॥ १ ॥ समाप्त: ॥ अनुक्रमें आध्याय अठावन्नावा ॥ ५८ ॥ समाप्त: ॥ श्री ॥ दत्तात्रय गुरु रघुनाथी ॥ निरंजन शिष्य वेदमूर्ति ॥ दत्तात्रय गुरु रघुनाथा । निरंजनचरणीं ठेवी माथा ॥

## अध्याय ५९

### — मध्वनाथ —

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्धस्वामिया । पंढरीनिवासा निज आत्मया । परात्परा श्रीरघुराया । अखंड अद्वया नमन तुज ॥ १ ॥ गणेश आणी सरस्वती । तूंचि सर्वात्मा दाशरथी । अंतर्बाह्य स्वयें ज्योती । सिद्धमूर्ति परिपूर्ण ॥ २ ॥ नाहीं रितें कोठें स्थान । जेथें तेथें तूं रघुनंदन । तव निजकृपे लाधली खूण । सोहंस्फुरण सर्वभूतीं ॥ ३ ॥ आतां हें चि मागणें देवा । प्रेमलक्षणा घडो सेवा । तरीच समाधान होईल जीवा । अक्षई राहावा भाव पदीं ॥ ४ ॥ भावा अभावातीत असती । मति तुरे निश्चयेसी । परी इच्छा हे मानसीं । राहे भक्तीसी करावया ॥ ५ ॥ तरी तूं देव मी भक्त । हें चि करणें सुनिश्चित । निर्गुण मुळींचे अद्वैत । काय तेथें ध्याऊं मी ॥ ६ ॥ यालागी स्वामी तूं सिद्ध । मी शिष्य ध्यातसे पद । तेणें घडे सहजीं आनंद । हाचि छंद पूर्वी आतां ॥ ७ ॥ ऐसी करितां विनंति । हांसिन्नले श्रीरघुपति । अभयवचने गौरविती । गुरुभक्ति करावया ॥ ८ ॥ वरदहस्त ठेउनी शीरीं । संतलीला वदविती बरी । ते चि ऐका तुम्ही चतुरीं । नरनारी सर्वत्र पै ॥ ९ ॥ साधुकथेहूनी अधीक । सार नसे कांहीं येक । ऐसें बोले रमानायक । प्रत्यक्ष श्रीमुखें श्रीभागवतीं ॥ १० ॥ तपें तीर्थे व्रतें दान । योगयाग सकळ यज्ञ । नाना विच्चार पुरश्चरण । संतकृपे-विण वृथा ॥ ११ ॥ स्वर्गादिक मुक्ति च्यारी । सदा तिष्ठती साधुद्वारीं । अष्टमासिद्धीसी कोण विच्यारी । साधनें सारी जोडिती कर ॥ १२ ॥

अधुना संतांसी सदा भजावें । कायावाच्यामनोभावें । ते चि आख्यान ऐकतां बरवें । प्राप्त वैभव सकळ तया ॥ १३ ॥ श्रीजयरामस्वामि गुरुभक्त । ज्ञानेश्वर अवतार येकनाथ । ते चि पुन्हा जन्म धरित । प्रेम अद्भुत भोगावया ॥ १४ ॥ वारंवार धरुनी देहा । जगदोद्धार करणें कार्या । हें चि कारण गुरुवर्या । अवतरण कराया भूठाईं ॥ १५ ॥ तें कथन बहुतें गोड । पूरवी जीवींचें सकळ कोड । संतचरित्रीं धरितां आवड । तात्काळ जोडे परब्रह्म ॥ १६ ॥ नीरानदीचिये तीरीं । कळबोली ग्राम उत्तम नगरी । जयरामस्वामी जन्म धरी । अश्वलायन बरी शाखा ते ॥ १७ ॥ मातापिता अनुष्ठाती । उदरीं जन्मली तया मूर्ति । कोण तया दृष्टांत जगतीं । जन्मविती संतांसी जे ॥ १८ ॥ तीर्थाहुनी कोटीगुणें । प्रायश्चित्तासी ते पावन । जया वंशीं जन्मले जाण । आत्मज्ञ पूर्ण साधु ते ॥ १९ ॥ असो गर्भींच असतां मातेसी डोहळे । करीत असावें भजन प्रेमळ । मनीं आठउनी तमालनीळ । समाधिस्थ केवळ होणें पै ॥ २० ॥ निर्माल्य तुळसी चोरून । भक्षित असाव्या सदा पूर्ण । अट्टाहास्यें गर्जून । करावें नर्तन श्रीजवळी ॥ २१ ॥ ऐशा प्रकारें नऊमास । पूर्ण जाहाले त्या गर्भास । प्रसूतकाळीं शिवरात्रीस । ठेविले नामास महादेव पै ॥ २२ ॥ सामुद्रिकचिन्हें सुलक्षण । अत्यंतलावण्य देदीप्यमान । ऊर्ध्वरेषा पाईं जाण । हास्यवदन सर्वदा ॥ २३ ॥ बाळलीला भगवत्पर । वैखरी वदे नामगजर । कीर्तन करावें प्रेमभरें । खेळ निरंतर हाचि पै ॥ २४ ॥ पुढें पांचवर्षें जाहालियावरी । व्रतबंध केला निर्धारीं । तये वेळीं वैकुंठविहारी । प्रगटले हरी मंडपांत ॥ २५ ॥ ब्राम्हणवेषें दैवतें सकळ । पातलीं तेथें प्रांजळ । जगन्माता भिकाळ । चक्रमणिवेल्हाळ घालितसे ॥ २६ ॥ ऐशापरी मौंजीबंधन । उत्कृष्ट जाला सोहळा जाण । पुढें विवाहप्रकर्ण । जगज्जीवनें केलें पै ॥ २७ ॥ नंतर निघोनी तीर्थासी । जाते जाहाले सच्चिद्विलासी । परि अनुताप सदा मानसीं । आत्मरूपासी प्रगटावया ॥ २८ ॥ फीरत फीरत जांभूळवनांत । येते जाहाले महादेव

संत । स्थळ पाहुनी येकांत । बैसले तेथें अनुष्ठाना ॥ २९ ॥ षण्मास भक्षुनी पर्णे । करीत असतां भगवद्ध्यान । प्रगट जाहाले अत्रिनंदन । षडभुज जाण ततक्षणी ॥ ३० ॥ आयुधें शोभती सुंदर पवित्र । दंड कमंडलू शंखचक्र । त्रिशुलडमरु प्रसन्नवक्त्रें । मुर्ति विचित्र त्रिगुणात्मक ॥ ३१ ॥ गळा माळा वैजयंती । अंगीं शोभे शुभ्र विभुती । पीतांबराची झळके दीप्ती । उपमा जगतीं नेस तया ॥ ३२ ॥ यज्ञोपवीत कपाळीं गंध । मेखळा घातिली आंगीं शुद्ध । जांबुळवनांत प्रसिद्ध । प्रगटले सिद्ध येकायेकीं ॥ ३३ ॥ महादेव द्विजें पाहातां नैनीं । नमन केलें साष्टांग चरणीं । अनन्यभावें जोडुनी पाणी । निजात्मदानी प्रार्थीतसे ॥ ३४ ॥ जयजयाजी सद्गुरुनाथा । दत्तात्रया त्रिगुणरहिता । मायामळ तूं चि हर्ता । नाहीं त्राता दुजा पै ॥३५॥ त्रिविधतापें तापला देह । पाहासी काय गुरुमाये। आतां दाखवीं आत्मसोय । तरी काहे सस्वरूप ॥ ३६ ॥ ऐसी करितां विनंति । हासिन्नले कृपामूर्ति । मस्तक स्पर्शिला निजहस्तीं । मंत्र सांगती निजकर्णी ॥ ३७ ॥ श्रवणीं पडतां निजबीज । नैनीं उगवले सतेज । जगदाभास लोपला सहज । स्वानंदाब्जवृक्ष उचंबळला ॥ ३८ ॥ वैराग्य भक्ति ज्ञान फांद्या । तया झाडासी आल्या विपदा । श्रुतिस्मृत्यर्थ जे कां आद्या । स्वरूप सद्या प्राप्त फळ ॥३९॥ अवस्थात्रई अगाध । लाधला सहजीं आत्मबोध । सहजसमाधी निर्द्वंद्व । भोगी छंद द्विजराज तो ॥ ४० ॥ मग दत्तात्रयानीं स्वमुखें करुनीं । मध्वनाथ नाम ठेविलें जनीं । वैष्णव साधूंत श्रेष्ठ ज्ञानी । ज्ञानतरणी स्वतसिद्ध तो ॥ ४१ ॥ ज्ञानेशाचा येकनाथ । येकोबा तो जयराम निश्चित । तो चि पुढें मध्वनाथ । अवतार सत्य कलीमाजी ॥ ४२ ॥ स्थापावया निजधर्मात । जन्म घेती सद्गुरुनाथ । सर्वोत्तमीं हें चि व्रत । पावन जगातें करणें पै ॥ ४३ ॥ मध्वनाथस्वामीचें जनन । सोळाशें येकूणहतर पूर्ण । शुक्लनामसंवत्सर जाण । माघ कृष्ण चतुर्दशी ॥४४॥ असो दत्तात्रयाचा उपदेश । होताचि पावले ब्रह्मपदास । नंतर निघाले पंढरीस । श्रीज्ञानेश मध्वनाथ ॥ ४५ ॥ मार्गीं चालतां भजन करितां ।

स्वकाव्योक्ति करुणा भक्ती । प्रेमाश्रु नेत्रीं स्रवती । नाहीं स्मृति देहाची ॥ ४६ ॥ तये काळीं रुक्मीणीवर । सामोरे पातले सारंगधर । विमानीं पाहती सुरवर । होतसे गजर नामाचा ॥ ४७ ॥ टाळमृदंग चिपळ्या वाजती । विणें टिपऱ्या पताका झळकती । अनेक मंडळी गाणीं गाती । मध्ये नाचती मध्वनाथ ॥ ४८ ॥ ऐशापरी आनंदयुक्त । पंढरीसी गेले ज्ञानवंत । स्नान करुनी चंद्रभागेंत । पुंडलीकाते नमन केलें ॥ ४९ ॥ नंतर निघोनी राउळासी । प्रवेशले कैवल्यराशी । पाहुनी ऋषिकेशी । उल्हास मानसीं बहु जाहाला ॥५०॥ साष्टांग नमितां श्रीविठ्ठलाते । कवळोनी धरिले दोन्ही हातें । हितगुज बोलती पंढरीनाथ । तया सुखाते कोण वर्णी ॥ ५१ ॥ असो वाळवंटी कीर्तनासी । उभे ठाकता ज्ञानराशी । तये वेळीचे वगत्रुत्वासी । नाहीं उपमेसी कांहीं दुजे ॥ ५२ ॥ सनकादिक श्रोते सकळ । संतोषले वैकुंठपाळ । स्वकरें काढुनी गळ्यांतील । घातली माळ भक्तावळे ॥५३॥ च्यातुर्मास्य राहुनी तेथें । येते जाहाले जांबुळवनांत । नमन करुनी अनुग्रहस्थानाते । दत्तात्रयाते आठविती ॥ ५४ ॥ वडगाव फलटणप्रांतातील । तेथे स्वईछा येउनी राहिले । गृहस्थाश्रमी वर्तती भले । परी प्रांजळ विदेहस्थिती ॥ ५५ ॥ अहोरात्र कीर्तन भजन । भगवत्‌गीता पठण करणें । शरण येतो मुमुक्षुजन । करिती पावन तात्काळ तया ॥ ५६ ॥ धर्मसंतान दोघी कन्या । निपजविरया परममान्या । होत्या जाहाल्या जगीं धन्या । उपमा अन्या नसे तया ॥ ५७ ॥ कोणे येके दिनीं श्रीअवधूत । कीर्तनीं प्रगटले स्वामी दत्त । दर्शन देउनी मध्वनाथाते । काव्योक्तीते आज्ञापिलें ॥ ५८ ॥ तये काळी मध्वनाथें । प्रार्थीयले गुरुदत्ताते । आरंभीले लावणीते । तो गुह्यार्थ ऐका तुह्मी ॥ ५९ ॥ शरीर हे चि पृथ्वी जाण । त्यामाजी वाढलें विषयरान । शब्दादि वृक्ष कंटक पूर्ण । माजले तृण कल्पनेचे ॥ ६० ॥ कामक्रोधादि वनचरें । सदा हिंडतीं भयंकर । गांजीले तेणें नारीनर । अनर्थ थोर जाहाला पै ॥ ६१ ॥ असंभाव्य ताडमाड । अहंकाराचे

माजले जुंबाड । केला जग तेणें उज्याड । दाटलें झाड तम पै ॥६२॥ तेथें हिंसक क्रोम दारुण । मातंग फिरती दुर्धर जाण । तेणें असंख्य मारिले पूर्ण । जीव अज्ञान सकळही ॥ ६३ ॥ ते हरीसी कळवळा । आला मच्छनाथरूपें अवतरला । अहंकृतीच्या वृक्षाला । तोडिता जाला विवेकबळें ॥ ६४ ॥ निर्मूळ करुनी झाडें सकळ । वासनेचें बीज काढिलें । विच्याराचे बैला योजिले । नांगर जुंपिले वैराग्याचे ॥ ६५ ॥ नामस्मरणभजनकडाका । निर्मळ केली हृदयभूमीका । अपसया पळाले चोर देखा । कामादिका न पडे धीर ॥ ६६ ॥ वनचरासी नाहीं थार । शुद्ध केली जमीन शरीर । भक्तीची वोल पाहुमी त्वरें । पेरलें खरें ज्ञानबीज ॥ ६७ ॥ गुरुकृपा होतां वृष्टि । अत्यंत बीज जाहाले सृष्टी । तेणें जाहाली तुष्टी पुष्टी । दैन्य दृष्टीं दिसेना ॥ ६८ ॥ ईयापरी मच्छ-नाथस्वामीनी । लावणी केली त्रिभुवनीं । जडोनि ठेले आत्मत्व नैर्मी । हाचि कवनीं मुख्य अर्थ ॥ ६९ ॥ पदे अभंग सकळ संतीं । स्तविला हरि नानाग्रंथीं । लावण्या करुनी मच्छनाथीं । यथायुक्ति जग उद्धरिले ॥ ७० ॥ ते लावणीपर काव्य पाहातां । नाहीं तया गर्भ व्यथा । शिवादिक तुकिती माथा । काय कथा इतर जीवा ॥ ७१ ॥ अत्यंत असतां मतिमंद । तात्काळ लाहे आत्मपद । सद्गुरुचा ज्या प्रसाद । तो चि वदे लावणी ते ॥ ७२ ॥ असो ऐसे मच्छनाथ । जगराम अवतार पूर्ण समर्थ । जया दर्शनें अज्ञान द्वैत । निरसे त्वरित ततक्षणीं ॥ ७३ ॥ ॥ रघुनाथ शिष्य जयाचा । अघटित प्रताप तयाचा । निरंतर वदे ज्याची वाचा । श्रीगुरुचा प्रताप पै ॥ ७४ ॥ उपासनेसी लाउनी जन । काळ सार्थक केला जेणें । ऐसें अनेक पाहातां जाण । केले पावन मच्छनाथें ॥ ७५ ॥ पंढरीचा प्रेमा बहुत । ऋणी केला वैकुंठनाथ । अवस्थाग्रई जवळी तिष्ठत । भक्तांकीत माहाराज तो ॥ ७६ ॥ श्रीसद्गुरु सिद्धनाथपदीं । प्रीती जयाची त्रिशुद्धि । मासपक्ष वियोग कधीं । न साह्य वृद्धि सप्रेम ते ॥ ७७ ॥ कोणे येके दिनीं माळेगावीं । आले सिद्धनाथगोसावी । वार्ता

ऐकुनी ते चि बरवी । मध्वनाथकवी पातले ते ॥ ७८ ॥ भवानदास तेथें होता । जो कां साधु आत्मवेत्ता । तयासी जाहाला आनंद चित्ता । सभेसी तत्वता करविलें ॥ ७९ ॥ मग मध्वनाथ प्रेमांत येऊन । आरंभीले तेथें श्रीचे कीर्तन । सिद्धस्वामी आदिकरुन । करिती श्रवण सकळीक ॥ ८० ॥ तये कथेचें निरोपण पाहातां । बाध्या पावती तन्मयता । प्रगटविली तूर्य अवस्था । प्रत्यक्षता स्वरूपस्थिती ॥ ८१ ॥ पूर्ण हृदई येऊनी कळवळा । आत्मा दृष्टीत दाखविला । अनिर्वाच्य वदुनी बोला । पांचजन्य केला सेवटीं पै ॥ ८२ ॥ तये काळीं सर्वत्र जना । ताटस्थता जाहाली जाणा । अलक्षमुद्रा लागली नैना । नाहीं गणना तया सुखा ॥ ८३ ॥ आबालवृद्धा समाधी । प्राप्त जाहाला तये संधी । ऐसा स्वामी कृपानिधी । ज्ञानउदधी उचंबळला ॥ ८४ ॥ मग जगद्गुरु श्रीसिद्धनाथ । आरती करविली तये कथे । उभयता निघोन अरण्यांत । गेले निश्चित पर्वतीं ॥ ८५ ॥ आत्मसंवाद दोघांचा । उदंड जाहाला अपूर्व साचा । जेथे कुंठित परावाच्या । तर्क मनाचा न चले पै ॥ ८६ ॥ पदें अभंग तये वेळीं । स्तवनपर उत्कृष्ट जाहाली । गाती संत भूमंडळीं । ज्ञान नव्हाळी ज्यामाजीं ॥८७॥ असो ऐसे चमत्कार । जगीं जाहाले असती फार । वर्णन करितां मति न पुरे । लीला अपार संताची ॥ ८८ ॥ सेवटीं जातां निजधामाते । अपूर्व वर्तलें ऐका श्रोते । पंढरीहुनी रुक्मीणीकांत । आले धांवत ज्यासाठीं ॥ ८९ ॥ वालेघाटावरी वडगावीं । असतां मध्वनाथ गोसावी । संतवृंदें मिळालीं बरवी । निधन जीवीं जाणुनी ॥ ९० ॥ भजनासी करुनी प्रारंभ । आठविला श्रीरमावल्लभ । ह्मणती सेवन करणें आजी निर्गुणनभ । न करा विलंब आतां हरी ॥ ९१ ॥ ऐशापरी भाकितां करुणा । प्रगट जाहाला देवराणा । पाउलाच्या द्वारीं खूणा । उमटल्या जाणा गरुडाच्या ॥ ९२ ॥ तीं पदचिन्हें पाहुनी संत । ह्मणती आला पंढरीनाथ । प्रकाश दाटला नेत्रांत । आनंद चित्ता न समाये ॥ ९३ ॥ मध्वनाथें करितां ध्यान । मूर्ति पाहिली जवळ जाण । चतुर्भुज दैदिप्यमान । अतिलावण्य साजिरें

॥९४॥ शंखचक्रगदापद्म । विराजित देखिला मेघःशाम । आलिंगन देउनी सप्रेम । पादपद्म धरिले शीरीं ॥ ९५ ॥ विसर्जन करितां देहभावा । खेद जाहाला बहुत देवा । ह्मणती माझा ज्ञानधन ठेवा । गुप्त केंव्हां जाहाला तो ॥९६॥ श्रीपांडुरंगें समाधी देउनी । निघोनी गेले स्वस्थानीं । पुष्पवृष्टि स्वर्गीहुनी । अमरांनीं केली पै ॥ ९७ ॥ ऐसे स्वामी मध्वनाथ । संत जहाले ज्ञानी समर्थ । जयरामाचा अवतार सत्य । ज्ञानेश येकनाथ तो येथें ॥९८॥ च्यार अवतार ज्ञानेश्वरादि । वर्णिले विख्यात ग्रंथीं त्रिशुद्ध । जया भजती वैष्णवमांदी । ज्ञाननिधी परिपूर्ण ॥ ९९ ॥ सिद्धकृपेचा अगाध महिमा । प्राप्त देवें भक्ति प्रेमा । मेळविले परब्रह्मा । निर्धर्मा सत्वरूपा ॥ १०० ॥ युगायुगीं श्रीरंग । घडतां निरंतर आत्मयोग । भूतभविष्य सकळ सांगे । पांडुरंग स्वमुखें तो ॥ १ ॥ तेणें करुनी संत जन्मांतर । वर्णिले आख्यान चमत्कार । सर्व जाणती श्रोते चतुर । कथा थोर पवित्र जगीं ॥ २ ॥ पुढें अवतार सोपान्देवाचा । जगदोद्धारासी जाहाला साचा । वर्णीता पुनीत होय वाच्या । जाय जीवाचा कळंक पै ॥ ३ ॥ सिद्धकृपा राजारामीं । प्रगटले समर्थ हृदई स्वामी । उलंघीली चतुर्थ भूमि । गेली उर्मी समूळ ते ॥ ४ ॥ भक्तचारित्रे गुंफुनी माळा । अर्पण होतसे श्रीरामाला । अखंडाकार प्रसाद केला । समपाउला नमन त्या ॥ ५ ॥ जघनीं ठेऊनी वरदकर । जो कां तिष्ठे दिगांबर । तो चि माझा श्रीरघुवीर । पुज्या साच्यार घेतसे पै ॥ ६ ॥ सोपानदेवाचा अवतार । ते चि कथा सांगणें सार । श्रोतीं असावें सादर । आनंदभर परिसावया ॥ ७ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । मध्वनाथसाधुचरित्राते । अध्याय समाप्त जाहाला हा ॥ १०८ ॥ आध्याय ॥ १ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमें अध्याय येकुणसाठावा ॥ ५९ ॥ समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शके १७६९ ॥ प्लवंगनाम संवत्सर ॥ मार्गशीर्ष शुध्द ८ बुधवार ॥ समाप्तिमगमत् ॥

